# वर्तमान काळ

सद्यस्थितिनिदर्शक, विचारप्रवर्तक,

सामाजिक, स्वतंत्र, कादंबरी

लेखक

प्रो. ग. वा कवीश्वर, एम् ए

'दि मेटॅफिझिक्स् ऑफ् बर्कले' व 'नीति आणि कलोपासना'

या पुस्तकाचे कर्ते.





| इसवी सन | किंमत | शालिवाहन शक |
| --- | --- | --- |
| १९४० | दीड रुपाया | १८६१ |

# आभारप्रदर्शन



माझे मित्र उज्जयिनीचे प्रोफेसर प्रभाकरपंत माचवे यांनीं आपलेपणानें श्रम घेऊन माझ्या कल्पनेप्रमाणें वेष्टणावरचें चित्र काढून दिलें, याबद्दल त्यांचे आभार व्यक्त करण्यांत मला फार आनंद वाटतो. प्रो. माचवे लेखक म्हणून आतापावेतों प्रसिद्ध आहेत; पण ते कुशल चित्रकारही आहेत हें पुष्कळांस अजून माहीत व्हावयाचें आहे !

' सहकारी मुद्रणालया ' च्या व्यवस्थापकांनीं ठरल्याप्रमाणें फेब्रुवारी महिन्याच्या आंत पुस्तक तयार करून दिलें, याबद्दल त्यांचेही आभार मानणें आवश्यक आहे. तसें पाहिलें, तर ठरलेल्या मुदतींत वक्तशीरपणें काम करून देणें हें छापखान्याचें कर्तव्यच आहे. पण प्रचलित युद्धामुळे उत्पन्न झालेल्या परिस्थितीनें कागद मिळण्यास अपेक्षेबाहेर विलंब लागला, व शेवटीं फेब्रुवारीच्या आंत पुस्तक तयार होतें किंवा नाही याची शंका वाटूं लागली. परंतु, अशाही अडचणींत शब्दशः रात्रंदिवस काम करून, ' सहकारी मुद्रणालया 'तील श्री. मादळे व त्यांचे सहकारी कामगार यांनीं परिश्रमपूर्वक हें पुस्तक ठरलेल्या मुदतींत पूर्ण करून दिलें, याबद्दल त्यांचे आभार मानल्याशिवाय राहवत नाहीं.

प्रो. वा. गो. उर्ध्वरेषे यांचेंही, ' सहकारी मुद्रणालया ' चे मॅनेजिंग् डायरेक्टर म्हणून, आणि व्यक्तिशः देखील, या पुस्तकाचे

संबधांत जें अमूल्य साह्य झालें आहे, त्याचा येथें अंत:करणपूर्वक उल्लेख करावासा वाटतो.

मुद्रितें तपासण्याचें किचकट काम—आणि तेंही तातडीनें—करण्यांत दोन व्यक्तींचें फार साह्य झालें आहे. एक माझ्या पत्नीचें आणि दुसरें कुमार श्रीधर शंकर चापोरकर या उत्साही विद्यार्थ्याचें. यांच्या साह्याशिवाय हें कार्य इतक्या जलदीनें पूर्ण होणें फार कठीण गेलें असतें

शेवटीं जिच्या कृपाप्रसादेंकरूनच ही कृति निर्माण होऊन प्रकाशित होऊं शकली, त्या श्रीशारदेच्या चरणारविंदीं लीन होऊन, ही कादंबरी महाराष्ट्रांतील रसिक वाचकवर्गाच्या सेवेस सादर करितो

इंदूर
रविवार, मिती माघ व. २ शके १८६१,
ता. २५-२-१९४०

ग. वा. कवीश्वर.

दिवंगत बंधू

कैलासवासी

**भा. वा. कवीश्वर**

यांच्या पुण्यस्मृतीस ही

कादंबरी अर्पण असो.

# वर्तमानकाळ

## [१] सत्यसृष्टींत पदार्पण.

पार्वतीपूर श्री. मंगळवार

३१–३–१९३६

रा. रा. मित्रवर्य माधव यास सप्रेम नमस्कार वि वि.

मागे तुझें पत्र आलें होते त्याला बरेच दिवस झाले तरी माझे-कडून आजपावेतो तुला उत्तर गेलें नाहीं याबद्दल मी प्रथमच तुझी क्षमा मागून घेतों कृपाकरून मजविषयीं कोणत्याही प्रकारच्या गैर-समजास तू आपल्या मनात थारा देऊ नकोस. प्राजळपणे लिहावयाचें म्हणजे—आणि मित्रांस प्राजळपणे लिहावयाचे नाहीं तर काय करावयाचें ?—या दीर्घ कालावधीस माझा नेहमीचा शरीरस्थ रिपु आळस हे मुख्य कारण नसून, माझ्या लहानशा वैयक्तिक विश्वात घडून आलेल्या काहीं महत्वाच्या घडामोडींनीं विचालित झालेलें माझें मनःस्वास्थ्य हेच त्याचें महत्वाचे कारण होय. तुला बहुतेक माहीत नसेल कीं, गेल्या महिन्यात माझ्या पूज्य वाडिलास एकाएकीं छातींत दुःख उद्भवून देवाज्ञा झाली ! त्यावेळेस मी येथे पार्वतीपूरलाच होतों, आणि मला तार मिळताच जरी मी निघालो, तरी मी मानपूरास पोहोंचण्यापूर्वींच माझ्या प्रेमळ पित्याचें छत्र निष्ठुर कालानें माझ्या शिरावरून ओढून नेऊन मला या अफाट विश्वसागरात अगदीं एकटें सोडून दिलें ! सर्वस्वी अकल्पित रीत्या येऊन ठेपलेला तो प्रसंग पहाताच माझी काय अवस्था झाली असेल, हें तुझ्यासारख्या सहृदय मित्रास

मी काय लिहूनच कळवायला हवें ? मी मानपूरला जाऊन पोचलों त्यावेळेस अप्पाची प्राणज्योति मालवून काहीं तास लोटले होते ! अप्पाची आणि माझी अखेरची भेट देखील न होऊ देण्यात क्रूर दैवानें काय साधलें ? त्याची प्राणज्योति दोनच तास उशिरानें मालवली असती तर—पण व्हिटिअर कवीनेंच नाहीं का म्हटलें:—

ऑफ् ऑल् दि सॅड् वर्ड्स् ऑफ् टग् अँड् पेन्
दि सॅडेस्ट् आर् दीझ् ' इट् माइट् हॅव्ह् बीन् ' !

असो. एका आधुनिक जगद्वंद्य विभूतीनें एका प्रसंगीं काढलेल्या ' इफ् वुइ नो ऑल् दि वेज् ऑफ् गॉड्, वुइ शॅल् बी गॉड् हिम्सेल्फ् ' या श्रद्धापेक्षी शब्दांना आठवून मनाचें सांत्वन करण्यापलीकडे आता माझ्या हातांत अधिक ते काय उरले आहे ?

पण, माधव, त्यातल्या त्यात माझ्या मनाला एक गोष्ट विशेषच चटका लावून राहिली आहे. ती अशी कीं, गेल्या वर्षी अप्पाच्या छातींत प्रथम दुखू लागले, त्यावेळेपासून ते मला कमींत कमी तीन चारदा तरी म्हणाले कीं, ' बाळू, तुला सवडीनें एक फार महत्वाची गोष्ट सांगण्याचें माझ्या मनात आहे.' प्रत्येक वेळेस मी म्हणावें, 'अप्पा, सांगा ना मग काय सांगावयाचें ते आतांच ' पण काय असेल तें असो ! मी असे उद्गार काढले कीं, त्याचा आवाज जड व्हावा, डोळे अश्रूनीं भरून यावे, आणि सद्‌गदित कठानें त्यांनीं म्हणावें, ' नको, आताच काय त्याची घाई, सांगेन पुढें केव्हा तरी '. आणि त्याची ती अवस्था पाहून माझ्यानेंही मग फारसा आग्रह धरवत नसे. पण आतां मात्र असें वाटतें कीं त्यावेळेस थोडेसें हृदय घट्ट करून अप्पानीं आपल्या मनातील गोष्ट मजजवळ व्यक्त केली असती तर किती उत्तम झालें असतें ? त्यांच्या मनांत असें कोणतें दुखःदायक शल्य डाचत होतें कोणास ठाऊक ! तें काय गतायुष्यांतील कांहीं दुःखद स्मृतीचें भूत होतें किंवा भविष्य

काळांतील कांहीं अनिष्ट घटनेचें अस्पष्ट भय होतें, ईश्वरच जाणे ! मृत्यूच्या कराल दाढेंतून एकदा आत गेलेलें माणिक पुन्हा एका निमिष-मात्रासाठींही बाहेर काढणें अशक्य असावें ना ? जिवतपणीं दृष्टीस पडताच जे ओठ आशीर्वादाचे दोन शब्द उच्चारण्यास फुरफुरत असत, तेच मृत्यूनें कानमंत्र देताच दगडाप्रमाणें निश्चल व्हावे ना ?

माधव, आयुष्यात प्रथमच इतक्या तीव्रतेनें अनुभवास आलेल्या या भीषण प्रसंगामुळें, आणि तदनुषंगाने उत्पन्न झालेल्या गेल्या महि-न्यांतील अनेक चमत्कारिक घटनामुळें, माझें मन त्रस्त होऊन मी तुला यापूर्वी पत्र पाठविलें नाहीं, याबद्दल तू मला क्षमा करशील ना ? माझ्या आतापावेतोंच्या जीवनात मी ज्याना माझे खरेखुरे मित्र म्हणू शकेन, ज्याचेवर संकटकालीं आसऱ्यासाठीं विसंबू शकेन, मनींची गुज-गोष्ट ज्याचेजवळ मी संकोचरहितपणें उघडी करू शकेन, असे मित्र एकापेक्षां अधिक लाभले नाहींत. मग हा माझ्या एकलकोंड्या स्वभा-वाचा दोष म्हण, अगर माझ्या विशिष्ट प्रवृत्तींचा परिणाम म्हण. पण सुदैवानें मला मिळालेला एकच मित्र असा आहे कीं, त्याच्यापुढें इतराची तुलनाच नाहीं. आजपावेतों तुझें जें वेळोवेळीं मला निरपेक्ष पणें अमूल्य साह्य झालें आहे त्याची स्मृति झाली म्हणजे अप्पाच्या एकाकी निधनानें एकट्या पडलेल्या माझ्या मनाला या दुःखांतही किती समाधान वाटते म्हणून सांगू ! आणि म्हणूनच आज मी तुला इतक्या मोकळ्या मनानें हे पत्र लिहीत आहे. अप्पाच्या निधनानंतर घराची व्यवस्था अर्थातच मला पहावी लागली. ती तात्पुरतीच कशीबशी करून येथें आलों. परंतु आपण दोघांनीं येथें बरोबर काढलेल्या सहा वर्षांची स्मृति होऊन किती भयाण वाटतें येथे आतां ! तसें पाहिलें तर सन १९३२ सालीं आपण दोघेही बरोबरच बी. ए. झालों; नंतर तू एल्. एल्. बी. कडे वळलास आणि मी एम्. ए. चा मार्ग

धरला. परतु, अशा प्रकारें अभ्यासातली एकी मोडली तरी आपलें शारीरिक सान्निध्य व मानसिक मित्रत्व पूर्वीप्रमाणेंच चालू राहिल्यानें अभ्यासाच्या दृष्टीने आपल्यात पडलेली फूट कधींही जाणवली नाहीं. त्यानतर गेल्या वर्षी जुलै महिन्यात तू एल् एल्. बी. पास होऊन कांचनपूरला, आपल्या वडिलाच्या गावीं, वकिली करण्यास गेला, आणि मी एम्. ए. होऊन नोकरीच्या शोधार्थ येथेच राहिलो, तेव्हा मला तुझा वियोग भासून बरेंच वाईट वाटले. पण मुग्याप्रमाणें अगणित माणसानीं गजबजलेल्या या अपार विश्वात मला आता जसें अगदीं एकटे व भयाण वाटतें तितके पूर्वी कधींच वाटले नाहीं. तुझ्या आणि माझ्या झालेल्या ताटातुटीची जाणिव मला या गेल्या महिन्यात जशी झाली तशी पूर्वी भासली नव्हती.

प्रिय मित्रा, मनात उद्भवणाऱ्या कितीतरी कल्पना आणि विचार-लहरी तुला लिहून कळवाव्या, आणि मन हलके करावें, म्हणून वाटत आहे ! बाह्य वास्तव विश्वातील नानाविध दुःखें दृष्टीआड ठेवण्यासाठीं भगवान बुद्धाचे भोंवतीं उभारलेल्या सुखविलासयुक्त राजप्रासादाप्रमाणें, वर्तमानकालीन भारतवर्षांतील वस्तुस्थितीशीं अपरिचित असणाऱ्या आजकालच्या विद्यालयीन वातावरणात मनावर चढलेल्या उन्मादानें धुंद होऊन रचलेले कल्पनाचे भव्य मनोरे, आज सत्य सृष्टींत पदार्पण करताच कसे भूकपाचा धक्का बसल्याप्रमाणें नामशेष झाले आहेत. माधव, ही केवळ काव्यमय भाषा लिहावयाची म्हणून मी लिहीत नाहीं. नेहमीच्या बोलण्यांत व लिहिण्यात देखील मी भारदस्त शब्द वापरतो म्हणून तू माझी थट्टा करतोस; पण ही थट्टेची वेळ नव्हे. गेल्या आठ दहा महिन्यात आणि विशेषतः या पधरा दिवसांत मला या जगाचे जे अनुभव आले, आणि कल्पना व सत्यसृष्टि यातील विसवादाची स्पष्ट जाणीव करून देणारे जे चटके माझ्या हृदयास बसले

तेच या प्रसगीं सर्व बांध फोडून शब्दांचे द्वारें बाहेर पडण्याचा प्रयत्न करीत आहेत ! गेल्या महिन्यांत दुःखाने मन भरून गेलें असताही मनमोकळेपणानें बोलण्यास देखील मजजवळ कोणी नव्हते बिचारी आई ! आपल्याच दुःखानें व्यथित होऊन ती मानपूरास दिवस कठीत असतां माझ्या दुःखाच्या कहाण्यानीं तिच्या प्रेमळ मनाला मी आणखी ताप कसा देऊ ? आणि म्हणूनच पत्रद्वारेच का होईना, पण तुझ्या जवळ आपलें मन हलके करावे असे मला फार फार वाटत आहे. पण पुरे. आधींच हे पत्र फार लांबलें असल्यानें आतां माझ्या अधिक कटकटीने तें मी कटाळवाणें करु इच्छीत नाहीं. खरें पाहिले तर तुझ्यासारख्या ‘ ऑल्टर् ईगो ’ ला लिहितांना पत्राच्या लांबीचा काय पाड ? पण आता या घटकेस अधिक लिहिण्यास बरेच वाटत नाहीं. खऱ्या वस्तुस्थितीच्या जादूमय काडीचा स्पर्श होताच कल्पना-सृष्टींतल्या सर्व आशालता एकाएकीं कोमेजून त्याना निराशेचें काळे कुट्ट भेसूर स्वरूप कसें प्राप्त झालें याची करुण कहाणी तुला पुढें केव्हा तरी कळवीन.

कळावें, लोभ असावा हे विनति. पत्राचें उत्तर लवकर पाठवावें म्हणजे बरे वाटेल सौ. वहिनींना नमस्कार. त्याची वाचनाची प्रगति कितपत आली आहे ? ‘ प्रभाकर ’ मध्यें अलीकडे तुझा लेख आला आहे काय ?

तुझा मित्र,

**केशव दाते.**

---

[२] **‘राजद्वारे स्मशाने च—’**

काचनपूर श्री बुधवार

चैत्र कृ ८ शके १८५८

**प्रिय मित्र केशव यास सप्रेम नमस्कार. वि. वि.**

तुझें ३१–३ चें पत्र पोचलें. मजकूर वाचून फार वाईट वाटलें. बाळू, अरे मित्र म्हणवतोस, आणि तुझ्या वडिलांच्या शोचनीय मृत्यू-मुळें तुझ्यावर येऊन पडलेल्या आकस्मिक आपत्तीची वार्ताही यापूर्वी मला कळविली नाहींस ? तुझ्या उत्तराची वाट मी बरेच दिवसापासून पहात होतों, आणि तुझें पत्र आले त्या सुमारास तुला एक दुसरें पत्र पाठविण्याचा मी विचार करीतच होतों. पण तुझ्या मुग्धतेचें कारण असें कांहीं असेल असें मला स्वप्नातही वाटलें नव्हतें ! आणि त्याची कल्पना यावी तरी कशी ? तुझ्या पत्रातील तुझ्या वडिलांच्या मृत्यूची वार्ता वाचून मला खरोखरच फार वाईट वाटलें आणि तुला सात्वनपर कोणते शब्द लिहावे हे मला कळेनासें झाले आहे. पण सुदैवानें तूं स्वतःच सूज्ञ असल्याने या कठीण प्रसगीं आपलें दुःख आवरून पुढील मार्गाचा योग्य विचार करण्यास लागशील अशी मला उमेद आहे. ‘ जातस्य हिं ध्रुवो मृत्युः ’ या वचनाची स्मृति काय मी तुला करून द्यावयास पाहिजे ? तरीपण अतकाळीं निकट आमांची भेटही होऊ न देतां झालेले असे आकस्मिक मृत्यु पाहिले म्हणजे मन विशेष विषण्ण झाल्याशिवाय रहात नाहीं हें खरें. मात्र एका दृष्टीनें पाहिलें तर अशा तडकाफडकी होणाऱ्या निधनामुळें मरणाऱ्या व्यक्तीला फार वेळ बिमारींत खिचपत पडावें लागत नाहीं ही एक समाधानाची गोष्ट म्हटली पाहिजे.

तुझ्या वडिलांच्या मनात तुला सांगावयाची एक महत्वाची गोष्ट तशीच राहून गेली त्याची तू लिहिलेली हकीकत खरोखरच विस्मयजनक आणि मनाला चटका लावणारी आहे. पण आतां त्या-संबंधांत तूं तरी काय करू शकणार ? ईश्वरकृपेनें यदाकदाचित यानंतर आणखी कोणा इतर व्यक्तींकडून किंवा कागदपत्रांवरून ती तुला कळली तरच कळूं शकेल. यात तुझा स्वतःचा तर कांहींच दोष नव्हें.

म्हणून या बाबतींत ईश्वरावर हवाला टाकून स्वतःच्या मनाला तू लावून घेऊ नकोस अशी माझी तुला आग्रहाची सूचना आहे. ( तू आपल्या आईला या संबधीं विचारून पाहिलें असेलच. )

असो. केशव, आता मी तुला एका महत्वाच्या गोष्टीबद्दल लिहिणार आहे, त्याचा तू अगदीं मोकळ्या मनानें खुलासा करावा अशी माझी इच्छा आहे. तुझ्या वडिलानीं आपल्या सर्व आयुष्यात कधींही कर्ज काढलें नाहीं हें तुझ्या तोंडून अनेकवार ऐकलेल्या त्याच्या वर्णनावरून मला माहीत आहे पण आपल्यामागे त्यानीं तुझ्यासाठीं काहीं कर्ज ठेवले नसलें तरी विशेष शिल्लकही ठेवली नसावी याबद्दल मला खात्री वाटते. कारण, आपण विद्यालयात शिकत असताना तुझ्या घरून तुला किती पैसे येत असत आणि तू आपल्या हुशारीनें मिळविलेल्या शिष्यवृत्त्यामुळेंच तुझा एकदर खर्च कसा पुरा पडत असे हें मला चांगले आठवत आहे. तरी हल्लीं तुझ्या चारितार्थाचे साधन काय आहे आणि तुझा खर्च तू कसा काय चालवीत आहेस हे जाणण्याची माझी इच्छा आहे. कोणताही संकोच न करतां तू ही माहिती मला लवकर कळवावी, आणि त्याबरोबरच मजकडून काहीं साह्याची अपेक्षा करीत असशील तर तेंही मोकळेपणानें लिहिण्यास मागेपुढे पाहू नको अशी माझी विनति आहे. संकटकालींच मित्राची परीक्षा होत असते. गेल्या वर्षीपासून तू खटपट करीत असतांही तुझ्यासारख्या हुशार विद्यार्थ्याला देखील अद्याप योग्य नोकरी मिळण्यास मारामार पडावी, यावरून आपल्या देशांतील शिक्षित तरुणांत आज किती भयानक बेकारी माजली आहे हें ढळढळीतपणें प्रत्ययास येतें. राष्ट्रांतील कितितरी व्यक्तींचें शारीरिक व मानसिक सामर्थ्य निराशेच्या दारुण खडकावर आपटून चक्काचूर होत आहे ! किति तरी भावी कालिदासाच्या, शिवाजींच्या, भास्कराचार्यांच्या, जगदीश बसूंच्या, जीवितकालिका आयु-

ष्यांतील अत्यत महत्त्वपूर्ण अशा सक्रमणकालाच्या सुरवातीसच बेका-रीच्या भीषण वणव्यात सांपडून त्याची राखरागोळी होत आहे! हा अखिल भारतीय प्रश्न केव्हा समाधानकारक रीत्या सुटेल तो सुटो, पण आज तूं ज्याअर्थी मला मित्र म्हणवीत आहेस, त्याअर्थी तुझी स्वतःची या सबधातली हकीकत खुलासेवार कळविण्यास सकोच अगर आळस करू नकोस.

तुझ्या पत्राचे शेवटीं तू लिहितोस कीं तुझ्या मनांत मला पुष्कळ गोष्टी लिहून कळवाव्या अशी इच्छा आहे, तर त्या अवश्य कळव. केशव, घराप्रमाणेंच मन देखील त्यातील विचारवायू नेहमीं वहात राहिला तरच शुद्ध रहात नाहीं का? आपले विचार आपल्यापाशींच कृपण-पणानें ठेवून मानसिक चिंता व दुःख विनाकारण वाढवून घेऊ नकोस या जगात नानाविध प्रसगीं मनात उद्भवणारे तापदायक विचार मना-तल्या मनांत पूर्णपणें जिरवून टाकण्याइतकी निर्विकार वृत्ति ज्यानीं संपादन केली आहे त्या महाभागाची गोष्ट वेगळी, पण इतराच्या बाबतींत असले विचार आपल्या जवळच ठेवून त्याचें आतल्या आत नेहमीं चर्वितचर्वण करीत राहणें हें अस्तनींत निखारा बाळगून त्यांत सर्पण घालीत राहण्यासारखेंच आहे. उलट तेच विचार एखाद्या योग्य व्यक्तीजवळ व्यक्त केल्यास त्यामुळें त्याची तीव्रता आणि मनांतलें दुःख हीं दोन्ही पुष्कळच कमी होण्याचा सभव असतो. या प्रसंगीं वास्तविक मी प्रत्यक्षच तुजकडे आलों असतों. पण एकतर हल्लीं येथें सुदैवानें मजकडे काम बरेंच आहे, आणि शिवाय येथें नवीनच बदली होऊन आलेले तरुण न्यायाधीश विशेष चांगल्या स्वभावाचे नसल्यानें मुद्दाम त्याची परवानगी मागून कोठें बाहेरगांवीं जाण्याची माझी इच्छा नाहीं.

तूं आपल्या पत्रांत अगदीं अखेरीस विचारलेल्या दोन प्रश्नाचीं

उत्तरें अनुक्रमें ‘ यथातथा ’ आणि ‘ नाही ’ अशीं आहेत. क. लो. अ. हे विनति

तुझा मित्र,

**माधव मुद्रे.** १५–४–३६



## [३] ‘ हांस, हांस, हांस, बाळे, जोंवरी...... .. ’

पार्वतीपूर ता. १२–५–३६

प्रिय मैत्रिण कु. नंदिनी हिला सप्रेम नमस्कार

तुझें पत्र कालच मिळालें. तू एकदाची यंदा इंटरमीजिएट पास झालीस हें कळल्याने फार आनंद झाला. माझा रिझल्टही वर्तमानपत्रातून तुला तेथे कळलाच असेल. मी बी. ए. च्या परीक्षेत दुसऱ्या डिव्हिजनमध्ये पास झाले. आमच्या येथील कॉलेजातील सर्व विद्यार्थ्यांत माझा पहिला नंबर आल्याने मला एक बक्षिसही मिळालें आहे. साऱ्या युनिव्हर्सिटींत माझा नंबर सातवा आला आहे. येथे माझा रिझल्ट कालच कळला. तुझ्या घरीं मी चौकशी केली होती पण या सुटींत तूं येणार नाहींस असे कळले. तू पुढें बी. ए. शिकणार आहेस हें वाचून फार बरें वाटलें मला. अग, कॉलेजमधे एकदा शिरलं म्हणजे बी. ए. शिवाय विसावाच नाहीं कुठें. इंटर म्हणजे आपलं मधेच, धड इकडेही नाहीं आणि तिकडेही नाहीं. त्रिशंकूचीच अवस्था ती!

माझा पुढें काय विचार आहे हे तू विचारलं आहेस. पण मी तरी तें आजच डेफिनिट्ली काय सांगू? मला स्वतःला मधून मधून वाटतं कीं एम्. ए. चा क्लास जॉइन् करावा. पण दुसरें, खरं सांगू, हंसू नकोस गडे, आईचा आपला निराळाच आग्रह चालला आहे हो अलीकडे. पहावं बाई नाना काय ठरवितात ते!

तुझ्या कॉलेजातल्या पारशी मुलीला प्रेमपत्र पाठविल्याबद्दल एका मुलाला कॉलेजमधून दोन वर्षांसाठीं रस्टिकेट केल्याबद्दलची हकीकत तूं

पत्रात लिहिली आहेस ती वाचून मोठी मौज वाटली हो. फार छान केल तुझ्या प्रिन्सिपॉलनीं ! नाहींतरी अलीकडे हे विद्यार्थी फारच चावट-पणा करायला लागले आहेत. पण मी साफ सांगते कीं माझ्याकडे जर कोणी असं एखाद्या विद्यार्थ्यान प्रेमपत्र पाठविल असत तर मी त्याला स्पष्ट बजावलं असत कीं आधी निदान शभर रुपये मासिक उत्पन्नाचा धंदा अगर नौकरी कर, पाच हजार रुपयाची शिल्लक टाक, अन् मग पड अशा पत्राबित्राच्या फंदात शिकलेल्या मुली जशा वाटेवरच पडल्या आहेत ! याना वाटत कीं जशा अशिक्षित जुन्या बाया भोळया तशा याही आपल्या जाळयांत गुरफटतील. पण शिक्षणाने जशा यांच्या आकांक्षा वाढतात तशाच त्या आम्हा मुलींच्याही वाढतात, आणि भावी पतीच्या विद्वत्ते बद्दल सांपत्तिक स्थितीबद्दल, आणि सामाजिक दर्जाबद्दल आमच्याही कांहीं विशिष्ट आयूडियाज् बनलेल्या असतात हें यांना कधीं ग समजणार ! आम्ही शिकलेल्या मुली पूर्वीप्रमाणें डोक्यावर पदर ओढून आणि हातांत स्वयंपाकाचीं जुनाट उपकरणीं घेऊन इतःपर घरातल्या स्टॅग्नट चोकिंग ॲटमॉस्फिअरमध्यें कधींही राबणार नाहीं हें यांनीं खूप समजून असाव.

बरं. तें असो म्हणा. माझे नाना आहेत तोंपावेतों माझ्या स्वतः बद्दल मला मुळींच काळजी नाहीं त्याबाबतींत तुझा इकडे केव्हा येण्याचा विचार आहे ? मात्र कांहीं महत्त्वाच्या 'कार्या' साठीं जर आमच्या येथून तुला माझी मैत्रीण म्हणून बोलावणं आलं तर त्यावेळेस मात्र आलच पाहिजे हो. कांहीं तरी कारणें दाखविलेलीं मला मुळींच पटायची नाहीं. काय ग, 'सुशिक्षिता' मासिकाच्या संपादिका मंडळांत तुझ नांव येऊन बरेच महिने झाले, पण तुझा एखादाही लेख मात्र त्यांत अद्याप झळकला नाहीं हें कस ? कोकिळेला वाचा फुटायला एखाद्या वसतागमाचा उशीर आहे कीं काय ? कळावे. पत्राचे उत्तर पाठव. तुझी मैत्रीण,

**मालती कोपरे.**

## [४] भारतीय स्त्रीची दिनचर्या—

माधव मुद्रे याच्या खासगी वहींतला उतारा.

मंगळवार, वैशाख कृ. १३ शके १८५८.

काल रात्रीं 'केसरी' तला अग्रलेख वाचताना सौभाग्यवतीनें प्रकट केलेलें अज्ञान पाहून जे मनाला वाईट वाटलें तें अद्यापि कमी झालें नाहीं. त्या प्रसंगीं मी रागानें 'केसरी' बंद करून अंथरुणावर पडलो खरा; परंतु वर्तमानपत्र फेकणें जितकें सोपें आहे तितकें मनातले त्रासदायक विचार दूर करणें कोठे सोपें आहे ? पण मनाला तरी वाईट कां वाटू नये ? हिंदुस्थानात जन्म घ्यावयाचा आणि प्रमुख देशभक्ताचीही चांगली माहिती नसावी म्हणजे काय ? परवा केशवनें त्याच्या पत्रांत तिच्या शिक्षणाची प्रगति (!) किती झाली म्हणून विचारले. त्यानें सहज विचारलें, पण मला किती वाईट वाटलें त्यानें ! केशवने तरी कां विचारूं नये ? कॉलेजमध्यें असतांना त्याच्याशीं किती जोरजोरानें वाद करावयाचा मी या विषयावर ! ज्या राष्ट्रांत माता आणि पत्नी अशिक्षित आहेत त्या राष्ट्रानें ही स्थिति बदलेपर्यंत उद्धाराची आशा स्वप्नातही करू नये, हें किती आग्रहानें प्रतिपादन करीत असे मी ! आज मी केशवला कांहीं तरी उत्तर देऊन विषय टाळला खरा. पण मनांतली अस्वस्थता त्यानें कशी दूर होणार ? या बाबतींत माझें कोठें चुकते आहे हेंच मला खरोखरच कळेनासें झालें आहे. माझ्या पत्नीनें मराठी व हिंदी यांचें चांगलें ज्ञान व इंग्रजीचें निदान व्यवहारी ज्ञान या वयात प्राप्त करून घ्यावें अशी माझी किती इच्छा आहे हें माझें मलाच माहीत. आपल्या समाजांतील बहुसंख्य स्त्रियांकडे पाहिलें म्हणजे मला आपल्या समाजाच्या भवितव्यतेविषयीं दारुण निराशा वाटू लागते. हरिभाऊ आपट्यांच्या काळापेक्षां वर्तमान काळांत स्त्रीशिक्षणाची कांहींशी प्रगति झाली आहे खरी; पण बारकाईनें पाहिलें असतां या बाबतींत

प्रथमदर्शनीं वाटते तितकी आशाजनक स्थिति नाहीं असें निदर्शनास येतें. मुलींचे जें काहीं शिक्षण आजकाल होतें तें बहुधा विवाहापूर्वीच होतें. पण त्यानंतरही खासगी रीत्या आपला विद्याव्यासंग किती महाराष्ट्रीय—नव्हे, भारतीय—गृहिणी चालू ठेवतांना आढळून येतात ? किती महिला नियमानें वृत्तपत्रें वाचून आपल्या देशाच्या सद्यःस्थितीचें अद्यावत ज्ञान संपादन करीत असतात ? परदेशातील घडामोडींविषयीं तर बोलावयासच नको ! आजही आपल्या देशातील सर्वसाधारण महिलेचा दिवसातला फुरसतीचा वेळ शेजाऱ्यापाजाऱ्याची निंदा, कुटाळक्या, इत्यादि महत्कार्यांतच जात नाहीं का ? शेजाऱ्यानें आपल्या पोपटाला एक दिवस पोळीचा एक तुकडाही कमी घातला तर त्याची खित्तंबातमी ज्यांना ताबडतोब लागते त्यांना ॲबिसीनिया आणि चीन यांच्यासारखे देशचे देश आक्रमणशील राष्ट्रांनीं लचके तोडून गिळंकृत केले तरी त्याची गधवार्ताही नसते ! उद्या जर्मनी, जपान, रशिया, किंवा इतर कोणत्याही राष्ट्राच्या वैमानिकांनीं प्रत्यक्ष घरादारावर बॉंबचा वर्षाव करून सारा भडका उडाल्यानंतर मग कोठें ह्यांना त्या राष्ट्राचें भूतलावरील अस्तित्व जाणवणार ! जावानणंदाच्या लहानशा मुलाच्या हांतून खेळतां खेळतां सहज फुटलेल्या एखाद्या लहानशा मातीच्या खेळण्याबद्दल यांच्या कोमल हृदयाला इतकी हळहळ वाटते कीं त्यामुळें क्वेटाच्या प्रचंड भूकंपानें अन्नान्नदशा प्राप्त झालेल्यांच्या आर्तस्वराकडे लक्ष द्यायला त्यांना सवडच नसते ! शेजारच्या रामभाऊंनीं बिऱ्हाड सोडून तेथें गोविंदराव आले या प्रचंड घडामोडीचें त्यांना इतकें महत्व वाटतें कीं त्यामुळें देशांतील एक सत्ताधारी पक्ष जाऊन दुसरा आला तरी त्याची माहिती मिळवायला यांना फुरसतच राहात नाहीं ! शेजारी रहाणाऱ्या सासूसुनेच्या, नणंदभावजयीच्या, जावाजावांच्या, भावाभावांच्या, पितापुत्रांच्या, गृहकलहाच्या मौजा ऐकतांना आणि

सांगताना यांचा इतका वेळ जातो कीं स्पेनमध्यें चाललेल्या भीषण रक्तपिपासू अतस्थ यादवीची वार्ता वर्तमानपत्रांतून वाचायला यांना वेळच नसतो ! येऊन जाऊन कधींमधीं दोनचार चटोर कादंबऱ्या वाचल्या आणि कांहीं उत्तेजक चलचित्रपट पाहिले कीं यांच्या आणि यांच्या पतीच्या मतानें झाली शारदेच्या ऋणाची फिटफाट !

पण हा इतका सारा विचार आज मी करून काय उपयोग ? महिलांच्या घोर अज्ञानाबद्दल मी आजपावेतों त्यांच्यापेक्षा त्यांच्या पतींनाच जबाबदार धरीत आलो आहे. आपल्या समाजाच्या हल्लींच्या परिस्थितींत पत्नीची बौद्धिक उन्नति करणें आणि केवळ कुटुंबावरच खिळलेली तिची संकुचित दृष्टि व्यापक करून तिला समाज, देश, आणि विश्व यांची खरी ओळख पटवून देणें, हीं कार्यें बव्हंशीं पतीचीं आहेत असें माझें मत आहे एखादी अज्ञानी स्त्री आढळली म्हणजे मी तिच्यापेक्षा तिच्या पतीलाच जास्त दोषी समजत आलों आहे. पण यामुळेंच मी आज दिङ्मूढ झालो आहे. पती या नात्यानें माझें स्वतःचें हे कर्तव्य पार पाडण्याचा मी गेल्या कित्येक महिन्यापासून यथाशक्ति प्रयत्न करीत आहे माझ्या पत्नीलाही माझें म्हणणें पटतें असें दिसतें. पण काय असेल तें असो. तिची या दृष्टीनें अद्यापि समाधानकारक प्रगति होत नाहीं. आणि एकदरींत मला निराशा भासू लागते. त्यामुळें माझ्या संसारावर हल्लीं एक प्रकारची उदासीनतेची छाया पसरलेली आहे. ती ईश्वरकृपेनें जेव्हा दूर होईल तेव्हा खरी. माझ्या स्वतःच्या घरची परिस्थिति अशी असता इतरांना मी कोणत्या तोंडानें नांवें ठेऊं !

१९–५–३६



## [ ५ ] नीति आणि कलोपासना

# प्रभाकर

(अग्रेसर मराठी साप्ताहिक) : संपादक व प्रकाशकः—गो. म. डोळे
पार्वतीपूर, गुरुवार, जेष्ठ कृष्ण १४, शके १८५८, ता. १८ जून १९३६



कला नीतीचा अनत वाद : श्री. दप्तरे यांचें व्याख्यान
कु मालती कोपरे बी ए याचें आक्षेपांना उत्तर

रविवार ता. १४ जून रोजीं पार्वतीपूरच्या भव्य टाउन्‌हॉल्‌मध्यें स्थानिक शारदा सेवा सघाच्या विद्यमानें भारत-शिक्षण-सोसायटीचे सन्मान्य अध्यक्ष रा. दप्तरे, एम्. ए., याचें कला आणि नीति या महत्वाच्या विषयावर सुमारें एक तास अस्खलित भाषण झालें. व्याख्यानास शहरातील बहुतेक प्रतिष्ठित सुशिक्षित मडळी हजर असून शिवाय स्थानिक शाळा कॉलेजातील विद्यार्थीवर्गही फार मोठ्या संख्येनें उपस्थित होता येथील प्रसिद्ध वकील रा. गोपाळराव कोपरे यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें. अध्यक्षानीं प्रास्ताविक भाषण केल्यानतर व्याख्यात्यांना आपलें भाषण सुरू करण्यास विनति केली.

श्री. दप्तरे याचे मुद्दे

श्री. दप्तरे याचें भाषण अदाजें पन्नास मिनिटें झालें, त्यांत त्यानीं मुख्यत्वेंकरून पुढील विचार प्रकट केले. ते म्हणाले: आजकाल नीति आणि कला यांच्या संबंधाच्या वादाला महाराष्ट्रांत चांगलाच रग चढला असून दोन्ही पक्षांतर्फे उलटसुलट विचारमालिका पुढें मांडण्यांत येत आहेत याचा एक परिणाम म्हणजे समाजांतील तरुण मडळींचे मन निष्कारण घोंटाळ्यांत पडून, कोणता पक्ष योग्य आहे हें त्यांना मुळींच कळेनासें झालें आहे. माझ्या मतानें हा वाद मुळापासूनच निष्कारण उठविण्यांत आला आहे, कारण नीतीचें जूं कलेच्या

मानेवर लादावें, आणि रूढ नीतिनियमांच्या बंधनानीं कलावंताचें स्वातंत्र्य मर्यादित करावे असें कोणीही सूज्ञ म्हणेलसें मला वाटत नाहीं यासंबंधांत नुकतेंच 'नीति आणि कलोपासना' या नावाचें एक पुस्तकही प्रसिद्ध झालें असून त्यांत लेखकानें कला आणि नीति यांचा संबंध नाहीं असं म्हणणाऱ्याचा पक्ष खोडून काढण्याचा प्रयत्न केला आहे. पण माझ्या मतें तो यशस्वी झाला नसून तें पुस्तक वाचल्यानंतरही कला, व विशेषत. वाङ्मयकला, आणि नीति यांचा आवश्यक संबंध जोडू नये असेंच मला वाटते (टाळया) ते पुस्तक मी घाईघाईत चाळल्यानें त्यातील मुख्य मुद्दे काय आहेत ते यावेळेस मला नक्की आठवत नाहीं, पण ते काहींही असले तरी महत्वाचे नसून सहज उत्तर देण्यासारखे आहेत इतकें मात्र मी खात्रीपूर्वक सांगू शकतो. मुख्य गोष्ट अशी कीं, रोजच्या जीवनातल्या नीति अनीतीच्या वादांना कंटाळून बिचारा वाचक अगर प्रेक्षक तुमच्या कलाकृतीकडे घटकाभर करमणूक म्हणून वळणार ! तेथेंही त्याला तुम्ही याच गोष्टींनीं भेडसावयाला सुरवात केली तर त्या बिचाऱ्यानें जावें तरी कोठे ? जगप्रसिद्ध कवि घेतले तरी त्यानीं नीतीची विशेष बूज राखल्याचें दिसत नाहीं. (यानंतर व्याख्यात्यानीं कालिदासादिकांच्या कृतींतूनही शृंगारपर वर्णनें कशीं आहेत हें सोदाहरण सविस्तर दाखविलें, त्यावेळेस विद्यार्थीवर्गातून मधून मधून अनेक वेळां टाळ्यांचा कडकडाट व 'वन्स मोअर'चा हल्ला होत होता ) या साठीं आजकालच्या तरुणानीं या नीतीच्या बागुलबोवाला भिऊन आपली वाचनाची भूक व कलासक्ति दाबू नये असें माझे स्पष्ट मत आहे. ज्ञानेश्वरीदासबोधादि ग्रंथांचीं पारायणे करावयास पुढे वृद्धावस्था येणारच आहे. ज्यांना स्वतःच्या वार्धक्यावस्थेची शंका असेल त्यानीं वाटल्यास तारुण्यांतच धार्मिक पुस्तकें वाचण्यास प्रारंभ करावा. (प्रचंड टाळया)

अशा आशयाचें आवेशपूर्ण व्याख्यान देऊन श्री दप्तरे आपल्या खुर्चीवर बसल्यानतर एका वयस्क उपवक्त्यानीं त्याचें भाषण खोडून काढण्याचा प्रयत्न केला. परतु तरुण श्रोतृवर्गानें इतका गोंगाट केला कीं, शेवटीं अध्यक्षाचा शाततारक्षणाचा सर्व प्रयत्न विफल होऊन या वक्त्याना आपलें भाषण अर्धवटच सोडून खालीं बसावें लागलें ! नतर नुकत्याच बी. ए. झालेल्या कुमारी मालती कोपरे या टाळयाच्या प्रचड गजरात बोलावयास उभ्या राहिल्या. यावेळेस सभागृहात पराकाष्ठेची स्तब्धता पसरली होती, इतकी कीं, कुमारी मालतीबाईचा जोरानें चाल-लेला श्वास देखील स्पष्ट ऐकू येत होता !

पदवीधारिणीचें कुमारी भाषण

कु. मालती कोपरे म्हणाल्या. सार्वजनिक सभेत भाषण करण्याचा माझा हा पहिलाच प्रसग आहे म्हणून काहीं चुका झाल्यास आपण क्षमा करावी. मी अद्यापि कुमारीच असल्याने ( हशा ) माझें हें कुमारी-भाषण (मेड्न्-स्पीच्) असणें साहाजिकच आहे (हशा व टाळया) आजचे सन्मान्य व्याख्याते श्री. दप्तरे यांनीं आताच आपल्या मनाचे दप्तर ओपन् करून, ( हंशाच हशा ) आपल्यापुढें काहीं चागले विचार ठेवले आहेत याबद्दल आपल्या सर्वांच्या तर्फे मी त्याचे थँक्स् मानते ( टाळया ). मला स्वतःला देखील नीति आणि कला याचा सबध नाहीं असेंच वाटतें. त्या वादाबद्दल मला म्हणजे विशेष समजते असे नाहीं, आणि त्यांतल्या शास्त्रीय मुद्यात शिरण्याची माझी एबिलिटीही नाहीं. पण मी आपली घरगुती भाषेंत सागते कीं, नीति आणखी कला या दोन्ही स्त्रियाच असल्यानें त्याचा परस्पर सबध होईल तरी कसा ? ( प्रचड हंशा व बऱ्याच वेळ पावेतों टाळया ). माझें नाव कोपरे असलें तरी कोणा लेखकाला व्यक्तिशः कोपरखळया देण्याची माझी येथें इच्छा नाहीं ( हशा ). थोडक्यांत इतकेंच सांगतें कीं हिंदुस्थानातील सर्व

साधारण वाचनाभिरुचीचें बाळ आताच कोठें हळूहळू रांगू लागलें आहे. अशा स्थितींत नीतीची भलतीच भीती मूर्तिमंत त्याच्या-समोर उभी केल्यास तें बिचारें घाबरून खालींच बसलें राहील. पण जनतेच्या वाढत्या लिटररी आकांक्षांना अशा प्रकारें आळा घालण्याचा प्रयत्न इष्ट नाहीं. इतकेंच बोलून आणि आजच्या विद्वान व्याख्यात्यांचे पुन्हा थॅंक्स् मानून मी आपला अधिक वेळ न घेता आपल्या जागीं जाते. ( टाळ्या. मधेंच 'आणखी बोला, चालू द्या' अशी कांहीं वेळ ओरड ).

शेवटीं अध्यक्षानीं समारोपादाखल थोडेसें भाषण केल्यावर सभा बरखास्त झाली. एकदर भाषणें ऐकूनही खरी विमूढावस्था दूर होण्यास यत्किंचितही साह्य झालें नाहीं असें कांहीं विचारी श्रोते घरीं जातांना बोलत होते.



[६] स्त्री आणि पुरुष.

लखनौ, रविवार ता. २८–६–३६

प्रिय मालतीस

न. वि. वि. तुझें पत्र मिळालें. तुझा रिझल्ट आधीं तुझ्या पत्रा-वरूनच मला कळला; वर्तमानपत्रात मी नतर वाचला. मी तुझ्या यशाबद्दल मनःपूर्वक अभिनंदन करिते.

मात्र तुझ्या पत्रातलीं कांहीं संदिग्ध वाक्यें वाचून जरा काळजी वाटते हो. आमच्या मालूताई आता नुकत्याच बी. ए. झाल्या आहेत; आणखी लवकरच पुढचीही पायरी गाठण्याचा विचार दिसतो. बरो-बरच आहे, 'ए' च्या पुढें 'बी'. 'मिस् मालती कोपरे बी. ए.' आता लवकरच 'बीबी' होणार तर !

पण, बाई मालू, सांभाळ हो ! तुझ्या पत्रात तूं आधुनिक सुधा-

क्षित स्त्रीचा आव आणला आहेस खरा; पण त्याबरोबरच स्वतःच्या विवाहासंबंधांत मात्र वडिलांवर डोळे झाकून अवलंबून राहण्याची तयारी दिसते तुझी. पण, मालती, पुरुष इथून तिथून सगळे सारखेच नाहींत का ? परावलंबीपणा, मग तो पतीवर असो, पित्यावर असो, किंवा प्रत्यक्ष ईश्वरावर असो, सारखाच वाईट. आजकालच्या स्त्रियांनीं केवळ समवयस्क पुरुषाचींच बंधनें झुगारून चालणार नाहीं, स्वतःच्या विवाहाच्या बाबतींत पित्याचें तरी बंधन काय म्हणून मानावें ? स्वतः पुरतें हिंदुधर्माचें कडक पालन करून त्याचा टेंभा मिरविणारे, परंतु आपल्या चामडीला आणि तुमडीला ( राज्याला ) धोका येऊ नये म्हणून प्रत्यक्ष पोटच्या मुलींना, त्याच्या इच्छेअनिच्छेचा विचार न करतां, परधर्मीय यवनांच्या जनानखान्यात जन्मठेपेसाठीं लोटणारे राजपूत राजे काय त्या मुलींचे सावत्र पिते होते ? आणि आजही, ज्याच्या अर्ध्या गोवऱ्या स्मशानात पोहोंचल्या आहेत, 'कृतांतकटकामलध्वजजरा ' ज्याच्या देहावर स्पष्टपणे प्रतीत होत आहे, अशा थेरड्याच्या हातांत, केवळ द्रव्याच्या लोभानें, आपल्या तरुण, गरीब, निरपराध कन्येचा हात देणारा पुरुष काय त्या बालेचा जन्मदाता नसतो ? मुलगी म्हणजे उरावरची धोंड अशी जिथें समजूत, तिथे याहून वेगळें दृश्य काय दिसणार ? यासाठीं केवळ पिता म्हणून पुरुषाशीं संबंध आला म्हणजे त्यावेळेस आपण विश्वासपूर्वक त्याच्यावर अवलंबून स्वस्थ रहावें हें मला युक्त दिसत नाहीं. स्वतंत्र जीवनाला हक्काची जाणीव हवेइतकीच आवश्यक आहे. प्रत्येक क्षणाला स्वहक्काविषयीं व्यक्तीनें जागरूक राहिलें पाहिजे; नाहींतर तिच्या स्वतंत्रतेची गळचेपी झालीच म्हणून समजावें. आतां तू किंवा मी ' अष्टवर्षा भवेत् कन्या ' या कोटींतल्या खास राहिलों नाहीं. आपल्या आयुष्याचा सोबती निवडताना स्वतःवरच पूर्णपणें विसंबून राहण्यास आम्ही सुशिक्षित स्त्रिया केव्हां

शिकणार ! जीवनाच्या प्रवासांत खरें सुख हवें असेल तर स्वतः पसत केलेल्या वराशीं प्रीति-विवाह करण्यासारखा दुसरा मार्ग नाहीं असें मला तरी वाटते.

मालू, माझी पेन्टिंगमध्यें चागली प्रगति होत आहे हे वाचून तुला आनंद होईल. तू आणि मी बरोबरच मॅट्रिक होऊन आज जरी तू बी. ए. आणखी मी इटरच असले, तरी हा फरक माझ्या चित्र-कलेच्या प्रगतीनें पूर्णपणें भरून काढला आहे असे नाहीं तुला वाटत? केवळ माझ्या चित्रकलेच्या प्रेमाला योग्य वाव मिळावा म्हणूनच माझ्या बाबांनीं मला येथे इतक्या दूर पाठविले. त्यानीं या बाबतींत आईच्या जुनाट समजुतींना आणि दुराग्रहाला न जुमानता मला पाठिंबा दिला याबद्दल मी त्याची अत्यत ऋणी आहे. नुकतेंच बाबांचें 'कला व नीति' या विषयावर तेथें व्याख्यान झाले तें मी 'प्रभाकरा'त वाचलें. फारच छान आहे ते! तूं सुद्धा आता बरेंच जाहीर बोलायला शिकलीस मालती! मला अजून तें जमत नाहीं. लेख लिहायचा म्हटला तर वाटेल तितका लिहीन. मी एकदा येथे बोलायचा प्रयत्न केला होता. पण बोलायला म्हणून टेबलाजवळ जाताच प्रयत्नपूर्वक उभारलेले सगळे धैर्याचे डोगर गडगडत खाली आले, छातींत जोर-जोराने ड्रम सुरू झाला, दोन्ही पायात मोटरचें यत्र सुरू झालें, आणि घशात सहारा वाळवट अवतीर्ण झालें! मोठ्या मुष्किलीनें दोन शब्द बोलले आणि डोके फार दुखण्याचे निमित्त करून खालीं बसले! कळावें. पत्राचें उत्तर लवकर पाठव.

तुझी मैत्रीण,
**नंदिनी दप्तरे.**



## [७] जग हें असें आहे !

पार्वतीपूर श्री सोमवार ता. ६–७–३६

रा. रा. मित्रवर्य माधव यास सप्रेम नमस्कार वि. वि.

गेल्या महिन्याच्या सुरवातीस मी तुला पाठविलेलें पत्र मिळालेंच असेल. त्यांत मी दुसरें सविस्तर पत्र लवकरच पाठवितों असें लिहिलें होतें. त्याला आतां जवळ जवळ सव्वा महिना झाला. या दीर्घ अवधींत तू माझ्या पत्राची पुष्कळच वाट पाहिली असेल यात मला शंका वाटत नाहीं. कदाचित तू मजवर काहींसा रागवलाही असशील. मात्र या मध्यंतरीच्या काळात काहीं जरूरी घरगुती कामासाठीं मला दोन तीन वेळा आईकडे मानपूर येथें जावें लागलें होतें हें वाचल्या-नंतर या विलबाचा थोडासा उलगडा तुला होऊ शकेल.

पण खरें विचारशील तर मला आज तरी अशी खात्री वाटत आहे कीं, मी महिनेच्या महिने जरी तुझ्याकडे पत्र पाठविलें नाहीं किंवा तुला प्रत्यक्ष भेटलों नाहीं, तरी तू मजविषयीं विस्मृतीला—नव्हे गैरसमजुतीला देखील—आपल्या मनात थारा देणार नाहींस. व ही खात्री आहे म्हणूनच मी हें सविस्तर पत्र तुला लिहीत आहे. मला वाटतें कीं खरा स्नेह हा एखाद्या जाईजुईच्या कोमल लतेप्रमाणें नसून आम्रवृक्षाप्रमाणें असावा. आम्रवृक्षाच्या रोपट्याला सुरवातीस जरी वारवार पाणी द्यावें लागलें, तरी एकदा त्यानें जमिनींत नीट मूळ धरलें म्हणजे त्याच्या अस्तित्वाला—किंबहुना वाढीला देखील—मानवी श्रमांची विशेष अपेक्षा रहात नाहीं. तद्वतच, खऱ्या स्नेहाला सुरवातीस जरी वारवार पत्रव्यवहाररूपी जलसिंचनाची व प्रत्यक्ष भेटीरूप खताच्या साह्याची अपेक्षा असली, तरी एकदा तो खरोखर हृदयांत रुजला म्हणजे नतर या गोष्टींच्या अभावीं एखाद्या कोमल लतेप्रमाणें सुकून नष्ट होण्याचे त्याला कारण नाहीं. आतां भयकर

आणि मूलग्राही मतभेदाचे झंझावात सुटले तर स्नेहाचे जोरदार वृक्षही उन्मळून पडतील, किंवा पत्रव्यवहाराचीं आणि भेटीचीं अवर्षणें एकसारखीं वर्षानुवर्षे पडत राहिलीं तर ते सुकून जातील, ही गोष्ट निराळी. या अपवादात्मक परिस्थितीने सामान्य नियमाला बाध येत नाहीं.

माधव, तुझीं गेलीं तीन पत्रें मी आतापावेतों चारदां तरी वाचलीं असावीं. प्रत्येक वेळेस त्यातील मजकुरामुळें मला प्रस्तुतच्या बिकट परिस्थितींतही धीर वाटत असे. समोरून दुःखाचे तडाखे मनुष्याला कितीही जोरानें रेटीत असले तरी आपल्या पाठीमागें नुसतीच अफाट पोकळी नसून आसरा घेण्यास चांगलेसें स्थान आहे ही जाणीव त्याला पुष्कळच धैर्य आणून देते यांत शंका नाहीं. वाऱ्यानें फळाला कितीही जोरजोरानें हलविले तरी जोंपावेतों वृक्षाचा आश्रय सुटत नाहीं तोंपर्यंत फळ फारशी पर्वा करीत नाहीं.

तुझ्या ता. १५–४–३६ च्या पत्रातला शेवटचा मजकूर वाचला म्हणजे मात्र माझ्या डोळयात कृतज्ञतेचे अश्रूच उभे राहतात. ईश्वरानें मला असा थोर मित्र दिला ही त्याची मजवर मोठीच कृपा आहे. माझ्या मनांत हल्लीं जें विचारांचें काहूर माजून राहिलें आहे तें तू बरोबर हेरलेंस यात शंका नाहीं.

मी मानपूरहून इकडे येतांना आईस मुद्दामच आणलें नाहीं. आमच्या तेथील घरांत दोन तीन भाडेकरी राहतात त्यांचेकडून येणाऱ्या भाड्यावर हल्ली आम्ही खर्च भागवीत असतों. माझा येथे कोठेंतरी नीट जम बसेपावेतों तिला इकडे आणण्याचा विचार नाहीं. पण तो सुदिन केव्हा उगवेल हे मात्र आज सागता येत नाहीं. माझी लहान उपवर बहीण सरला हिच्या विवाहाचीही काळजी आहेच. आज अगदीं खाण्याची भ्रांत आहे अशी जरी सुदैवाने आमची

स्थिति नसली तरी शक्य तितक्या लवकर मला नोकरी लागल्याशिवाय आमचा गाडा फार दिवस सुरळीत चालू शकणार नाहीं हे उघड आहे. आणि म्हणूनच मी हल्लीं रात्रदिवस त्याच एका चिंतेत काळ कंठीत आहे. प्रथम प्रथम मला ही गोष्ट तितकीशी कठीण वाटली नाहीं. माझ्यासारख्या उत्तम प्रकारें एम्. ए. पास झालेल्याला आज-कालच्या काळांतही चाळीस पन्नास रुपये पगाराची कारकुनाची अगर शिक्षकाची नोकरी सहज मिळू शकेल असा मला भ्रम होता. पण लवकरच तो भ्रमाचा भोपळा फुटला आणि आज कित्येक दिवसापासून मी सत्य वस्तुस्थितीची समोरासमोर गाठ घेत आहे.

या माझ्या नोकरीच्या शोधात मला या जगाचे कितितरी मर्म-भेदक अनुभव आले ! प्रेमळ पित्याच्या सरक्षक छत्राखालीं कॉलेजच्या मोहमय विश्वात रममाण होणारा युवक त्या कवचाला भेदून बाहेर खऱ्या जगात आला म्हणजे त्याला तेच विश्व, त्याच व्यक्ति, तेच प्रसग, किती निराळया स्वरूपात दिसू लागतात ! पूर्वी तोंड भरून विद्यार्थ्यांना सच्छील, सदाचार, ध्येयवादित्व, इत्यादि गुणाबद्दल उपदेश करणाऱ्या कित्येक व्यक्ति आतां किती अरेरावीचे, आप-मतलबीपणाचे, किळसवाणे प्रदर्शन करतांना आढळून येतात ! पूर्वी विद्यार्थ्यांना ‘ यू आर् दि सॉल्ट ऑफ् दि नेशन् ’ ‘ तुम्ही राष्ट्राचे आधारस्तंभ ’ इत्यादि गोड गोड शब्दानीं चण्याच्या झाडावर चढ-विणारे काहीं पुढारी तोच विद्यार्थी आयुष्यातील अत्यत आणी-बाणीच्या प्रसंगीं त्याचेकडे मार्ग विचारण्यासाठीं गेला असतां, खुशाल बगला उच करून उदासीनत्वाचा आव आणतात ! कोणी स्वतःमात्र सबध वर्षांतून एक दिवसही आपली ऐषआरामी मोटर सोडून नुसते शहरांतील फूटपाथवरूनही पायीं न चालता, माझ्यासारख्या तरुणाना मोठ्या ऐटीने ‘ गो बॅक् टू व्हिलेजेस ’ ( खेड्यात जा ) असा उपदेश

करण्यास तयार असतातच ! आणि त्याबरोबरच या विविध प्रकारांतील अनेक व्यक्ति आपल्या एखाद्या नादान निकट आप्ताचा नोकरीसाठीं केलेला अर्ज मंजूर व्हावा म्हणून निरनिराळया ठिकाणीं वर्णी लावण्यासाठीं जिवाचें रान करून खेटे घालीत असतात ! माधव, आज आपल्या अभागी देशातील सर्व सुशिक्षितांची बेकारी एकदम दूर करण्याची गुरुकिल्ली या लोकाजवळ आहे असे माझे म्हणणें नाहीं. पण त्यातल्या त्यांत ज्यांच्या हातात थोडीबहुत सत्ता आहे त्यानीं तिचा न्याय्य व निःपक्षपाती उपयोग का करू नये ? सर्वसाधारणपणे प्रत्येक मनुष्य थोड्या फार अशाने स्वतःच्या व स्त्रीपुत्रांच्या बाबतींत स्वार्थी असणें हें साहजिक आहे हे मी मान्य करतो. पण जे स्वतःला पुढारी म्हणवितात किंवा तरुणाचे मार्गदर्शक समजतात त्यानीं तरी स्वतःच्या असल्या स्वार्थीपणाची स्पष्ट जाणीव स्वतःला असू द्यावी !

पण स्वार्थी व्यक्तीनें स्वतःच्या स्वार्थाची जाणीव असू द्यावी असे म्हणणें हें विषाने आपला उतारा जवळ बाळगावा किंवा जळत्या निखाऱ्याने आपल्या बरोबर जलाशय ठेवावा असा आग्रह धरण्यासारखेंच नव्हे का ?

तू मागील पत्रात सौ. वहिनींच्या शिक्षणाबद्दल ' यथातथा ' असा केवळ चाराक्षरीच खुलासा कां केलास ? यासबधात तुझ्या भावना किती तीव्र आहेत हे मला माहीत आहे. तुला त्या मार्गांत कांहीं अडचणी भासतात का ? माझ्या स्वतःच्या असहाय अवस्थेकडे पाहता तुला मी हा प्रश्न विचारणें निरर्थकच आहे म्हणा. पण, मित्रा, राहवत नाहीं म्हणून विचारले. ईश्वर तुझें जीवन सुखी करो.

तुझा मित्र,

**केशव दाते.**



## [८] कलेची आवड.

लखनौ, बुधवार ता. १५–७–३६

प्रिय मालतीस,

न. वि. वि. तू परवा पाठविलेलें पत्र आजच मिळालें. बराच विनोद करायला शिकली आहेस तू आता मालू पत्रें लिहिण्यात ! बी. ए. पास झाल्याचा आनद बोलतो आहे वाटतें हा सगळा ? पण मला तो आनदही नाही आणि तो विनोदही नाहीं. माझें सारें लिहिणे कठोर !

या पत्रातही तू लिहितेस कीं इकडे येण्याचा तुझा विचार आहे. येईन येईन म्हणतेस, पण येत मात्र नाहींस. विचार आचारांत केव्हा परिणत होणार ? तुझा विचार पुढें काय ठरला आहे शेवटीं ? तू बी. ए. ला घेतलेल्या विषयांत एम्. ए. होण्याची तेथें सोय नाहीं, आणि तुला त्यासाठीं तुझ्या घरचे स्वखुशीनें कोठें बाहेरगावीं एकटे जाऊ देतील असें मला दिसत नाहीं. येथेंच येईनास ? तुझे काकाही येथें मिलमध्यें मॅनेजर आहेतच. तुला कितितरी गोष्टी नवीन कळतील येथें. मेघातला जलबिंदू भेकडपणानें मेघातच राहू म्हणेल तर केवळ वाऱ्याबरोबर निराधारपणें वहात वहात अनत आकाशात निष्फळ गिरक्या घालण्यापलीकडे तो कांहींच करू शकणार नाहीं, तेच, धाडस करून तो लांबवर पृथ्वीतलीं येईल तरच त्याचें जीवन सार्थकीं लागून सृष्टीलाही फायदा होईल ! माझी आणि शरच्चद्र भट्टाचार्य नांवाच्या एका बंगाली तरुणाची ओळख झाली आहे. फार गोड स्वभावाचा आहे तो; दादाचा वर्ग-बधू होता गेल्यावर्षी. त्याला पेंटिंग इतकें चांगले येतें कीं सांगता सोय नाहीं ! भराभर उत्कृष्ठ चित्रें काढतो तो. कितितरी प्रदर्शनांत त्याला बक्षिसें मिळालीं आहेत. तो आणि मी चित्रकलेच्या व्यासंगांत खूप वेळ घालवीत असतों अलीकडे. तू इकडे

आलीस म्हणजे तुलाही त्याचा परिचय करून देऊन चित्रकलेची गोडी लावीन म्हणते !

'सुशिक्षिता' मासिकात माझा लेख लवकरच येणार आहे. आतापावेतो आला नाहीं याचे कारण परीक्षा व चित्रकलेचा नाद. आम्हा आधुनिक सुशिक्षित महिलाच्या बाबतींत कोकिळा वसंतावर अवलबून रहात नसून 'वसंत'च—नव्हे 'वसताचे घोळके'— कोकिळेच्या वाचेमागे फिरत असतात ! इतरांच्या बाबतींत तसे नसलें तरी महाकवींच्या बाबतींत 'वाचमर्थोऽनुधावति' असा प्रकार असतो ना, तसेच आजकालच्या जागृत झालेल्या शिक्षित महिलाबद्दल ! कळावें,

तुझी मैत्रीण,
**नंदिनी दप्तरे.**



## [९] उतावीळपणा करूं नकोस.

काचनपूर श्री. सोमवार श्रावण शु. २ शके १८५८

प्रिय मित्र केशव यास सप्रेम नमस्कार वि. वि.

तुझे ता. १५-७ चे पत्र पोचले. मजकूर समजला.

तुझ्या हल्लीच्या परिस्थितींत तुला जगाचे जे अनुभव येत आहेत ते वाचून मन विषण्ण होते. आपण सुखात असताना आपल्याशीं गोडीगुलाबीनें वागणारे लोक आपल्या अडचणीच्या प्रसगीं कसे वागतात यावरूनच त्याची खरी पारख होते. पण, मित्रा, मी तुला एक गोष्ट सुचवू का ? कधींकधीं आपण ज्याच्याकडून एखाद्या कृतीची अपेक्षा करतो ती करण्यास ते खरोखरच असमर्थ असतात; आणि मग त्यांच्या नकारामुळे आपण उतावीळपणाने त्याचेविषयीं विनाकारण वाईट ग्रह करून घेतो. कालातरानें आपण त्या स्थितीला पोहोचलों म्हणजे खरी परिस्थिति आपल्यास कळून येते. 'साभार परत' आलेली

स्वतःची लघुकथा पाहून संपादकाच्या नावानें जळफळणारा एखादा नवशिका लेखक कालांतरानें स्वतः संपादकाच्या खुर्चीवर विराजमान झाला म्हणजे तेंच अपरिहार्यपणें तो करू लागतो. शिक्षकानें अमलांत आणलेल्या शिस्तीच्या योग्य नियमाविरुद्ध ओरड करणारा विद्यार्थी स्वतः शिक्षक झाल्यानंतर त्याच नियमपालनाची अपेक्षा आपल्या विद्यार्थ्यांकडून करतो ! तुझ्या विचारांच्या बाबतींत असाच कांहीं प्रकार तर नाहीं ना ? तुझी विचारी वृत्ति मला माहीत आहे; पण उगीच शंका आली म्हणून लिहिलें. स्वतःवर ओढवलेल्या दुर्दैवी आपत्तीच्या जबाबदारीचें खापर इतर कोणाच्या तरी माथीं फोडून एक प्रकारचें उथळ समाधान मानून घेण्याचा प्रयत्न करणें हा साधारण मनुष्याचा मनोधर्मच आहे. आणि सुविचारी लोकही उद्वेगाच्या भरांत उतावीळपणानें इतरांवर कधींकधीं अन्यायाचे आरोप करतांना आढळून नाहीं का येत ? तुझा तपशीलवार अनुभव मला अद्याप कळला नसल्यानेंच मी ही शंका येथें व्यक्त केली आहे.

ते असो. पण, केशव, जातांजातां एक गोष्ट लिहावयाची आहे. भारतशिक्षणमंडळीच्या तर्फे इतिहास-शिक्षक पाहिजे म्हणून एक जाहिरात कांहीं दिवसांपूर्वी वाचण्यांत आली होती. तूं त्या जागे-संबधांत कांहीं खटपट केली असेलच. त्या संस्थेचे अध्यक्ष श्री. दप्तरे यांचाही तुझा थोडासा पूर्वपरिचय आहेच. आपल्याला कांहीं त्यांच्या परिचयाचा अयोग्य फायदा नको. पण तुझ्या हुशारीची त्यांना प्रत्यक्ष माहिती असल्यानें तुझ्या अर्जाचा विचार करतांना थोडीफार मदत होऊं शकेल असें वाटतें. कळावें, लोभ असावा हे विनंति.

तुझा मित्र,

**माधव मुंद्रे.** २०-७-३६



## [१०] दोष कोणाचा ?

माधव मुद्रे याच्या खासगी बहींतला उतारा.

शुक्रवार, श्रावण शु. ६ शके १८५८.

आज घरात यःकश्चित कारणाचा केवढा नायटा झाला आहे ! कोणाला काय म्हणावे हेच समजेनासे झाले आहे. घर काय किंवा समाज काय, त्यातील व्यक्तींनीं परस्पराबद्दल सहानुभूति आणि सहिष्णुतावृत्ति बाळगली नाहीं, तर एऱ्हवी अगदीं उपेक्षणीय असणाऱ्या प्रसगातून सुद्धा वितुष्टाची आग भडकण्यास काय उशीर ? आजच पहाना ! वास्तविक पाहिले तर कारण अगदींच क्षुल्लक. सौभाग्यवतीच्या एका मैत्रिणीनें तिला सायकाळीं सहज बसायला बोलाविले होते. पण हे निमत्रण आईजवळ न देता तिनें परभारे सौ.लाच रस्त्यात काल भेट झाली असता दिले होते. झाले, आईच्या मनाला वाटलें कीं यात तिचा अपमान झाला. तिचे म्हणणे कीं सासू या नात्याने प्रथम तिजजवळ निमत्रण येऊन नतर तिच्या परवानगीनेच सुनेने बाहेर जावयास हवे. त्यामुळे सायकाळीं चार वाजल्यानतर जेव्हा सौ.ने आईला जाण्याविषयीं विचारले तेव्हा आईने तिला परवानगी दिली नाहीं. सौ.ला साहजिकच राग आला, पण ती त्यावेळेस काहीं बोलली नाहीं. मात्र अग्नि आतल्या आत धुमसतच होता. पाच साडे पाच वाजेपावेतो वाट पाहिल्यावर सौ.चे मैत्रिणीने बोलावणे पाठविले. त्याप्रसगीं सौ.चे तोंडून त्या बोलाविण्यास आलेल्या मनुष्यास उद्देशून, पण वस्तुतः आईस लागेल असा, काहीं तरी उणाअधिक शब्द बाहेर पडला असे दिसतें. आणि मनोमालिन्याच्या आचेने आपलेपणाचा ओलावा आटून गेल्यानतर शुष्क झालेल्या मानसवाटिकेत उपरोधिक शब्दाची एखादी ठिणगीही अनर्थ करण्यास समर्थ ठरली तर त्यात नवल काय ?

तसें पाहिले तर आईने तरी असा अग्राह का धरावा ? सर्व

साधारणपणें विचार करिता वडिलांच्या परवानगीने लहानानीं बाहेर जाणें इष्ट असेल, आणि एखाद्या तिऱ्हाईत अनोळखी ठिकाणचें निमंत्रण असले तर तें प्रथम आईपाशीं जावे असें तिने म्हणणें शोभेलही. घरात, समाजांत, राष्ट्रात, विश्वात, तरुणांनीं वृद्धांच्या गतानुभवाचा फायदा घेऊन त्यांच्या सल्याकडे योग्य लक्ष पुरविण्याचा प्रघात ठेवला तर जीवनातल्या अनेक झांकलेल्या खाचखळग्यापासून त्यांना वाचतां येईल, व समाजधारणेच्या दृष्टीनेंही तें एकंदरींत हितावह ठरेल. पण याचा अर्थ तरुण व्यक्तींना स्वतत्र व्यक्तित्वच नाहीं असा कसा होऊ शकेल ? वृद्ध हयात आहेत तोपावेतों घरातलीं तरुण माणसें केवळ कुकुबाळ किंवा 'पॅरेसाइट्स्' होऊ लागलीं तर नंतरच्या जीवनात या तरुणांना एकदम स्वतःच्या पायावर यशस्वी रीतीनें उभें तरी कसें राहातां येईल ? सासू आहे तोपावेतों रोजच्या स्वयपाकासाठीं लागणारे दाळतादूळ देखील तिच्याच परवानगीने घ्यायचे; एक कवडीचेंही सामान खरेदी करावयाचें असल्यास तें तिच्याच पसतीनें घ्यावयाचें; सुनेला घालायला कपडे घ्यावयाचे असले तरी त्यांचा रग देखील सासूनेंच ठरवायचा, असा जेथें कडक दंडक असेल तेथे सुनेच्या व्यक्तित्वाची योग्य वाढ खुंटून तिच्या मनावर विपरीत परिणाम घडल्यावांचून कसा राहील ? तिची स्वतंत्र प्रज्ञा आणि तिचा आत्मविश्वास याची माती होऊन भावी कालात ससाराचें अवजड जूं तिच्या एकटीच्या मानेवर येऊन पडलें म्हणजे ती ते कितपत यशस्वी रीत्या वाहू शकेल ? एकतर ती स्वतः भविष्यकालीं स्वतःच्या सुनावर तसाच जुलुम करण्याचा प्रयत्न करून घरातलें वातावरण वशपरंपरेनें दूषित ठेवीत राहील; किंवा अत्यंत कडक शिस्तींतून एकदम मोकाट सुटल्यानें पूर्वीच्या बंधनावस्थेची तिच्या ठायीं प्रतिक्रिया सुरू होऊन ती 'मनःपूतं समाचरेत्' या न्यायाने वागूं लागेल !

घरातल्या महत्वाच्या घटनाच्या बाबतींत लहानांनीं स्वखुशीनेंच वडिलाची सल्लामसलत घ्यावी, आणि वडिलांनींही कांहीं तत्वाला बाध येत नसेल तर तपशिलाचे बाबतींत लहानाना त्याचीच स्वतत्र बुद्धि उपयोगांत आणण्यास नेहमी प्रोत्साहन देत रहावे, हाच् मला तरी यशस्वी कौटुबिक जीवनाचा सर्वसाधारण गुरुमत्र दिसतो.

बरे, सौ.ने तरी आईला लागेल असा उपरोधिक शब्द का उच्चारावा ? कोणता वडील मनुष्य लहानाचे तोंडून उपरोधिक भाषा सहन करू शकेल ? आणि नतर आईला अधिकच राग आला तर तें साहजिकच नाहीं का ? आईची मानापमानाची कल्पना या प्रसंगीं जरी चुकीची असली, तरी तिच्या स्वतःच्या मतानुसार ती काहीं गैर नव्हती. आईपावेतो जर निमत्रण प्रथम पोहोचलें असतें तर तिनें सौ.ला परवानगी दिली असती यात शंका नाहीं. समोरच्या गोपाळरावाच्या आईप्रमाणें माझी आई खात्रीनें सुनेच्या दुःखात आनंद मानणारी नाहीं. मग स्वतःला योग्य वाटते ते करीत असता एखाद्यानें-विशेषतः सुनेने—उपरोधिक भाषा काढावी हें तिला कसें सहन व्हावें ? सौ. नेंही आईने परवानगी नाकारल्यावर न जाण्यात जो शहाणपणा आणि सयम दाखविला त्या सगळयावर त्या एका उपरोधिक शब्दानें नाहीं का पाणी फिरविले ? तिनें जर शेवटपावेतो मुकाट्यानें सहन केलें असतें तर आईच्या मनावर इष्ट परिणाम घडून आलाही असता कदाचित्. आत्मक्लेशानें परकीयाचा हृदयपालट घडवून आणण्याची महत्वाकांक्षा आज बाळगली जात आहे; मग प्रत्यक्ष घरातल्या माणसांच्या मनावर कांहीं परिणाम होणार नाहीं असें कसें म्हणावें ?

पण स्वतःच्या मैत्रिणीच्या घरीं थोडा वेळ जाण्यापुरतेंही स्वातत्र्य आपल्यास नाहीं, हें पाहून देखील सौ.नें आपल्या मनाचा समतोलपणा व शांतपणा मुळींच ढळू न द्यावा असे म्हणणें हे सौ. कडून

आदर्शत्वाचीच अपेक्षा करणें नव्हे काय ? आणि प्रत्यही तिच्याकडून अशी अपेक्षा करणें हे तिजवर अन्याय करणें नाहीं का होणार ? परवांच कचेरींत न्यायाधीशानें माझा साक्षीदारासबधीचा अर्ज अन्यायानें नाकारतांच मला नाहीं का संताप आला ? पण पुन्हा असेंही वाटतें कीं, कुटुंबाच्या बाहेरील लोकाशीं यःकश्चित हक्कासाठीं सुद्धा आपण भांडतो, म्हणून ज्यांचा आपला रक्तामासाचा सबध आहे, ज्यानीं लहानपणापासून आपल्यासाठीं किंवा आपल्या अत्यत प्रिय माणसासाठीं नाना प्रकारच्या खस्ता खाल्या, कष्ट भोगले, अपेष्टा सोसल्या, त्याच्या वृद्धापकाळीं स्वतःच्या बारिकसारिक हक्कासाठीं त्याच्याशीं त्या प्रकारानें भांडणें कितपत् योग्य ठरेल ?

मनाचा कांहीं निश्चय होत नाहीं. इतकें मात्र वाटतें कीं, प्रथम आईनें परवानगी नाकारण्यात चूक केली आणि नंतर सौ.ने तिला लागेल असे उपरोधिक शब्द उच्चारण्यात चूक केली. पण आज तरी आईला तिच्या चुकीबद्दल कांहीं सागण्याऐवजीं सौ.ला तिची चूक समजावून देणेंच मला अधिक शक्य आहे. अनेक वर्षें अनुसरल्यामुळें मनात दृढमूल झालेल्या कल्पनांतील चुका स्वतःला समजत नाहींत, आणि इतरांनीं—लहानांनीं—त्या दाखविलेल्या आवडत नाहींत आणि पटतही नाहींत, हा वृद्धावस्थेचा एक मोठा शाप होय यांत शंका नाहीं !

२४—७—३६



## [११] मदोन्मत्त हत्ती आणि सुकुमार पुष्पें !

पार्वतीपूर		श्री.		शनिवार ता. १—८—३६

रा. रा. मित्रवर्य माधव यास सप्रेम नमस्कार वि. वि.

तुझें पत्र मिळालें. त्यानंतर आलेला एक मासलेवाईक अनुभव

तुला आज मी लिहून कळविणार आहे. यावरून तूं तुझ्या गेल्या पत्रांत व्यक्त केलेल्या शंकेलाही उत्तर मिळेल.

येथील प्रसिद्ध भारत-शिक्षण-मंडळीचे अध्यक्ष रा. दप्तरे यांचें कला व नीति या विषयावर झालेलें एक 'विद्वत्तापूर्ण' भाषण 'प्रभाकर' मध्ये व इतरत्रही तुझ्या वाचनात आलेंच असेल. या सद्गृहस्थांकडे मी परवां गेलों होतो. येथील ' भारत विद्यालय ' यांच्याच देखरेखीखालीं चालतें हें तुला माहीतच आहे. तू तुझ्या पत्रात लिहिल्याप्रमाणें या संस्थेत इतिहासशिक्षकाची एक जागा रिकामी असल्याचें वर्तमान पत्रातून दोन महिन्यापूर्वी प्रसिद्ध झाले होते. माझा अर्ज मी त्या जागेसाठीं योग्य मुदतींत रीतसर पाठविला होता; व सोबत उत्तरासाठीं एक आण्याचे तिकीटही ठेवलें होतें. पण जवळजवळ दीड महिना लोटला तरी अनुकूल अगर प्रतिकूल काहींच उत्तर आलें नाहीं. एखाद्या जागेसाठीं अर्ज केल्यानतर त्याचा निकाल कळण्यास बिचारे अर्जदार कठी प्राण घेऊन कसे उत्सुक असतात याची यांना अगदीं जाणीव नसावी ही खरोखर शरमेची गोष्ट आहे ! तसे पाहिलें तर यानीं आपल्या मेंदूला थोडासाही शीण दिला तरी आपण स्वतः कांहीं वर्षांपूर्वी कोणत्या परिस्थितींत होतो याची यांना स्मृति होऊं शकेल. पण तरीही उत्तरासाठीं तळमळणाऱ्या बिचाऱ्या अर्जदाराना नुसता नकारात्मक निकाल कळविण्याचे साधे सौजन्य देखील यांनीं दाखवूं नये ना ? मी म्हणतो, माधव, याना इतकेही करवत नसेल तर कमींत कमी जाहिरातींतच ' यशस्वी अर्जदाराना अमुक तारखेपावेतों निकाल कळविण्यात येईल ' इतकें तरी कां यानीं जाहीर करू नये ? त्यामुळें त्या विवक्षित तारखेनतर कितितरी अर्जदारांचे जीव एकदाचे खालीं पडतील. प्रत्येक दिवशीं अर्जदारांचीं, आणि त्याबरोबरच यांच्या निकालाकडे आशाळभूतपणें डोळे लावून बसणाऱ्या त्याच्या आप्तांचीं

अंतःकरणें निराशेच्या खडकावर थोडीं थोडीं घासून झिजविण्यांत हे कोणता पुरुषार्थ साधतात? सर्व अर्जदारांचे अर्ज मंजूर करणें यांना शक्य नाहीं हें कबूल, पण त्याना शक्य तितक्या सौजन्यानें आणि सहानुभूतीनें वागविणें हें तर यांच्या हातचें आहे ना?

असो. लिहिण्याच्या ओघात मी तुला श्री. दत्तऱ्यांचा मला परवां आलेला अनुभव सागण्याऐवजीं थोडासा भलतीकडेच वहावलों! गेल्या कांहीं महिन्यांतील अनपेक्षित कटु अनुभवानीं माझें अतःकरण इतकें पोळलें आहे कीं, सहानुभूतीचा—खऱ्या सहानुभूतीचा—ओलावा पाहिला म्हणजे मनांत वारवार उसळणारे विचार तेथे सांगून अतः करणांतला दुःखदायक ताप कमी करावासा वाटतो. मृगजळाच्या आभासाप्रमाणें सहानुभूतीच्या बाबतींतही फसून दुःख करीत बसण्याचा प्रसंग श्री. दत्तरे यांच्यासंबंधांत मजवर नुकताच आला. दीड महिना झाला तरी अर्जासबधीं कांहींच कळले नाहीं म्हणून मी शेवटीं एक दिवस त्यांना शाळेच्या कचेरींत भेटण्याचें ठरविलें. कॉलेजमध्यें आपण शिकत असतांना व्याख्याने ठरविण्यासाठीं आपण त्याची तीनचारदां भेट घेतली होती, आणि कॉलेज मॅगेझीन् मधील माझ्या लेखांबद्दल त्यांनीं माझी प्रशंसाही केली होती हें तुला माहीतच आहे. म्हणून ते मला अगदींच तिऱ्हाईत अपरिचिताप्रमाणें वागविणार नाहींत असें मला वाटत होतें. पण काय सांगू? तास दीड तास बाहेरच खोटी झाल्यानंतर, माझ्या नांवाची चिठ्ठी घेऊन आत गेलेला कारकून पुनः बाहेर येऊन त्यानें मला जो निरोप सांगितला त्यावर प्रथमदर्शनीं माझा विश्वासच बसेना! 'इतके दिवस उत्तर न येण्याचा अर्थ ज्याला समजत नाहीं अशा रिकामटेकड्या मूर्खाशीं बोलण्यांत व्यर्थ घालविण्यासाठीं मज-जवळ फालतू वेळ नाहीं' अशा अर्थाचे इंग्रजी शब्द होते ते! शब्द कसले चटकेच म्हणेनास! माधव, खरेंच सांगतों, मला ती जागा न मिळा-

त्याचें इतकें वाईट वाटलें नाहीं, या घोर अपमानाचें मरणप्राय दुःख झालें ! नकारात्मक उत्तर एकदा मिळाल्यानंतर पुन्हा तर मी त्यांचेपाशीं गेलों नव्हतो ना ? पण ऐश्वर्य आणि सत्ता यानीं धुद झालेल्यांना माझ्यासारख्या गरीब तरुणाची काय तमा ? मदोन्मत्त हत्तीनें बेदरकारपणें धावताना कधीं रस्त्यावर पडलेल्या सुकुमार पुष्पांची काळजी घेतली आहे ? स्वशक्तीच्या गर्वाने अंध झालेल्या झंझावातानें कधीं कोमल लतावेलींची पर्वा केली आहे ? सपाट्यात येईल तें जाळत सुटणाऱ्या सर्वभक्षक प्रचंड वणव्याने कधीं लहानशा सुंदर गोगलगाईची चिंता बाळगली आहे ? विषण्ण मनानें, जड अंतःकरणानें आणि साश्रु नयनानीं मी तेथून परत येण्यास निघालों. येतांना दप्तऱ्याच्या कचेरींतून हास्याचा ध्वनि, चहाच्या पेल्याचा आवाज आणि विनोदी कोलाहल माझ्या कानावर आला, पलीकडेच एक विद्यार्थी दुसऱ्याला 'हे पहा आमचे नवे इतिहासाचे मास्तर' असें सांगत, हातांत हजरीपत्रक घेऊन चाललेल्या एका गृहस्थाकडे बोट दाखवीत होता !

माधव, लिहिता लिहितां माझी चर्पटपंजरी बरीच वाढली. निरर्थक आहे ती सारी ! या जगात बेकारांचीं दुःखें बेकारच पूर्णपणें जाणूं शकतात ! तुला सारें वाचता वाचतां कंटाळा आल्यास सोडून दे. पण तुझ्या स्नेहार्द्र हृदयाची मनात मला खात्री असल्यानेंच लिहिलें आहे हें. मात्र तू उगीच मजविषयीं काळजींत पडूं नकोस. कळावें, लोभ असावा हे विनंति.

तुझा मित्र,

**केशव दाते.**

---

## [१२] भारतीय स्त्रियांचे नांव उज्वल करीन !

लखनौ, शनिवार ता. १५–८–३६

ती. रा. बाबास नंदिनीचा नमस्कार वि. वि.

तुमचें पत्र आलें तें पावले. मजकूर समजला. आईनें आमच्यासाठीं प्रेमाने पाठविलेल्या वस्तूही पोचल्या. गेल्या उन्हाळयाच्या सुटींत मी व दादा तेथें आलो नाहीं म्हणून आई रागावल्याचें तुम्ही लिहिले आहे, पण आम्ही येथे का राहिलो याचे कारण तुमच्या स्वतःच्या पूर्णपणे ध्यानात येईल व म्हणून निदान तुमचा तरी गैरसमज होणार नाही अशी खात्री वाटते. माझ्या चित्रकलेच्या प्रेमाची आणि दादाच्या गायन व अभिनयकलेच्या प्रेमाची बिचाऱ्या आईला काय कल्पना येणार? तरी तुम्ही तिचे योग्य समाधान करालच.

बाबा, मी यदा इटरमीजिएट् पास झाल्याबद्दल तुम्ही माझें अभिनदन केलें याबद्दल मी तुमची आभारी आहे. पण माझी चित्रकलेंत होत असलेली प्रगति तुम्हाला कळली म्हणजे तर तुम्हाला खात्रीनें अधिक आनद होईल. यदा येथील प्रातिक प्रदर्शनात माझ्या चित्राला चवथ्या नबरचे बक्षीस मिळालें ! स्त्री-विभागात तर माझा नंबर पहिलाच आला. माझा मित्र शरच्चद्र भट्टाचार्य याला एकदर प्रदर्शनांत दुसऱ्या नंबरचे बक्षीस मिळाले. शरच्चद्राविषयी माहिती मी मागें तुम्हाला कळविलीच आहे. फारच सुंदर आणि जलद चित्र काढतो तो. यदा बी. ए. पास झाला असून येथील एका शाळेंत सध्या मास्तर आहे. समोर बसलेल्या व्यक्तीचें चित्र रेखाटण्याचा अभ्यास हल्ली तो व मी करीत आहोत. मी नुकतेच काढलेलें भिक्षेकरिणीचें एक चित्र यासोबत पाठवीत आहे.

चित्रकलेंत माझी अशीच प्रगति होत राहिली तर लवकरच भारतीय स्त्रियांचें नांव चित्रकलेच्या प्रातात मी उज्वल करीन अशी मला महत्त्वाकांक्षा वाटते ! आणि तसे झालें तर, बाबा, तुमचें नांव माझ्या स्मरणांत नेहमीच कृतज्ञतापूर्वक राहील. कलाप्रेमाची महती समजणारे आणि त्याला प्रोत्साहन देणारे तुमच्यासारखे पालक आज

हिंदुस्थानांत —व विशेषतः आमच्या समाजात— कितीसे आहेत याचा विचार केला म्हणजे मला व दादाला तुमचा फार अभिमान वाटतो. आपल्या मालती कोपरेची चुलत बहीण सुशिला येथे आहे, तिचीच गोष्ट पहाना ! तीही माझ्याबरोबरच आर्ट्स् स्कूलमध्यें भरती झाली असून ती सुद्धा हळूहळू प्रगति करीत आहे, पण आज ती माझ्या मागे पडली आहे. ती कमी हुशार आहे असे नाहीं, पण तिचे वडील तुमच्याप्रमाणे उदार मताचे नसल्यानें ते तिला अनिर्बंध कलोपासनेचा आनंद घेऊ देत नाहीं. पौर्णिमेच्या रात्री चांदण्याच्या शीतल प्रकाशात न्हात्याच शांत प्रकृतीच्या रजनीशी हळूहळू कानगोष्टी करीत आरामानें पहुडलेल्या सृष्टिदेवतेचा देखावा चित्रित करण्यासाठीं आम्ही येथून जवळच वस्तीबाहेर असलेल्या तलावावर अगर टेकडीवर कधीं कधीं जाऊन बसतों, पण त्यावेळेस तिला पाठविण्यास तिचे वडील कधीं तयार होत नाहींत ! तिची स्वतःचीही प्रवृत्ति तितकीशी स्वतंत्रताप्रिय नाहीं, यामुळे तिलाही असल्या रूढ नियमनाचा जाच भासत नाहीं. उलट माझ्याशीच वादाविवाद करते ती केव्हाकेव्हा !

'प्रभाकरात' प्रसिद्ध झालेले तुमचे भाषण आमच्या वाचण्यात येथे आलें. फार आवडलें ते आम्हाला. कलोपासनेला नीतिनियमांनीं जखडू पहाणाऱ्याची चांगली हजेरी घेतली तुम्ही ! मी म्हणते, तुम्हाला विरोध करणाऱ्याना कलाप्रेमाचा खरा अनुभवच आला नसावा कधीं ! नाहींतर आपल्या कलेच्या अभ्यासात मन पूर्णपणें तल्लीन झालें असतांना इतर सर्व गोष्टी कशा कःपदार्थ वाटू लागतात याची जाणीव त्याना झाली असती. मी तर बाबा एकदां चांगलेसे चित्र काढायला बसले कीं साऱ्या विश्वाचा विसर पडतो, दुसरे तिसरे विचारच येत नाहींत माझ्या मनांत. आणि एकदा का तें चित्र चांगलें वठलें म्हणजे जो आनंद होतो तो केवळ अवर्णनीयच ! दादाचेंही तसेंच. आपल्या

कलेच्या अभ्यासांत तो जेव्हां तल्लीन होऊन जातो तेव्हां पहाण्यासारखें असतें.

तो गेल्या वर्षी बी. ए मध्यें पुनः नापास झाला ही खेदाची गोष्ट आहे. पण यंदा मात्र त्याला पास होण्याची बरीच उमेद आहे.

माझें एक चित्र येथील प्रसिद्ध हिंदी मासिक ‘ गणेश ’ मध्यें लवकरच प्रकाशित होणार आहे. या बाबतींत आपली मराठी मासिकें बहुतेक सारीं अगदींच भिकार ! स्वस्तात पडणारीं सिनेमातल्या दृश्याचीं चित्रें दिलीं म्हणजे त्यांचें समाधान होतें. उलट, हिंदी व बंगाली मासिकें नेहमीच खऱ्या चित्रकलेला उत्तेजन द्यायला तयार असतात. तो अंक प्रकाशित झाला म्हणजे तुमच्याकडे एक प्रत मी अवश्य पाठवीन. कळावे, आईस आमचा नमस्कार. चि. बाबूस आशीर्वाद.

तुमची कन्या,

**नंदिनी.**



## [१३] कमलिनी आणि बगळे.

कांचनपूर श्री. सोमवार, श्रावण ३० कृ.शके १८५८

प्रिय मित्र केशव यास सप्रेम नमस्कार, वि. वि.

तुझें ता. १-८ चें हृदयस्पर्शी पत्र मिळालें. तें वाचल्यानंतर ‘ नरेंच केला हीन किती नर ’ या कव्युक्तीची तीव्रतेनें आठवण झाली.

या विश्वांत निसर्गनिर्मित दुःखें अधिक आहेत किंवा मानवनिर्मित दुःखेंच अधिक आहेत हा एक खरोखर खोल विचार करण्यासारखा प्रश्न आहे. श्री. दप्तरे यांनीं तुझ्याशीं केलेल्या वर्तनाची हकीगत संतापजनक आहे. ते तुझ्यासारख्या हुशार व सालस विद्यार्थ्यांशीं असें वर्तन करतील असें मला वाटलें नव्हते. पण तसें पाहिलें तर त्यांत विशेष आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. ज्यावेळेस आपण

मागें विद्यार्थी असताना त्याचेकडे जात होतों त्यावेळेस त्याची प्रतिष्ठा वाढविण्याचें एक साधन या दृष्टीनें ते आपल्याकडे पहात असावेत. आज तू एक यःकश्चित अर्जदार असताना तुझ्या द्वारें त्याचा कोणता स्वार्थ साधणार ? मग काय म्हणून ते तुझ्याशीं सभ्य वागतील ? अ पासून ज्ञपावेतों जीवनाचा सारा पसारा स्वार्थानें लिडबिडलेला !

सुदैवाने, बाळू, जगातल्या साऱ्याच व्यक्तींनीं आपले आत्मे अशा प्रकारें स्वार्थाला विकलेले नाहींत; आणि म्हणूनच समाधानाला कांहींशी जागा आहे. माझ्या स्वतःविषयीं विचारशील तर माझ्या आजपावेतोंच्या जीवनात उच्च पदाधिकारी व्यक्तींच्याकडून अधिकार-मदात निष्कारण अपमानित होण्याचे प्रसग जेव्हा जेव्हा मजवर आले, तेव्हा ' महोच्चैः पदाना नियतृ त्वमेकम् ' हा चरण आठवून मी माझ्या मनाचें समाधान करीत आलों आहे. उगीच नाही महात्मा गांधींनीं या चरणाला आपल्या प्रातःकाळच्या प्रार्थनेंत स्थान दिलें ! तू स्वतःही सुज्ञच असल्यानें मी तुला विशेष काय सागावें ? पण आपण मागे एकदा वाचलेल्या पुढील मार्मिक श्लोकाची मात्र येथें आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं.

कमलिनि मलिनीकरोषि चेतः । किमिति बकैरवहेलिताऽनाभिज्ञैः ॥
परिणतमकरदमार्मिकास्ते । जगति भवतु चिरायुषो मिलिंदा : ॥

कालातरानें हे उद्दाम बगळे विस्मृतीच्या अपार उदरांत गडप होऊन जातील; पण कमलिनी मात्र—ती खरोखरच शुद्ध व निष्पाप असली तर—आपल्या गुणसौरभानें खऱ्या रसिक जगाला तोषवीत राहील ! एक्कयातून मोहनदास करमचद गाधीला उन्मत्तपणें ' कूली ' म्हणून खालीं ढकलणारे, वर्णद्वेषाच्या भुताने भारलेले, गोरे आफ्रिकन आज कोठें आहेत ? उलटपक्षीं महात्मा गाधींनीं आज विश्वाच्या संसारात, मानवजातीच्या इतिहासांत कोणतें स्थान प्राप्त करून घेतलें आहे ?

तुझ्या गुणाचे चीज करणारे गुणज्ञ तुला लवकरच लाभोत अशी माझी ईश्वराजवळ अंतःकरणपूर्वक प्रार्थना आहे. पण तो सोन्याचा दिवस उगवेपावेतो—आणि पुढेमागे तो केव्हातरी उगवेल याबद्दल मला शंका वाटत नाहीं—तुला कोणत्याही प्रकारची मदत लागल्यास तूं मला कळविण्यास सकोच करू नको. याशिवाय मी तुला एक दुसरीही प्रेमाची सूचना करणार आहे. तुझ्याबद्दल मला जी माहिती आहे त्यावरून तू हल्लीं देखील फारसा कोणाकडे न जाता नेहमी स्वतःशींच विचार करीत बसत असावास असे वाटते. विनाकारण उठल्या सुटल्या कोणाकडे जाऊन रिकामटेकड्या बाता आणि कुटाळक्या करणें तुला आवडत नाहीं त्याबद्दल माझे काहींच म्हणणे नाहीं. पण मधून मधून एखाद्या योग्य व्यक्तीकडे जाऊन चागल्या विषयांवर विचार-विनिमय केल्यास तुला पुष्कळ बरें वाटेल. तुला मी मागें 'प्रभाकर' चे संपादक आणि आतां माझे श्वशुर रा. तात्यासाहेब डोळे याचेकडे बरो-बर दोनतानदा नेलेंही होते. पण तुझ्या सकोची—आणि स्पष्ट लिहा-वयाचें म्हणजे कांहींशा एकलकोड्या—स्वभावामुळे तूं त्याचा चागला परिचय करून घेतला नाहींस. आज तो परिचय तुझ्या चांगल्या कामाला आला असता. तुला आजच्या परिस्थितींत योग्य उपदेश व प्रोत्साहन देणारी अधिक चागली व्यक्ति क्वचितच आढळेल. अजूनही तूं त्यांचा निकट परिचय करून घ्यावा अशी माझी इच्छा आहे. त्याचे राहण्याचें ठिकाण तुझ्या घरापासून काहीं अतरावर असलें तरी एखादे दिवशीं सायकलवर तू तेथें सहज जाऊ शकशील. कळावें, लोभ असावा हे विनंति.

तुझा मित्र,

**माधव मुद्रे.** १७-८-३६

## [१४] एक घरगुती पत्र.

पार्वतीपूर. श्री. सोमवार, १९-१०-३६

चि. रा. माधवराव यास सप्रेम आशीर्वाद,

पत्र लिहिण्यास कारण कीं, बरेच दिवसात चि. सौ. विमलाची भेट न झाल्यानें तिला कांहीं दिवसासाठीं इकडे बोलाविण्याचा विचार आहे. तिच्या आईला आणि लहान भावडाना तिची फार आठवण होत असते. तरी आपल्या पूज्य मातापित्याची हरकत नसल्यास तिला कांहीं दिवसासाठीं इकडे पाठवावे अशी विनंति आहे. आपले होकारात्मक उत्तर आलें म्हणजे सोयीनुसार इकडून कोणास घेण्यासाठीं पाठवीन.

अलीकडे 'प्रभाकरा'त बरेच दिवसात आपला कांहींच लेख आला नाहीं. आपला माझा परिचय कांहीं नवा नाहीं. आपण विद्यार्थिदशेंत होता तेव्हापासून आपला व माझा परिचय आहे. पुढें चि. विमलेचा आपल्याशीं विवाहाचा भाग्यशाली योग जुळून आल्यानें या परिचयास निकट संबंधाचें स्वरूप प्राप्त झालें. पण यामुळें 'प्रभाकरा'चा लेखनसाह्यार्थ आपल्याकडे पाहण्याचा हक्क कमी होत नसून उलट वाढलाच आहे. आपल्यावर माझा भरवसा आहे, आणि आपल्या सुविचारी मताविषयींही मला विश्वास आहे. आपल्याकडून उत्तम प्रतीच्या लेखाची मी नेहमीच अपेक्षा करीत असतो. कळावे, हे आशीर्वाद. पत्राचे उत्तर लवकर यावें. आपला,

**गोविंद महादेव ढोळे.**

हेंच पत्रीं चि. सौ. बेबीस आशीर्वाद. बरेच दिवसांत तुझें पत्र कां बरें आलें नाहीं ? आम्ही सर्व जण तुझी वाट पहात आहोंत.

तुझा, **तात्या.**

## [१५] कुटुंब कीं देश ?

पार्वतीपूर.　　　　　श्री. मगळवार, ता. २०–१०–३६

रा. रा. मित्रवर्य माधव यास सप्रेम नमस्कार, वि. वि.

तुझें मागील पत्र आल्यानंतर या भूतलावर मानवदेह धारण करून वावरणाऱ्या कांहीं प्राण्याच्या अनेक चिरस्मरणीय अनुभवांनीं तुझ्या या भाग्यशाली मित्राचें जीवन समृद्ध झालें आहे ! ते सर्वच अनुभव तुला सांगत बसण्यात अर्थ नाहीं. पण त्यातले काहीं मासलेवाईक अनुभव तुला लिहून कळविले तर आणखी कांहीं नाहीं तर निदान तुला मौज तरी वाटेल. शिवाय त्यावरून माझ्यासारख्यांची आजकाल खरोखर काय स्थिति असते तेंही तुझ्या ध्यानांत येईल.

मला गेल्या कांहीं महिन्यापासून येथील रावबहादुर माने, सेवा-निवृत्त एक्साइज् ऑफिसर, याचेकडे एक शिकवणी लागली आहे. त्यांचा एक मुलगा यदा प्रवेशपरीक्षेला बसणार असून मी त्याला शिकवीत असतों. सात आठ दिवसांपूर्वीची गोष्ट. त्याला परीक्षेसाठीं जे हिंदुस्थानच्या इतिहासाचें पुस्तक नेमलें आहे त्यात जालियनवाला-बागची कत्तल व तदनतरच्या कांहीं घटना यांविषयीं अगदी त्रोटक माहिती दिली असून त्यातलीं काहीं वाक्यें तर दिशाभूलकारक आहेत असें मला आढळून आले. त्या मुलाला या सबधातली खरी हकीगत कळावी या हेतूनें मी माझ्या जवळचें महात्मा गांधींचें आत्मचरित्र बरोबर नेऊन एक दिवस त्याला त्यांतले काहीं उतारे वाचून दाखवीत होतो. इतक्यांत त्याचे वडील स्वतः तेथून चालले असताना त्यांचे कानांवर त्यांतले कांहीं शब्द आले. झालें, लागलीच— आळशाच्या घरीं गंगा स्वतः चालून आली आणि त्यानें तिला झिडकारलें !

‘ काय मास्तर ! कोणतें पुस्तक शिकाविणें चाललें आहे ? ’ एकदम थबकून रावबहादुरांनीं विचारलें.

अगदीं अनपेक्षित असा तो त्याचा प्रश्न ऐकून मी वाचता वाचता थाबलों आणि उत्तर दिले : ‘ याच्या इतिहासाच्या पुस्तकात जालियनवाला बागेच्या कत्तलीचा उल्लेख आला आहे, त्याची खुलासेवार माहिती याना व्हावी म्हणून महात्मा गाधींच्या आत्मचरित्रांतले काहीं उतारे वाचून दाखवीत होतो. ’

‘ म्हणजे तो इतिहास लिहिणाऱ्यापेक्षा आणि विद्यार्थ्यांसाठीं तो नेमणाऱ्या अधिकाऱ्यापेक्षा तुम्ही स्वतःला अधिक शहाणे समजतां म्हणावयाचे ! मास्तर, हीं असलीं भलतींसलतीं पुस्तकें वाचून दाखवून माझ्या मुलाचे मन बहकाविण्यासाठीं तुम्हाला पैसे देऊन नेमलें नाहीं मी. माणसाने स्वतःची योग्यता समजून रहावे. त्याला परीक्षेसाठीं जीं पुस्तके नेमलीं असतील तितकींच करून घेण्याचें तुमचें काम आहे. त्याच्या बाहेर जाऊन पुन्हा हीं असलीं पुस्तकें वाचून त्याला बिघडविण्याचा प्रयत्न कराल तर लक्षात ठेवा ! दुसरे मास्तर कांहीं थोडे पडले नाहींत गावांत ! ’

थक्कच झालों मी अगदीं ! पण काहीं विचार मनात येतो न येतो तोंच दारातून मागें वळून रावबहादुर पुनः गरजले, ‘ आणखी हें पहा मास्तर, उद्यापासून ती गाधी टोपी बदलून दुसरी घालावयाची असेल तरच तुम्ही येथें येण्याची तसदी घ्या. त्या गाधीनें तिथें बसल्या बसल्या कांहीं तरी खुळें काढावीं आणि तुमच्यासारख्या दीडशहाण्या तरुणानीं मूर्खासारखे त्यांच्या मागे धावावें ! ’

माधव, इतका सताप आला मला त्या वेळेस त्या गृहस्थाचे हे प्रलाप ऐकून, कीं वाटलें द्यावा याला असाच एक चागला खणखणीत जबाब आणि बाहेर पडून ठोकावा रामराम कायमचा त्या घराला. आज अत्यत नीतिमान सत्पुरुष, खिस्तबुद्धादिकाचे आधुनिक अवतार, महान अलौकिक विभूति, म्हणून केवळ पौरस्त्यच नव्हे तर पाश्चात्य

भौतिकवादी जगही ज्याना शिरोधार्य मानते, ते महात्मा गांधी खुळचट आणि त्यांचें विश्वप्रसिद्ध आत्मचरित्र मुलाना बिघडाविणारे ! क्षणमात्र मनांत विचार चमकून गेला कीं, पुन्हा म्हणून या घराची पायरी चढूं नये. ज्याला शिकवायचे त्याच्याचसमोर असा अपमान झालेला सहन करावयाचा, आणि निर्लज्जाप्रमाणे पुन्हा दुसरे दिवशीं त्याला शिकविण्यासाठीं यायचें !

पण—माधव, तू काहींही म्हण, टीकाकार काहींही म्हणोत—वरील विचार माझ्या मनात येतो न येतो तोच दुसऱ्या क्षणीं माझ्या अंतश्चक्षूसमोर माझ्या वर्तमानकाळातील परिस्थितीचें, असहायतेचें, मानपूरला माझ्याकडे आशेने डोळे लावून बसणाऱ्या मातेचे आणि उपवर भगिनीचें, आणि त्याबरोबरच या शिकवणीपासून मिळणाऱ्या पंधरा रुपट्टींचें चित्र स्पष्टपणें उभे राहिलें, आणि जी गोष्ट मी दोन वर्षांपूर्वी स्वप्नांतही केली नसती ती करण्यास मी आतां प्रत्यक्ष तयार झालों ! दुसरे दिवशीं मुकाट्यानें टोपी बदलून ठरलेल्या वेळेवर मीं—नव्हे, पूर्वीच्या स्वाभिमानी केशवाच्या भुतानें—रावबहादुर मान्याच्या भव्य बंगल्याच्या पायरीवर पाय ठेवला. रावबहादुर सिगारेट ओढीत बाहेरच उभे होते, कदाचित ते मुद्दामच या वेळेस तेथें उभे असावेत. क्षणमात्र त्यानीं माझ्याकडे, माझ्या टोपीकडे, पाहिले. मी देखील त्याना नमस्कार केला आणि आवढा आंतल्या आत गिळीत अभ्यासाच्या खोलींत जाऊन पोपटाप्रमाणे बडबडण्यास आरभ केला !

माझा स्वतःचाच मला अत्यत तिरस्कार वाटला त्यावेळेस. असले अपमानास्पद जिणें जगण्यापेक्षां मेलेलें काय वाईट ? पांच वर्षांपूर्वी गांधीटोपीशिवाय इतर कोणतीही टोपी न वापरण्याचा निश्चय किती मनापासून आपण दोघानीं केला होता ! माधव, मरणा-बद्दल इतकें वाटत नाहीं, या मरणप्राय जिण्याबद्दल तिरस्कार वाटतो

रे. आणि आज तें जिणें भोगणें भागच आहे. कारण मी एक मेल्यानें माझी जरी या स्वार्थी विश्वातून तात्पुरती सुटका झाली, तरी माझ्यावर अवलंबून असणाऱ्या त्या दोन जीवाचें काय होणार ? अशा स्थितींत मरणें हा सुद्धा एक स्वार्थाचाच प्रकार नव्हे काय ? तरी बरें, आणखी कोणते पाश माझ्या गळ्यात आज नाहींत.

बेकार मनुष्य स्वाभिमानाला देखील मुकतो. आणि ज्याला स्वाभिमान नाहीं तो देशाभिमान काय दाखविणार ? स्वतःचा चरितार्थही चालविण्यास जो असमर्थ आहे तो देशबांधवाचें दारिद्र्य काय दूर करणार ? स्वतःचा संसारही ज्याला 'नेटका' करता येत नाहीं तो देशाचा प्रपंच काय करणार ? ज्याला स्वतःलाच आपल्या पायावर उभे राहण्याचें सामर्थ्य नाहीं त्याने राष्ट्राचा गाडा खेचण्याच्या बाता कशाला माराव्या ? जो दानधर्म एखाद्या धनवानाला कीर्ति मिळवून देईल तोच एखाद्या निर्धनाला उपासमारीची वाट दाखवेल. महापुरानें आनंदित झालेली गंगा नदी रौद्रगीत गात गात दुथडी वहात असतांना, किंवा खेळकर वायुलहरींनीं समुद्राच्या शांतवृत्तीचा भलताच फायदा घेऊन त्रासदायक रीतीनें डिवचण्यास प्रारंभ केल्याने नदीपति खवळलेला असताना, एखादी प्रचंड आगबोट बेडरवृत्तीनें डोलत आपला मार्ग काढीत जाते, म्हणून जिला आपला स्वतःचाच तोल नीट सांभाळता येत नाहीं अशा एखाद्या लहानशा होडीनें आणखी चार उतारूच्या जीवाची जबाबदारी स्वतःवर घेऊन त्या भयानक जलप्रवाहात प्रवेश केला, तर दुसरे दिवशीं भयंकर अपघाताच्या वार्तेने स्थानिक वृत्तपत्राची विक्री वाढविण्यापलीकडे दुसरा कोणता इष्ट परिणाम होणार ? वेगवान वायूच्या जुलमी प्रवाहाला विरोध करतांना जो ताठरपणा एखाद्या भव्य वृक्षाला शोभा देईल तोच दुसऱ्याच्या आसऱ्यानेच आपलें जीवन कंठणाऱ्या लतेला नाशकारक ठरल्यावाचून राहणार नाही.

लढाऊ राजकारण, प्रचंड त्याग, जळजळीत स्वाभिमान, जाज्वल्य देशाभिमान, कडक तत्वनिष्ठा, हे गुण जे आर्थिक दृष्टया स्वतंत्र आहेत त्यानाच शोभतील. इतराच्या बाबतींत या गुणाच्या प्रखर तेजाचा उपयोग संसाराची होळी करण्याकडे मात्र होईल. 'निस्पृहस्य तृण जगत्' हे खरें, पण मनाची तितकी तयारी होत नाहीं तोंपावेतों ज्यानें त्यानें आपली कुवत पाहून उडी टाकावी हेंही तितकेच खरें आहे. गरुड पक्षी समुद्रावर लांब लाब भराऱ्या मारतो म्हणून एखादी टिटवी तसें करू म्हणेल, तर किनाऱ्याच्या जवळच कोठें तरी जलचराना किंचितसें खाद्य मिळवून दिल्याचें श्रेय मात्र तिच्या पदरात पडेल !

आणि एखाद्या गरुड पक्षाच्या पिलानेंही आवश्यक शारीरिक वाढीची वाट न पहातां अल्पवयातच एखादें महान उड्डाण आरभिलें तर त्याचा परिणाम तरी काय होणार ? योग्य कालावधीनतर जो वटवृक्ष झंझावातालाही टक्कर देऊ शकेल तोच रोपट्याच्या अवस्थेंत असताना उन्मत्त वायूच्या प्रबळ प्रवाहापुढें न लवल्यास, तुफानांत इतरांना आश्रय देण्याचें जें सत्कार्य तो पुढें करू शकला असता तेंही करण्यास तो असमर्थ होईल.

अगदीं आणीबाणीची अगर निकराची परिस्थिति सोडली तर एकदरींत पहातां, कांहीं एका मर्यादेपर्यंत स्वतःची वाढ होई-पावेतों प्रातिकूल आघात दुःखानें पण मुकाट्यानें सहन करणेंच राष्ट्राला आणि व्यक्तीलाही शहाणपणाचें होईल असें आज तरी मला वाटतें.

माधव, नानाविध दुःखांनीं गांजलेल्या या आपल्या अभागी मायदेशात आज माझीच स्थिति अशी आहे असें नसून, किती तरी शेकडो तरुण आज याच परिस्थितींतून होरपळून निघत असून स्वाभिमान-शून्यतेच्या नरकांत खिचपत पडले आहेत. समाजांतील या दिङ्मूढ

झालेल्या प्रचंड घटकाला कांहीं तरी योग्य दिशा मिळाल्याशिवाय राष्ट्राचें पाऊल पुढें कसें पडणार ? दिवसेंदिवस अधिकाधिक बिकट होत चाललेल्या या जिव्हाळयाच्या प्रश्नाकडे देशांतले कर्तेपुरुष आणखी किती दिवस डोळेझांक करणार ? आज तरी उपाययोजनेच्या दृष्टीनें मला अधारच दिसत आहे. बिचारे शिक्षित तरुण ! हाडाचीं काडें करून परीक्षांच्या दिव्यांतून पदवीच्या फुग्यासह बाहेर यावयाचें; आणि जीवनाच्या जळत्या खाईत पडल्यावर प्रत्यक्ष व्यवहाराच्या कठीण प्रदेशाचा प्रथमस्पर्श होताच, पूर्वी सुदर दिसणारा तो फुगा फुटून निरुपयोगी झालेला पहायचा ! माझ्यासारख्या शिक्षिताना ना समाजात मान, ना साहित्यांत स्थान ! तरुणतरुणींची मोहक कुजबुज, सलज्ज दृष्टभेट, भ्रुकुटिभगाबरोबर उडणारी प्रेमवीराची दाणादाण, इत्यादि अत्यंत महत्वाच्या, जिव्हाळयाच्या, आणि समाजाचा उद्धार करणाऱ्या विषयांना सोडून आमच्या प्रतिभासपन्न कादबरीकाराना आणि कवींना माझ्यासारख्या सुशिक्षित बेकार तरुणाचीं दुःखें स्पष्टपणे वेशीवर टागून त्याचेकडे समाजाचें लक्ष वेधण्यास कोठून फुरसत होणार ?

आज कित्येक वर्षें सतत खादीची टोपी घालणाऱ्या मीं त्या दिवसापासून एकाएकीं टोपी बदललेली पाहून पूर्वपरिचयाच्या कितितरी व्यक्ती रस्त्यांत भेटल्या म्हणजे आश्चर्य प्रदर्शित करतात, कित्येक स्पष्टास्पष्ट टीकाही करतात (स्वतः निष्ठेनें खादी वापरणारे मात्र यांत फारच थोडे आहेत); खुशाल करोत ! मी तरी त्याना प्रत्येक प्रसगीं काय उत्तर देत बसणार ? नुसता हसरा चेहरा करतो आणि पुढे सरकतो. आजही गाधीटोपीबद्दल मला पूर्वीइतकीच निष्ठा आहे, पण इतकेंच कीं, 'शिर सलामत तो टोपी पचास' या न्यायाने, माझ्यासारख्या साधारण मनुष्याच्या जीवनक्रमांत त्याहून अधिक महत्वाच्या अशाही कांहीं गोष्टी आहेत याची जाणीव पूर्वी नव्हती ती आता झाली आहे.

कळावें. इतरांचा कितीही गैरसमज झाला तरी माझी ही सर्व हकीगत वाचल्यानंतर तू तरी पूर्वीप्रमाणेंच मजवर लोभ करीत राहशील अशी आशा करणारा,

तुझा मित्र,

**केशव दाते.**



**[१६] मनांतली तळमळ.**

काचनपूर. श्री. रविवार, विजयादशमी,
शके १८५८

ती. रा. रा. तात्यासाहेब यांस सादर साष्टांग नमस्कार, वि. वि.

आपलें ता. १ चें पत्र पोचले. सौभाग्यवतीस येथून तिकडे पाठविण्यास कोणतीही हरकत नाहीं. तरी आपण कोणास घेण्यासाठीं पाठवावे.

बरेच दिवसांपासून आपल्याला एका महत्त्वाच्या खासगी विषयाबद्दल लिहिण्याची इच्छा होती, पण सकोचानें आजपावेतो लिहिले नाहीं. आज मात्र या पत्रद्वारे माझें मनोगत आपल्यासमोर मांडण्याचें मी ठरविले आहे.

मी पार्वतीपूरला शिकत असतांना आपल्या अनेकवार भेटी होत असत, आणि या भेटींत आपण स्वतः मोकळ्या मनानें माझ्याशीं अनेक बाबतींत चर्चा करून मला कित्येक अडचणीच्या प्रसगीं अमूल्य उपदेशही केला आहे. अशा चर्चेंत आपला कधींकधीं मतभेदही होत असे, पण बहुतेक महत्वाच्या सामाजिक, राजकीय व धार्मिक बाबतींत आपलें मत सारखेच पडत असे.

या अनेक गोष्टींत स्त्री-शिक्षणासबधींही आपण निरनिराळ्या दृष्टींनीं चर्चा केली होती हें आपणास स्मरतच असेल. आणि त्या विषयावर 'प्रभाकरांतून' माझी एक लेखमालाही प्रकाशित झाली

होती. अपवादात्मक उदाहरणें वगळल्यास कौमार्यावस्थेत कॉलेजांतील आधुनिक विश्वविद्यालयीन शिक्षण हें सर्वसाधारण भारतीय महिलेला शक्य व आवश्यक नाहीं, आणि म्हणून सार्वत्रिक स्त्री-शिक्षण हवें असे म्हणणे म्हणजे प्रत्येक मुलीनें बी. ए. किंवा एम्. ए. होणें असा आग्रह धरणे नव्हे, हे मी माझ्या लेखांत यथामति प्रतिपादिलेंच होतें. पण त्याबरोबरच, विवाहापूर्वी प्रवेशपरीक्षेपावेतोचा प्राथमिक अभ्यास झाल्यानंतर, विवाह झाल्यावर मात्र पतीच्या सहकार्याने स्वतत्र रीत्या प्रत्येक महिलेने आपला विद्याव्यासग चालू ठेवणे हे व्यक्तीच्या आणि राष्ट्राच्या कल्याणाच्या दृष्टीनें आवश्यक असल्याचेही मी त्यात दाखविलें होते

त्यानतर आपल्यासारख्या सुविद्य आणि सुविचारी पालकांच्या देखरेखीखालीं वाढलेल्या वधूशीं विवाह होण्याचा सुयोग जुळून आला त्यावेळेस तर मला फारच आनद झाला, व आदर्श भारतीय महिलेचा जीवनक्रम माझे घरीं समाजास दिसू शकेल अशा प्रकारच्या उच्च उच्च भराऱ्या माझें मन मारू लागलें. माझ्या स्वतःच्या लेखनकार्यांत व इतर बौद्धिक व्यवसायातही मला माझ्या पत्नीचें साह्य लाभेल अशी आशा मला वाटत होती.

पण विवाहित आयुष्यास प्रारभ झाल्यानतर लवकरच मला माझ्या पूर्वीच्या सर्व अपेक्षा हवेंत विरल्याचे दृश्य पहावे लागलें, व त्यामुळें माझें मन फार उदास झाले. शाळेत साधारण प्रवेशपरीक्षेइतकें शिक्षण झालें असूनही नुसत्या पांच ओळीदेखील तिला शुद्ध लिहितां येत नाहींत हें पाहून मला फारच धक्का बसला. कित्येक बी. ए. झालेल्या पदवीधर तरुणतरुणीनाही मराठी भाषा शुद्ध लिहितां येत नाहीं हें मला माहीत आहे, पण माझा स्वतःचा भाषेच्या शुद्धलेखनावर कटाक्ष असल्यानें माझ्या पत्नींत तो दोष

मला फार दुःखद वाटला. देशाच्या व जगाच्या सद्यस्थितीचें आणि प्रचलित राजकारणाचे अवावयास पाहिजे तितकें ज्ञान तिला नाहीं ही देखील मला एक सखेदाश्चर्याची गोष्ट वाटली ! पण मुख्य गोष्ट म्हणजे, हें व इतरही आवश्यक सर्व ज्ञान तिनें आता संपादन करावें अशी खटपट मी स्वतः अनेकवार केली, पण दुर्दैवेंकरून तीही फलद्रूप होतांना दिसत नाहीं.

आणि या व इतर अनेक कारणामुळें विवाहोत्तर स्त्रियाच्या विद्याव्यासगाबद्दलच्या माझ्या पूर्वींच्या मतांस धक्का बसला आहे. तीं मतें केवळ माझ्या एकट्याच्या अनुभवावरून सर्वस्वी दूर सारण्यास मी आज तयार झालो आहे अशातला भाग नाहीं. पण आज मी संशयांत सापडलों असून पूर्वीचा जोरदार आत्मविश्वास काहींसा डळमळीत झाला आहे हें मात्र खरें.

या अशा एकदर वस्तुस्थितीमुळें मनाला उदासीनता प्राप्त झाली असून, त्यामुळे आदर्श गृहात जो आनंद आढळून यावयास पाहिजे तो हल्ली येथे दिसून येत नाहीं. आजही मला हेच वाटतें कीं, विवाहाचा उद्देश केवळ शरीरसंबंध नसून, पतिपत्नींना मानसिक व बौद्धिक सहकार्याने जीवन व्यतीत करून अतीं उभयतांची आध्यात्मिक उन्नति करून घेण्याची संधि प्राप्त करून देणें हाच विवाहाचा मूळ उद्देश आहे.

आजपावेतों अनेक कठीण प्रसंगीं आपल्या उपदेशानुसारच मी माझ्या जीवितार्चे तारूं वल्हवीत आलों आहे. आपल्यासारखा श्रेष्ठ मार्गदर्शक मिळाल्याबद्दल मला अभिमानही वाटतो. प्रस्तुतचा प्रसग इतर प्रसगांपेक्षा निराळा असला तरी याही वेळेस आपल्या मार्गदर्शित्वाचा फायदा मला मिळेल अशी मी आशा करितों.

या सर्व प्रकरणांत माझें स्वतःचें कोठें चुकत आहे का ?

अलीकडे बरेच दिवसांत ‘ प्रभाकरा ’ कडे मी लेख का पाठवूं

शकलों नाहीं हें वरील मजकुरावरून ध्यानांत येईलच.

कळावें, सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. आपला,

**माधव मुद्रे.** २५–१०–३६

---

[१७] **भजन आणि भोजन.**

## धर्मपत्रिका

हिंदुधर्माभिमान्याचे एकमेव मुखपत्र : दर एकादशीस नियमित प्रसिद्ध होतें.

न जातु भयान्नकामान्न लोभात् । धर्मंत्यजेज्जीवितस्यापिहेतोः ॥

पार्वतीपूर, सोमवार आश्विन शु ११ शके १८५८ ता. २६–१०–३६



**कांचनपूरस्थ जनतेस जाहीर विनंति.**

कांचनपूर येथील सर्व आबालवृद्ध स्त्री-पुरुष ब्राह्मण मंडळीस कळविण्यास फार आनद वाटतो कीं, येथील काहीं धर्मप्रेमी सज्जनांच्या आग्रहाच्या सूचनेवरून, स्थानिक श्रीविठ्ठलमंदिरांत रविवार मिति कार्तिक शु. १ ता. १५–११–१९३६ पासून श्रीपाडुरगाच्या पवित्र नामाच्या अखड जयघोषाचा सोहळा सुरू करण्याचे ठरविलें आहे. हा अखड नामघोष गुरुवार का. शु. १३ रोजीं पहाटे सूर्योदयापावेतों चालू राहील, नतर त्या दिवशीं दुपारीं पारण्याचा मोठा समारभ करण्यांत येऊन गांवातील यच्चयावत् ब्राह्मण मडळीस भोजन देण्यांत येईल. तरी गांवांतील सर्व धर्मप्रेमी उत्साही मडळींनीं पहाऱ्यासाठीं आपापलीं नावें व सोयीची वेळ येत्या रविवार पावेतों खालीं सह्या करणाऱ्या सद्गृहस्थाकडे कळविण्याची कृपा करावी. हें धर्माचें पवित्र कार्य असल्याने धर्मबुडव्या नास्तिक लोकाच्या वडवडीकडे लक्ष न देतां येथील सर्व ब्राह्मण मडळी या कामीं प्रेमानें व उत्साहानें हातभार लावून तें उत्तम प्रकारें पार पाडतील अशी पूर्ण आशा आहे. आमचे-

कडून आम्ही या पवित्र प्रसगीं जें पडेल ते सर्व काम करण्यास तयार आहोंच. याप्रमाणेच इतरानींही करावें व पढरपूरच्या अपूर्व पांडुरंग-भक्तीच्या दृश्याचा लाभ कांचनपूरस्थ जनतेस येथे बसल्या बसल्याच करवून देणारा हा अभिनव उत्सव यशस्वी करावा ही विनति.

सर्वांचे कृपाभिलाषी,

कांचनपूर,		**बाळकृष्ण नारायण काणे.**

सोमवार, ता. १९–१०–१९३६		**मुरलीधर केशव एकबोटे.**

टीपः—या उत्सवाच्या वर दिलेल्या कल्पनेवरून या कामीं पुष्कळ खर्च येईल हे सर्वांस उघड होईलच; म्हणून सर्व मडळी यथाशक्ति द्रव्यसहाय्य करतील अशी कार्यकर्त्यांना पूर्ण खात्री वाटते. ब्राह्मणाच्या धर्मकार्यानें सर्व देशाचा फायदा होतो हें जाणून इतर वर्णाच्या लोकानींही या कार्यासाठीं सहाय्य करावें अशी विनति आहे. जवळपासच्या गावाच्या जनतेलाही या नवीनच सुरू केलेल्या उपक्रमाची माहिती व्हावी, व त्यांचेकडूनही जमल्यास या प्रसगीं आर्थिक सहाय्य मिळावें या हेतूनें वृत्तपत्रांतून ही माहिती प्रसिद्ध करीत आहों.

**मु. के. ए.**

**बा. ना. का.**



## [१८] विवाहोत्तर स्त्रीशिक्षण.

कांचनपूर.		श्री.	मंगळवार, आश्विन शु. द्वादशी

ती. रा. तात्यांचे चरणीं बालके सौ. विमलाचा दोन्ही कर जोडून नमस्कार वि. वि.

तुमचे मला घेऊन जाण्याविषयीं पत्र पोचले. तुम्हाला इकडून जें उत्तर गेले ते मी सहज टेबलावर पडलेल वाचल. तात्या मला फार वाईट वाटल ते उत्तर वाचून. तुम्ही मला ध्यायला नका पाठवू

कोणाला. मी मुळींच येणार नाहीं. कारण कीं जेव्हां इथून खऱ्या खुशीनी रवानगि होईल तेव्हांच येईन. सध्या तुम्हाला लिहिल ते काहीं मोठ्या आनदानी नाहीं. म्हणजे तुम्ही अस नका समजू की मला इथे काहीं त्रास आहे. मुळीच नाहीं. इथली सगळी माणसें चागली आहेत. सासूबाई व मामंजी माझ्यावर प्रेम करतात. तिकडच तर माझ्यावर फार प्रेम आहे. पण तात्या, अलीकडे मात्र माझ्याशीं पूर्वीप्रमाणें मोकळ्या मनानी बोलणे होत नाहीं. पण हा सारा माझाच दोष. मला नेहमी पुष्कळ सागायच होत कीं बायानीं चागलीं चागलीं पुस्तक वाचावी, आपल्या देशात काय चालल आहे याच ज्ञान मिळवाव, परदेशात काय काय होऊन राहिल आहे हेंही वाचत रहाव. बायकांच्या अज्ञानामुळें देशाची फार हानी होते मला सुद्धा हे सारं सार पटतं. पण काय करू माझ्या मेलीच्या काहीं नवीन शिकविलेल ध्यानातच रहात नाहीं. पहिले पहि े मला किती तरी नवीन नवीन गोष्टी सांगायचे. फार गमत यायची त्या ऐकताना. पण त्या सगळ्या नवीन असल्यानी एकदम कशा हो माझ्या ध्यानांत राहतील ? आजपावेतों मी कधीं फॅशिस्ट शब्दच ऐकला नव्हता, शाळेंत इतक्या वर्षांत कधींच कानावर आला नाहीं माझ्या हा शब्द. मग फॅशिस्ट व सोशालिस्ट कीं काय तें, यांतला फरक एकदाच सांगितल्यानीं कसा हो समजेल मला ? आणखी मग मला नाहीं सागता आला कीं ते रागावतात, चिडतात. पण तात्या, तुम्हीच सागा मी तरी काय करणार ? माझ्या शुद्धलेखनाच्या चुका तरी एकदम कशा नाहींशा होतील ? खूप खटपट करते मी लक्षांत ठेवण्याची. पण अजून तें काही जमत नाही. तुम्ही सांगाना मी हें सगळें कस शिकू ? लहानपणि तुम्हीं नव्हता का मला मदत करत माझ्या शाळेंतला अभ्यास करायला ? मला कित्ती कित्ती वाटत कीं हें सगळ शिकून आणखी लक्षात ठेवून त्यांना नेहमीं आनंदित

ठेवाव. माझ्या कल्याणाचच आहे ते सगळ. पण मला कधी कधी वाटतं कीं जर मला कोणी रोज थोड थोड सावकाश शिकवल तर सार समजेल. पण ते आहेत फार हुशार आणखी त्यांना वाटत कीं मलाही सगळ एकदम याव. ते जमत नाहीं आणखी मग ते माझ्यावर रागावतात. मग मला फारच वाईट वाटत आणखी जे येत तेही मी विसरून जाते. मग साध्यासुध्या गोष्टी सुद्धां माझ्या ध्यानात रहात नाहींत. पण माझ्यामुळे तिकडे नेहमी मनाला फार त्रास होतो, आणि ते पाहिलं म्हणजे माझ्याही डोळ्यात पाणी येत. म्हणून आता मी ठरवून टाकल आहे कीं रात्रीं रात्रीं जागून सुद्धा ते सागतील ते वाचून पाठ करून ठेवीन. दिवसा घरांतल्या कामामुळें फुरसत सुद्धा मिळत नाहीं फारशी. पण याची कल्पना पुरुषांना काय येणार ? तुम्हीच नाहीं का तात्या मला सागितल कीं बायांनीं घरांतील आवश्यक कामें सोडून मधेंच पुस्तक वाचीत बसू नये म्हणून ? आणखी तसं मी करू लागलें तर किती घोंटाळे माजतील घरांत विनाकारण ? तात्या, पुरुषाचा अभ्यास किंवा लग्न न झालेल्या मुलींचा अभ्यास आणि माझ्यासारख्या लग्न होऊन सासरीं रहाणाऱ्या मुलींचा अभ्यास यात फार फरक असतो. सणवार आले म्हणजे चारचार दिवस काम सोडून इकडे तिकडे ढुकायला एक क्षणाची सुद्धा फुरसत सापडत नाहीं. मग कठीण कठीण पुस्तक वाचून तीं समजून घेणे तर दूरच. पण हें सगळ कोणी नीट समजून मनात घेईल तेव्हा. पण तें कांहीं असलं तरी आता यापुढें माझ्यामुळें तिकडे कधीं उदास राहू द्यायच नाहीं अशा शक्य तितका प्रयत्न करण्याचा मी निश्चय केला आहे. मी फारसें शिकल नाहीं तरी वामनपंडितांच एक वाक्य मला नेहमी आठवतं -पित्यास संतोष देतो तोच सुपुत्र;पतीस संतोष देते तीच खरी स्त्री.म्हणून, तात्या, तुम्ही तरी मला लिहून कळवा मी काय आणि कस करत

जाऊं तें. माझे वडील वारल्यापासून तुम्ही आजपावेतो मला त्याची आठवण होऊं दिली नाहीं. मी तुमची पुतणी नसून मुलगीच आहे अशा प्रकारें तुम्ही मला ठेवल. आजपावेतों तुम्ही माझे कितितरी हट्ट पुरवले, नेहमी आनदांत ठेवल, मला घर तरी किती उत्तम पाहून दिलें. मग तात्या आता मला पुन्हा यावेळेसही मदत कराल ना ? कारण माझ्या मूर्खपणामुळें त्यांच्या मनाला होणारा त्रास पाहिला कीं फार वाईट वाटतं मला. फार लांबल माझं हें पत्र. पण तात्या मी माझ्या मनांतलं सुख-दुःख तुम्हाला नको लिहून कळवूं तर कोणाला ? तर तुम्ही आता कोणाला घ्यायला पाठवू नका. आईला म्हणा मी मग पुढे केव्हां तरी येईन. तुमच्या पत्राची वाट पहात आहे.

तुमची लाडकी वेडी

बेबी. २७-१०-३६

ता. क.—मराठी शुद्ध कस लिहाव याचें एक चांगलें पुस्तक आणखी हिंदुस्थानच्या गेल्या वीस वर्षांच्या इतिहासाचें एक पुस्तक माझ्याकडे लवकर पाठवून द्या. म्हणजे मी ते सगळे पाठ करून टाकीन.



## [१९] गोड अपघात.

कांचनपूर. श्री. बुधवार आश्विन शु. १३ शके १८५८

ती. रा. रा. तात्यासाहेब यांस सादर साष्टाग नमस्कार, वि. वि.

मी आपल्यास गेल्या रविवारीं पाठविलेलें पत्र पोचलेंच असेल. तें वाचून आपल्यास काय वाटले असेल तें सांगवत नाहीं. परंतु तें पाठविल्यानंतर इकडे एक अत्यत महत्वाची घटना घडून आल्यानें मला आतां त्या माझ्या पत्राच्या मुळाशीं माझा अविचारच स्पष्टपणें प्रतीत होत आहे. त्या पत्राला आपण आता उत्तरच पाठविण्याची आवश्यकता राहिली नाहीं.

तें पत्र आपल्याकडे पाठविल्यानतर तिसरे दिवशीं म्हणजे कालच, एका मुकदम्याच्या कामासाठीं मला भैरवपूरला जावयाचें होतें. तीन चार तासांचा मोटरचा प्रवास असल्यानें, वेळ कटाळवाणा जाऊं नये म्हणून एक नवीन लघुकथासंग्रह बरोबर घेतला होता. सरासरी एक तास गेल्यानतर, रस्त्याच्या बाजूला चरत असणाऱ्या गुरांपैकीं एक लहानसा केरडा एकाएकीं मोटरच्या समोर येऊन उभा राहिला ! अपघात टाळण्यासाठीं मोटरहाक्यानें वेगात असलेल्या मोटरला एकदम प्रतिबधक लावला, त्याबरोबर आतील उतारूंना एका क्षणात गतिमान वस्तूंच्या नियमाचें प्रत्यक्ष ज्ञान झाले, आणि आत फुटाणे असलेल्या एखाद्या बद डब्याला बाहेरून कोणी जोराने एकदम इकडेतिकडे हलवूं लागला असता आतल्या त्या फुटाण्याना कसा मजेदार अनुभव येतो याचीही प्रत्यक्ष प्रचीति आली ! कोणी पट्टीवरून खालीं घसरले, कोणी प्रेमानें एकमेकाना कडकडून भेटले, कोणी दत्तकविधीची वाट न पहाताच आपल्या शेजारी बसलेल्याच्या मांडीवर जाऊन आदळले, तर कित्येकांच्या टोप्या आणि पगड्या एकदम रस्त्यावर येऊन क्षणभर मिळालेल्या स्वतत्रतेचा फायदा घेऊन फार दिवसांनीं भेटलेल्या भूमातेच्या अगावर लाडाने लोळू लागल्या ! पण उतारूच्या सुदैवानें आणि वृत्तपत्रीय बातमीदारांच्या दुर्दैवाने कोणासही म्हणण्यासारखी इजा झाली नाहीं, आणि मोटरहाक्याचा स्वतःचा त्यांत कांहींच दोष नसल्यानें सर्वांनीं तो प्रसग हसण्यावारी नेला व प्रवास पुढें चालू झाला.

पण इतर उतारूना हास्यास्पद वाटणाऱ्या याच लहानशा अनपेक्षित प्रसंगांतून माझ्या आयुष्यांतील एक अत्यत महत्त्वाची घटना घडून आली. व्यक्ती काय, किंवा राष्ट्रें काय, त्यांच्या इतिहासमदिरांचें नीट अवलोकन केल्यास कितितरी महत्वाच्या ठिकाणीं आकस्मिक

अनपेक्षित घटनांचीच फरशी त्यांत बसविलेली आढळून येते ! या पृथ्वीच्या पाठीवर मानवजातीचा प्रथम अवतार झाला तेव्हांपासून आजपावेतोंच्या तिच्या जीवनाच्या पटांत विधात्यानें अनेकवार अशा क्षुल्लक आकस्मिक घटनांचेच धागे कौशल्यानें उपयोजिले आहेत. पुढें शेकडो वर्षें भारतभूला ग्रासणाऱ्या पारतंत्र्यग्रहणाच्या अगदीं सुरवातीलाच राजा अनंगपाळाचा हत्ती ऐन विजयाच्या समयीं बाण लागून घाबरला नसता तर ? वॉटर्लूच्या लढाईत नेपोलियननें मागविलेली कुमक पंधराच मिनिटें अगोदर आली असती तर ?

आणि वरील क्षुल्लक घटना त्या दिवशीं माझ्या प्रवासात घडून न येती तर ? काय झालें असतें हे सागणे कठीण आहे. पण सुदैवानें वस्तुस्थिति अशी आहे कीं, त्या लहानशा केरड्याच्या कृपेनें माझ्या जीवनांत माझ्या अविचारानेच निर्माण झालेले गैरसमजाचे, निराशेचे व उदासीनतेचे ढग एका क्षणात नाहींसे झाले !

ती महत्वाची पुढील घटना अशी... .....

( दुर्दैवानें हें पत्र येथेंच सपाविणे भाग आहे. येथील एक वृद्ध हरिजन गृहस्थ कांहीं दिवसापासून आजारी असून या वेळेस ते अत्यवस्थ असल्यानें त्यांचेकडे जाण्यासाठीं तातडीचें बोलावणें आलें आहे. पण माझ्या मागील पत्राने आपल्या मनांत व्यर्थ निर्माण झालेलें दुःखपटल शक्य तितक्या लवकर दूर व्हावें या इच्छेनें हें अर्धवटच पत्र आपल्याकडे पाठवीत आहे. उरलेला मजकूर लवकरच सवडीनें कळवितो. ) कळावे—

आपला,

माधव मुद्रे. २८–१०–३६



## [२०] बापाचें हृदय.

पार्वतीपूर.

ता. ३०–१०–३६

चि. कु. नंदिनीस, आशीर्वाद.

बरेच दिवसांत तुमचेकडील पत्र न आल्यानें आम्ही येथें काळजींत आहों. तरी पत्र पाहताच उत्तर पाठवून काळजी दूर करणें. गेल्या महिन्यात दीडशे रुपये पाठविले त्याची पोस्टाची पावती आली परंतु तू स्वतः कांहीं लिहून कळविलें नाहीं. तरी त्याचाही खुलासा करावा. मागें तुझें पत्र आलें होतें ते देखील फार दिवसानंतर आले होतें. असें करू नये. तुम्हा दोघांपैकीं कोणीतरी आठपधरा दिवसांतून एकदा पत्र टाकीत राहिलें म्हणजे आम्हाला येथें काळजी राहणार नाहीं.

तुझी आई तुझी फार आठवण करीत असते, येत्या सुटींत अवश्य यावें.

तुझी चित्रकलेत प्रगति होत आहे हे पाहून आनंद वाटतो. परंतु त्यामुळें तुझ्या इतर अभ्यासाकडे दुर्लक्ष न व्हावें हें लक्षात असू द्यावें. सुरेशचा अभ्यास यंदा कसा काय चालला आहे ? त्याने या वर्षी कसेंही करून बी. ए. पास झालेंच पाहिजे. कारण पुढल्या वर्षाच्या सुरवातीला येथील शाळेंत एक इंग्लिश विषय शिकविणाऱ्या शिक्षकाची जागा रिकामी होण्याचा बराच संभव आहे; त्या जागीं त्याला लावून घेण्याची खटपट करण्याचा विचार आहे. पुन्हा अशी संधि बरेच दिवस येणें कठीण जाईल. बाकी सर्व ठीक आहे. पत्रोत्तर लवकर पाठविण्यास विसरू नये.

तुझा पिता,

व्ही. एस्. दसरे.

ता. क. तुझ्या पत्रांत तू कोणा शरच्चंद्र भट्टाचार्यांचा उल्लेख केला आहेस. तो चांगलीं चित्रें काढीत असेल, पण दूरच्या व

अनोळखी प्रांतात तुझ्यासारखीनें वाटेल त्या तरुणाशीं फारसा परिचय करू नये असे मला वाटते.



## [२१] हिमालयाएवढ्या चुकीची कबूली.

काचनपूर. श्री. सोमवार, आश्विन कृ. ४ शके १८५८

ती. रा. रा. तात्यासाहेब यास सादर साष्टांग नमस्कार वि. वि.

माझ्या मागील पत्रांत अर्धवट सोडलेली माहिती अनेक महत्त्वाच्या कारणांमुळे यापूर्वी कळवूं शकलो नाहीं याबद्दल वाईट वाटतें.

मी ता. १० रोजीं भैरवपूरला जात असतां मोटरला बसलेल्या धक्क्याचा वृत्तांत त्या पत्रात आलाच आहे. त्या गडबडींत माझ्या हातातले लघुकथासंग्रहाचे पुस्तकही जोराने खालीं अस्ताव्यस्त पडले. दुसऱ्याच क्षणीं मी ते उचललें तो त्यांतून एक घडी केलेला कागद बाहेर डोकावू लागला. साहजिक कुतूहलानें मी तो उघडून पाहिला, तेव्हा ते एक पत्र आहे असे मला आढळून आलें. मी तें पुस्तक एका मित्राकडून वाचावयास आणिलें होते म्हणून तें पत्र कदाचित त्याचे असेल या भावनेनें ते मी पुनः तसेच ठेवून देणार होतों. परंतु इतक्यांत त्यातलें अक्षर मला माझ्या चांगल्याच परिचयाचें भासले. पत्राच्या खालीं व वर पहाता, तें सौभाग्यवतीनें आपल्यास लिहिलेलें एक पत्र असल्याचें आढळून आले. पत्रावर तारीख आदले दिवसाचीच होती. यानंतर मात्र मला ते पाहण्याचा हक्क आहे असें वाटून मी ते वाचण्यास प्रारंभ केला.

आणि काय सांगू ? मी ते जसजसें वाचू लागलो तसतसें माझ्या मनाला कांहीं तरी विलक्षण वाटू लागले; आणि अर्धे वाचतों न वाचतों तोंच माझ्या नेत्रांत अश्रुबिंदू उभे राहिले, हृदय भरून आलें आणि मनातलें सारे किल्मिष पश्चात्तापाच्या ज्वालानीं दग्ध होऊ

लागलें. लिहिणाऱ्या व्यक्तीच्या अंतःकरणात खळबळणाऱ्या भावना अगदी साध्यासुध्या नैसर्गिक भाषेत मार्मिक रीतीनें व्यक्त करणारें एक अमूल्य पत्र होतें तें ! त्यांत भारदस्त शब्दांची फरसबंदी आणि उपमा-उत्प्रेक्षादि अलंकारांची कलाकुसर नसली तरी हृदयापासून निघणाऱ्या आणि हृदयाला जाऊन भिडणाऱ्या सोप्या सरळ भाषेचें नैसर्गिक सौंदर्य भरपूर होतें.

इतरांनीं सांगितलेल्या हजार वाक्यानीं जो परिणाम माझ्या मनावर झाला नसता तो त्यातल्या एकेका वाक्याने होत होता. त्या दिवशीं घरून निघाल्यापासून मोटरमध्यें याच विषयाचे विचार मनात येत होते, अशा मनस्थितींतच तें पत्र माझ्या हातीं आले—आलें कशाचे, देवानेंच ठेवलें ! या सर्व कारणांमुळें त्या पत्रानें त्या वेळेस माझ्या मनावर जो परिणाम झाला तसा नंतर आपल्याशीं समक्ष सभाषण करूनही झाला असता किंवा नाहीं याची वानवाच वाटते मला. एका सालस व्यक्तीशीं मी कसा अन्यायानें वागत होतों याचें क्षणार्धात मला ज्ञान होऊन मनांतलें सारें शल्य नाहींसें झालें. तिच्या एकदर परिस्थितीची आणि त्यांतही ती करीत असलेल्या आटोकाट प्रयत्नांची जाणीव करून न घेतां उगीचच तिला मी दोष देत होतों ! पाण्यांतल्या माशांना पोहणें, जमिनीवरच्या माशांना उडणें, किंवा हरिणशिशूला पळणें शिकवावें लागत नाहीं, तसेंच पुरुषाला अभिमान बाळगणें आणि स्त्रीला पति-पुत्रांसाठीं स्वार्थत्याग करणेंही शिकवावें लागत नाहीं ! तिच्या एकंदर परिस्थितीचा आणि पूर्वाभ्यासाचा नीट विचार करून जर मी योग्य प्रमाणांत लेखनवाचन नेमून दिले असतें तर आजपावेतों तिनें बरीच प्रगति केली असती. हा विचार मनात येत असताना मला माझ्या पार्वतीपूरच्या एका विद्यार्थी मित्राचें स्मरण झालें त्याला एकदा क्षयाची भावना सुरू झाली. पार्वतीपूरच्या एका चांगल्या डॉक्टराचें

तीन महिने औषध घेऊनही गुण येईना. शेवटीं तो मुबईस एका नामांकित डॉक्टराकडे गेला. त्यानें त्याची सर्व हकीगत ऐकून पूर्वीची औषधयोजनाही पाहिली. मौज अशी कीं, मुबईच्या डॉक्टरानें पूर्वीचीच औषधयोजना कायम ठेवून फक्त त्यांतील प्रत्येक औषधाचें प्रमाण निंपट केलें. पधराच दिवसात माझ्या मित्राच्या प्रकृतींत इष्ट बदल दिसू लागला ! पार्वतीपूरच्या डॉक्टराच्या चुकीला हसणारा मी स्वतः माझ्या पत्नीच्या बाबतींत तीच चूक करीत होतो.

आपल्या नावाने लिहिलेल्या त्या पत्राची एक नकल मी यासोबत पाठवीत आहे. मूळ पत्र मी मजजवळ ठेवून घेतले आहे. नकल व मूळ पत्र एकाच व्यक्तीच्या हातचे आहे.

माझा लवकरच तेथें येण्याचा विचार आहे. त्यावेळेस सौभाग्यवतीसही बरोबर आणीन म्हणतों. कळावे, सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

आपला,

**माधव मुद्रे.** २–११–३६

[२२] **कौटुंबिक वातावरणांतले ढग.**

पार्वतीपूर. श्री. शुक्रवार ता. ६–११–३६

चि. रा. माधवराव यास सप्रेम आशीर्वाद.

तुमचे पत्र पोचले. मजकूर वाचून फार आनद झाला.

चि. सौ. बेबीचे पत्र तुम्ही पाठविले तेही पोचले. पण सुदैवाने आतां त्या एकंदर दुःखोत्पादक घटनेवर पडदा पडला असून मला आतां विशेष लिहिण्याचीही आवश्यकता उरली नाहीं. तुमच्या पहिल्या पत्रानें मनांत उद्विग्नता उत्पन्न झाली होती; आणि एकदा समक्षच तेथें यावें असा विचार करून सोयीचा दिवस पहात होतों. पण इतक्यात तुमचे दुसरे पत्र येऊन मनाला जरा बरे वाटले; आणि अता

तुमच्या परवांच्या पत्राने तर सर्व समाधान झालें आहे. तुमच्यावर माझी बरीच भिस्त आहे. पुढेंमागे 'प्रभाकर' चा सारा कारभार तुमच्यावर सोंपवून आयुष्याच्या सध्यासमयीं प्रत्यक्ष अविरत समाजसेवेला पूर्णपणे वाहून घेण्याची माझी इच्छा आहे. आज माझा स्वतःचा 'प्रभाकर' असता तर या कागदी 'प्रभाकर' चा भार किती आनदानें, किती हक्कानें, त्याच्या खाद्यावर टाकून मोकळा झालों असतों ! पण ईश्वराची इच्छा तशी नव्हती. दुसरें काय ?

माधवराव, मानवी जीवनात, विशेषतः कौटुबिक वातावरणात, मधूनमधून गैरसमजाचे व मनोमालिन्याचे ढग उत्पन्न होणे साहजिकच आहे. मात्र सुविचारवायूचे योगाने ते लवकर दूर होऊन सतोषकिरणें पुनः पूर्ववत् फाकणें ही ईश्वराची कृपा होय. या सुविचारांचे वेळींच साह्य न झाल्यास हे ढग दिवसेदिवस जास्त जमून त्यातून अपशब्दांची विद्युल्लताही चमकू लागण्याचा सभव असतो. तुमच्या बाबतींत मात्र हे गैरसमजाचे ढग लवकरच वितळून गेले ही खरोखर फार आनदाची गोष्ट होय. कारण विशेषतः प्रस्तुतसारख्या बाबतींत परस्परांचीं हृदयें कधी कधीं इतकीं हळुवार झालेली असतात कीं, माझ्यासारख्या निकटसबधी तिऱ्हाइताच्या सल्लयाचा परिणामही विपरीत होण्याचा सभव असतो. अस्तु. यापुढे तुम्ही उभयतां परस्पर सहकार्यानें वागून जीवनपथ उत्तम रीतीनें आक्रमण कराल असा या दुःखी म्हाताऱ्याला विश्वास वाटतो. आमच्या बेबीची वृत्ति मला तिच्या लहानपणापासूनच माहीत आहे. कोणीही चांगली गोष्ट तिला सांगितली तर ती अमलांत आणण्याचा शक्य तितका प्रयत्न केल्याशिवाय ती रहात नाहीं. ईश्वर तुम्हा दोघांनाही सद्बुद्धि व सौख्य देवो.

तुमचे मित्र केशवराव हल्लीं कोठेशीं असतात ? आजकाल ते काय करीत असतात ? मागे तुमच्यामुळे माझा त्याच्याशीं जो

थोडासा परिचय झाला होता त्यावरून माझा त्याचेविषयीं फार चांगला ग्रह झाला आहे.

तुमच्या गावीं लवकरच विठ्ठलभजनाचा मोठा उत्सव सार्वजनिक रीत्या साजरा होणार असल्याबद्दल 'प्रभाकर' कचेरीकडे प्रसिद्धीसाठीं एक पत्रक आलें असून, 'धर्मकार्यास उत्तेजन' म्हणून त्यासबधांत एक संपादकीय स्फुटही लिहिण्याची विनति करण्यात आली आहे. तरी या उत्सवासबधांत कांहीं विश्वसनीय माहिती खासगी रीत्या कळवूं शकाल काय? कारण कोणतीही गोष्ट खरोखर चांगली आहे असें नीट चौकशी करून समजल्याशिवाय उगीच 'प्रभाकरा'तून—आणि विशेषतः सपादकीय सदरांतून—तिची स्तुति किंवा पुरस्कार करावयाचा नाहीं असा माझा नियम आहे. उलट, ती खरोखरच चांगली असेल तर तिला यथाशक्ति साह्य करण्यास 'प्रभाकर' केव्हाही तयार आहेच. कळावे, हे आशीर्वाद. आपल्या मातापित्यास नमस्कार. चि. बेबीस आशीर्वाद. तिच्या नांवानें एक वेगळें पत्र आज पाठविलेंच आहे.

आपला,

**गोविंद महादेव डोळे.**

---

## [२३] मुलीस उपदेश.

पार्वतीपूर. श्री. शुक्रवार ता. ६–११–३६

चिरजीव सौभाग्यवती बेबीस सप्रेम आशीर्वाद,

रा. माधवरावांच्या पत्राबरोबर तुझें पत्र आलें तें पावलें.

आतां तुमचीं उभयतांचीं मनें सुदैवानें साफ झालींच असल्यानें त्या तुझ्या पत्राबद्दल लिहिण्यासारखें असें मला विशेष कांहीं उरलें नाहीं. पतीला प्रसन्न ठेवण्याची तुझी इच्छा आणि खटपट पाहून मला फार आनंद झाला. तूं तुझ्या इच्छेस अनुसरून योग्य दिसेल

तेव्हां इकडे ये. आता तुझें घर तेंच आहे; येथें तू येणार ती पाहुण्यासारखी थोडे दिवसांसाठीं. आम्हांला अर्थात् वारंवार तुझी आठवण येते व येत राहील, पण त्याला इलाज नाहीं. तू घरातले काम आणि लेखनवाचन दोन्ही नियमानें करीत जा, दोघातही तुझें कल्याण आहे. ईश्वरकृपेनें तुला पति सुविद्य आणि चांगल्या विचाराचे लाभले आहेत. त्यांना स्वतःला बुद्धिपुरःसर अन्याय करणे पसत पडत नाहीं; आणि इतरांनींही केलेला आवडत नाहीं. तुझ्या बाबतींतही त्यांनीं आपली चूक कबूल केली असली तरी हा त्याच्या मनाचा थोरपणा आहे इतकेंच तू समज, तेवढ्यामुळें तू आपली नम्रवृत्ति, पति-भक्ति किंवा कर्तव्यपरायणता किंचितही सोडूं नकोस. विशेषतः एक गोष्ट तूं नेहमी ध्यानांत ठेव. स्त्री कितीही शिकली किंवा श्रीमत झाली तरी परोपकारीवृत्ति, मर्यादा आणि शालीनता हे तीन गुण असल्याशिवाय तिच्या जीवनाला शोभा येणार नाहीं. प्रसगाविशेषीं, सकटकालीं, किंवा पति आडमार्गावर जात असता स्त्रिया धीट झाल्या पाहिजेत हें अगदीं खरें, पण रोजच्या सर्वसाधारण जीवनात जो धीटपणा पुरुषाला शोभा देईल तो स्त्रीला तसा भूषणास्पद होणार नाहीं.

बाळे, तुम्ही उभयता परस्पर सहकार्यानें वागून स्वतःचे आणि त्याबरोबरच समाजाचें कल्याण साधावे हेच माझें तुम्हांला सांगणें आहे. वैवाहिक जीवन यशस्वी होण्याला फाजील स्वतन्त्रता किंवा फाजील परतन्त्रता ही दोनीही बाधक असून परस्परतन्त्रतेचा सुवर्णमध्यच त्याला आवश्यक आहे. या परस्परतन्त्रतेला एकमेकांच्या मतांविषयीं, दोषांविषयीं आणि चुकांविषयीं सहिष्णुतावृत्तीची जोड दिली कीं असतोष, मनोमालिन्य, परकाभाव, इत्यादि खडकांची भीति बाळगण्याचें सहसा कारणच नाहीं. कळावें, हे आशीर्वाद. तुझा, तात्या.

## [२४] माझ्या कन्येस पदरांत घ्यावे.

पार्वतीपूर. श्री. रविवार ता. ८–१२–३६

रा. रा. रावबहादुर सदाशिवराव केसकर,

रिटायर्ड डिस्ट्रिक्ट जज्ज, नाशिक,

स्वामींचें सेवेशीं, कृ. सा. नमस्कार वि. वि.

गेल्या कित्येक वर्षांत आपल्या व माझ्या प्रत्यक्ष पत्रव्यवहाराचा अगर भेटीचा प्रसंग आला नसल्यानें आज हें पत्र पाहून आपल्यास प्रथम कांहींसें आश्चर्य वाटण्याचा संभव असला, तरी यांतील मजकूर वाचल्यानंतर तें दूर होईल अशी आशा आहे. कदाचित आपल्याला माझ्या परिचयाची दीर्घकालामुळे विस्मृति पडली असणेंही शक्य आहे. फार वर्षांपूर्वी आपण दोघेही अलाहाबाद विद्यापीठांत बरोबरच बी. ए. च्या वर्गांत शिकत होतों इतकी आठवण मी येथे करून दिल्यानंतर, विद्यार्थीदशेंतल्या त्या निश्चिंत दिवसांत आपण दोघे कित्येक वेळा गंगास्नानास जाऊन कसे पुष्कळ वेळ पोहत होतों, चांदण्या रात्रीं संगमाच्या कांठावर बसून कशा गप्पा मारीत होतों, विद्यापीठांतील महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांत मराठी भाषेचा अभिमान जागृत करण्यासाठीं कसे झटत होतों, इत्यादि गोष्टींचा मुद्दाम सविस्तर उल्लेख करण्याचें कारण उरणार नाहीं असे वाटते. आपण दोघेही तेथूनच एल्. एल्. बी. ची परीक्षा एकाच वर्षी उत्तीर्ण झाल्यानंतर मात्र आपण सरकारी न्यायखात्याच्या नोकरींत शिरून तन्निमित्त दक्षिणेंत अनेक ठिकाणीं रहात गेल्यानें, व मी वकिलीच्या धंद्यानिमित्त येथें स्थायिक झाल्याने, आपल्या त्या परिचयास पुढें वारंवार उजळा मिळूं शकला नाहीं.

आज आपल्यास हे पत्र लिहिण्याचें विशेष कारण म्हणजे माझी मुलगी चि. कु. मालती ही नुकतीच बी. ए पास झाली असून आता

योग्य वर पाहून तिचा विवाह करून देण्याची आमची मनीषा आहे. आपले ज्येष्ठ चिरंजीव रा. श्रीपादराव हे नुकतेच उत्कृष्ठ प्रकारें एम्. एस् सी. उत्तीर्ण होऊन पुढें आय्. सी. एस. च्या परीक्षेसाठीं विलायतेस जाण्याच्या विचारात आहे असें वृत्तपत्रातून वाचलें. त्यांचा विवाह यंदा विलायतेस जाण्यापूर्वी करण्यास आपली हरकत नाहीं असेंही मी माहिती काढली त्यावरून कळलें. तरी मित्र या नात्यानें पूर्वी असलेला आपला संबध व्याही या नात्यानें शक्य झाल्यास कायम करण्याच्या आशेनें आपल्यास मी हें पत्र लिहीत आहे.

माझी कन्या सुमारें १९ वर्षांची असून हुशार आहे. शिवाय विशेष म्हणजे, रा. श्रीपादराव यासही ती अगदींच अपरिचित नाहीं. येथील सुप्रसिद्ध विद्वान प्रोफेसर डॉ. विश्वनाथराव याच्या हाताखालीं केमिस्ट्रीचा अभ्यास करण्याच्या हेतूने रा. श्रीपादराव येथील कॉलेजांत दोन वर्षें होते, त्या वेळेस कॉलेज गॅदरिंग, मॅगेझीन इत्यादि निमित्तांनीं त्यांचा आणि मालतीचा परिचय झालेला आहे. रा. श्रीपादराव यांच्या हुशारीविषयीं तिला अत्यत आदर आहे. हा संबंध जुळून आल्यास ती आणि आम्ही, तिचे मातापिता, स्वतःला फार भाग्यवान समजू.

पण या बाबतींत अधिक निश्चितपणें बोलणें करण्यापूर्वी आपण व रा. श्रीपादराव याच्या मातोश्री यांच्यादीं एकदा आमच्या मालतीचा परिचय होणें इष्ट वाटतें. शिवाय रा. श्रीपादराव यांचाही पूर्व-परिचय अगदीं निराळ्या व त्रयस्थ स्वरूपाचा असल्यानें त्यांनाही मालूची ‘ परीक्षा ’ करण्याची इच्छा होण्याचा संभव आहे. तरी आपण तिघांनीं जर दोन तीन दिवसांसाठीं आमच्याकडे लवकरच येण्याची कृपा केली तर आम्ही आपले फार आभारी होऊं. आपलें होकारार्थी उत्तर येतांच मी आपल्याला इकडे येण्यासाठीं सोयीच्या

गाड्या व इतर माहिती कळवीन. आपलें इकडे येणें शक्य नसल्यास आम्ही तिकडे येण्याचे ठरवू.

माझी कन्या आपल्या सद्गुणसौंदर्यानें आपल्या पुत्रास अनुरूप अशीच आपल्याला वाटेल याची खात्री वाटते.

कळावें, लोभ असावा हे विनति. पत्रोत्तराची वाट पहात आहे.

आपला कृपाभिलाषी,

**गोपाळ दामोदर कोपरे.**

---

## [२५] खरे आणि खोटे भक्त.

काचनपूर. श्री. सोमवार

अश्विन कृ. ११ शके १८५८

ती. रा. रा. तात्यासाहेब यास सादर साष्टांग नमस्कार वि. वि.

आपलीं पत्रें मिळालीं, मजकूर समजला. येथें लवकरच होणाऱ्या उत्सवाची माहिती आपण विचारली आहे. वस्तुतः शुद्धवृत्तीनें आणि अतःकरणपूर्वक ईश्वरभक्तीनें असे उत्सव केल्यास त्यांची उपयुक्तता काहीं अशीं व्यक्तिशः मलाही मान्य आहे, व मागें पार्वतीपूरला मी अशा एका उत्सवांत भागही घेतला होता. पण येथें जो उत्सव लवकरच होणार आहे त्याबद्दल आणि त्यांत भाग घेणाऱ्या कांहीं प्रमुख व्यक्तींबद्दल जितकें थोडें लिहिलें तितकें बरें. त्या उत्सवाच्या संबंधांत 'प्रभाकरां'त प्रकाशित करण्यासाठीं सोबत पत्र पाठवीत आहे त्यावरून माझें तत्संबंधीं मत आपल्या ध्यानांत येईलच. या पत्राखालीं मीं माझें स्वतःचें नांव न लिहितां ' एक विचारी ईश्वरभक्त ' असें टोपण नांव प्रसिद्धीसाठीं लिहिलें आहे. यांत माझा हेतु इतकाच आहे कीं, ही चर्चा वैयक्तिक भूमिकेवरून चालविण्यास कोणास होतां होईल तों संधि मिळूं नये. शिवाय या चर्चेची झळ मी येथें करीत अस-

लेल्या हरिजन कार्यास लागू नये ( कारण येथील हरिजन कार्य व आगामी उत्सव या दोघांशींही सहानुभूति ठेवणारे कांहीं लोक येथें आहेत ) असाही एक उद्देश या टोपण नांवाच्या मुळाशीं आहे. पण तशी वेळच आली तर माझें नाव जाहीर करण्यास माझी केव्हांही हरकत राहणार नाहीं.

माझा मित्र केशव दाते हा हल्ली पार्वतीपूरलाच आहे. त्याचे वडील कांहीं दिवसांपूर्वी वारल्याने त्याच्यावर हल्ली घर चालविण्याचा सारा भार येऊन पडला आहे. सध्या तो नोकरीच्या शोधात आहे, पण दुर्दैवानें त्याच्यासारख्या हुशार पदवीधर तरुणालाही त्या बाबतींत मारामार पडत आहे ! माझा लवकरच आपल्या तेथें येण्याचा विचार असल्याचें मीं मागील पत्रात लिहिलेच होते. त्यावेळेस मी केशवबद्दल आपणास आणखी सविस्तर माहिती देऊन गाठही घालून देईन.

कळावें, सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

आपला,

**माधव मुद्रे.** ९-११-३६



## २६] सत्याचा खून करणारे सत्यनारायणाचे उपासक.

### प्रभाकर

( अग्रेसर मराठी साप्ताहिक ): संपादक व प्रकाशक:—गो. म. डोळे

ार्वतीपूर, गुरुवार, अश्विन कृ. १४, शके १८५८, ता. १२-११-३६



‘ प्रभाकर ’ चा पत्रव्यवहार.

ा. रा. सपादक ‘ प्रभाकर ’ यास,

स. न. वि. वि. पुढील मजकुरास आपल्या सन्मान्य साप्ताहिकांतून प्रसिद्धी मिळावी अशी विनंति आहे.

यदा आमच्या येथें काहीं सद्‌गृहस्थांनीं येत्या कार्तिक शु. १ पासून का. शु. ११ पावेतों अखंड विठ्ठलनामस्मरणाचा उत्सव साजरा करण्याचे ठरविले असून, त्यासंबंधीं माहिती काहीं वृत्तपत्रातूनही आता प्रसिद्ध झालीच आहे. का. शु. १२ चे दिवशीं उत्सवाचें पारणें होऊन ब्राह्मणभोजनाचा कार्यक्रम होणार आहे असें कळतें.

वस्तुतः आपापल्या मतानुसार ईश्वरभाक्ति करण्याचा प्रत्येक मनुष्याला जन्मसिद्ध हक्क असल्यानें, असल्या उत्सवाच्या विरुद्ध लिहिण्याचें कांहींही प्रयोजन नव्हतें. परतु जनतेनें ईश्वरभाक्ति कोणत्या स्वरूपात करावी हें ठरविण्याचा सर्व हक्क आपल्यालाच आहे अशा वृथाभिमानानें ग्रस्त होऊन, स्वतःची विशिष्ट पद्धति पसत नसणारे ते सारे धर्मभ्रष्ट, नास्तिक किंवा निरीश्वरवादी असे भलभलते प्रलाप कोणी काढू लागला म्हणजे आत्मसमर्थनार्थ काहीं शब्द काढणे आवश्यक होतें. अशतः या आगामी उत्सवात मूळ नामस्मरणापेक्षा बाह्य अवडबरावरच जास्त भर दिला जाणार असल्याचें आढळल्यावरून, आणि अशतः इतर काहीं महत्वाच्या कारणावरून, आमच्या गावातील कांहीं व्यक्तींनीं या उत्सवात प्रत्यक्ष भाग घेण्याचे नाकारले. पण तेवढ्यावरून त्याच्याविरुद्ध स्पष्टास्पष्ट ओरड सुरू झाली असून गांवात नाना प्रकारचे खोटेनाटे गैरसमज पसरविण्यांत येत आहेत. म्हणून त्यांच्यातला एक या नात्यानें या अल्पमतवाद्याची भूमिका स्पष्ट करण्याच्या उद्देशानें हा थोडासा मजकूर लिहीत आहे.

खऱ्या ईश्वरभक्तीचा उगम नम्रपणा, सदाचार, हांतून घडणाऱ्या कुकर्माबद्दल मनःपूर्वक पश्चात्ताप इत्यादि गोष्टींत होत असतो. नीच स्वार्थसाधूवृत्ति आणि खरी अतःकरणपूर्वक ईश्वरभाक्ति यांचें विळयाभोपळयाइतकें सख्य आहे हें सूज्ञास सांगणें नलगे. मात्र असली स्वार्थीवृत्ति आणि ईश्वरभक्तीचें अवडबरपूर्ण ढोंग यांचें सख्य वाटेल

तेव्हां होऊं शकतें ! आज या सुधारणेच्या विसाव्या शतकात मानवी मनाच्या असल्या सडक्या प्रवृत्तींचे तिरस्करणीय प्रदर्शन संसारांत अनेकविध स्वरूपात दृष्टोत्पत्तीस येत आहे. स्वार्थी व्यापारी तूप, आटा, साखर, इत्यादि वस्तूत अपायकारक स्वस्त पदार्थांची खुशाल भेसळ करून, आपल्या दुकानावर विश्वासानें येणाऱ्या बधूच्या आरोग्या-वर अग्नि ठेवण्याचें श्रेय घेत आहेत ! अर्धवट ज्ञान असलेले आणि म्हणून भयकर असे स्वार्थी कुडबुडे वैद्य रोगांनीं पीडलेल्या गरीब जनतेला लुटून आपल्या थोड्याच दिवसाच्या औषधयोजनेनें गिऱ्हाइ-काच्या शरीरप्रकृतींत जमीन–अस्मानाचा बदल घडवून आणीत आहेत ! कोर्टें, कचेऱ्या, ऑफिसे यांतील लहानमोठी स्वार्थी कामकरी मडळी स्वतःच्या स्थानाचा अयोग्य फायदा घेऊन आज कितितरी निरक्षर व गरजू व्यक्तींना निर्दयपणे अडवून लुबाडीत आहेत ! ( कोठें कोठें वरिष्ठ अधिकाऱ्यानीं याविरुद्ध मोहीम काढ-ल्याचेंही प्रसिद्ध होत आहे ). पण सर्वांत मौज अशी कीं, सकाळ, संध्याकाळ, दिवसा, रात्रीं, घरात, घराबाहेर, वेळीं, अवेळीं, यांच्या देवपूजेचें, धर्मप्रेमाचें, ईश्वरभक्तीचें, इतकें ढोंग चालू असतें कीं, एखाद्या नवख्या त्रयस्थाला हे युधिष्ठिराचे किंवा ऋषिमुनींचेच अवतार वाटावेत ! एकीकडे प्रत्यही नीतीची मान मुरगळीत असतां दुसरीकडे देवाच्या नांवानें टाहो फोडायचा ! एकीकडे खऱ्या धर्म-तत्वांच्या उरांत खुशाल दररोज सुरी भोसकावयाची, आणि दुसरीकडे धर्माच्या नांवानें धूपदीप जाळावयाचे ! एकीकडे सत्याचा यःकश्चित स्वार्थापायीं धडधडीत खून करायचा, आणि दुसरीकडे सत्यनाराय-णाच्या पूजेच्या नांवानें मिष्टान्नें भक्षण करावयाचीं ! एकीकडे आप-ल्यांतल्याच पददलित मानव बंधुभगिनींना निर्दयपणें दुःखाच्या खाईत टाकावयाचें, आणि दुसरीकडे देव आमची संकटांतून मुक्तता का

करीत नाहीं म्हणून त्याला केविलवाण्या स्वरात आळविण्याचा आव आणावयाचा ! असला हा प्रकार हेतुपुरःसर राजरोस होताना पाहिला म्हणजे किळसच येते ! आपल्या अशा कृतींत काहीं विसंगति आहे याची कल्पनाच जणूं त्याच्या मनातून नाहींशी झाली आहे. दिवसभर कुकर्मांनीं हात खुशाल मळवावे, सायंकाळीं देवपूजेच्या साबूनें ते धुतले कीं दुसरे दिवशी पुन्हा हात मळवायला मुभा, अशी याची विचारसरणी असावीशी वाटते !

ज्याला खरोखर खाण्याची सुद्धा भ्रांत आहे, मध्यान्हीचा समय होतांच दोन तीन कच्चीबच्चीं चिमणीयेवढीं तोंडे करून केविलवाण्या दृष्टीनें पहात ज्याच्याभोंवती आर्तस्वरानें गिल्ला करू लागतात, त्यानें नाइलाज म्हणून अन्यायानें पैसे मिळविले तर ते एक वेळ क्षम्य व अनुकंपनीय होऊ शकेल, पण ज्यांना ईश्वरकृपेनें अशी विवंचना नसून महिन्याअखेर आवश्यक खर्चवेच वजा जाता थोडी फार शिल्लकच उरते, अशानीं देखील अधिक द्रव्याची हांव धरून निरनिराळ्या प्रकारांनी भोळ्या बिचाऱ्या अज्ञ जनतेला ( आणि कधीं कधीं अडलेल्या सज्ञानाही ) पिळून स्वतःची तुमडी भरण्याचा नीच उद्यम करावा आणि तरीही समाजात ईश्वरभक्तीचे ढोलकें पिटावे हें गर्हणीय होय. अर्थात आज सर्वच ईश्वरभक्ति करणारे लोक या प्रकारचे असतात असें केव्हांही म्हणणें नाहीं, सुदैवानें अंतःकरणपूर्वक देवपूजा व नामस्मरण करणारे महाभाग आजही कधीकधी निदर्शनास येतात, आणि त्यांचें दर्शन झालें म्हणजे आपोआप आदरानें मानही लवते. परंतु केवळ समाजांत आपली प्रतिष्ठा वाढावी या हेतूने केले जाणारे अवडंबरयुक्त मोठमोठे धार्मिकोत्सव पाहिले म्हणजे साहाजिकच त्याच्याशीं सहकार्य करण्याची इच्छा होत नाहीं. पण यावरून आमचा धर्मद्वेष अगर नास्तिकपणा सिद्ध होत नसून

आमच्यावर असले आरोप करणाऱ्यांचा ढोंगीपणा मात्र सिद्ध होत असतो, हें न कळण्याइतकी जनता आता भोळी राहिली नाहीं हें त्यांनीं पूर्णपणें लक्षांत असू द्यावें.

कांचनपूर }　　आपला,
मंगळवार, अश्विन कृ. ११,१८५८ }　　एक विचारी ईश्वरभक्त.

[२७] महत्वाचा ताजाकलम.

पार्वतीपूर.　　श्री　　मंगळवार, ता. ८-१२-३६

रा. रा. रावबहादुर सदाशिवराव केसकर,

रिटायर्ड डिस्ट्रिक्ट जज्ज, नाशिक,

स्वामींचे सेवेशीं कृ. सा. नमस्कार वि. वि.

पत्र पाठविण्यास कारण कीं, गेल्या महिन्याच्या आठ तारखेस मी माझी उपवर कन्या कु. मालती हिचा आपले विद्वान चिरंजीव रा. श्रीपादराव याच्याशीं विवाह जमवून आणण्याची खटपट करण्याच्या उद्देशानें आपल्याकडे एक पत्र पाठविलें होते, ते आपल्यास पोंचलेंच असेल. त्याचे उत्तरीं कांहीं न कळल्यानें हें पत्र पुन्हा पाठवून आपल्यास तकलीफ देत आहे याची माफी असावी. तरी सत्वर उत्तर पाठविण्याची कृपा केल्यास आभारी होईन.

त्या पत्रात मी विनति केल्याप्रमाणें आपला इकडे येण्याचा विचार असल्यास मला तसें कळविण्याची कृपा व्हावी, तसा विचार नसल्यास आम्ही तिकडे येऊ.

कळावें, लोभ असावा हे विनंति. उत्तराची वाट पहात आहे.

आपला कृपाभिलाषी,

गोपाळ दामोदर कोपरे.

ता. क. आपण तिघांनीं आमच्या इकडे येण्याची कृपा केल्यास

त्याचा प्रवासखर्च मी आपल्यास देईन हें लिहिणें नकोच.

गो. दा. को.



## [२८] देशोद्धाराचे एक सुलभ साधन !

### धर्मपत्रिका

पार्वतीपूर, बुधवार, कार्तिक कृ. ११ शके १८५८, ता. ९-१२-३६



काचनपूर येथील कार्तिकी एकादशीचा उत्सव

अखड नामपाठाचा यशस्वी कार्यक्रम ! सुधारकांच्या विरोधाचा बोजवारा !

( आमच्या खास बातमीदाराकडून )

पूर्वी जाहीर केल्याप्रमाणे या वर्षी काचनपूर येथील भव्य विठ्ठलमंदिरांत कार्तिकी एकादशीच्या उत्सवाचा अभिनव कार्यक्रम कांहीं धर्मप्रेमी सज्जनांच्या दुर्दम्य उत्साहानें अत्यत यशस्वी रीत्या पार पडला. उत्सवास कार्तिक शुद्ध प्रतीपदेचे दिवशी सूर्योदयाचे शुभअवसरीं जगन्नायक पांडुरंगाच्या जयघोषानें प्रारभ झाला ! तेव्हांपासून बरोबर अकरा दिवस म्हणजे कार्तिक शुद्ध द्वादशीचे सूर्योदयापावेतों श्रीविठ्ठलाचें अखंड नामस्मरण चाललें होतें !! शिवाय या अवधींत भक्तश्रेष्ठ तुकाराममहाराजांच्या समग्र गाथेचेंही दोनदा संपूर्ण पारायण झालें ! प्रत्येक तासातासानें नामस्मरणाचा पहारा बदलत असल्यानें कोणालाही कटाळवाणें न वाटता अकरा दिवसांच्या अखंड नामपाठाचा हा प्रचड कार्यक्रम श्रीगणेशाच्या आशीर्वादानें आणि धर्माभिमानी सज्जनांच्या सहकार्यानें निर्विघ्नपणें पार पडला. दररोज सकाळ सायकाळ श्रीविठ्ठलाची आरती आणि शिवाय प्रत्येक रात्रीं सुश्राव्य कीर्तन यांचीही जोड मिळाल्याने कार्यक्रमास फार आकर्षकता आली

होती. फार काय सांगावें ! त्या अकरा दिवसात आपण कांचनपुरात नसून प्रत्यक्ष पढरपुरांतच वावरत आहोत असा येथील जनतेस भास झाला असल्यास नवल नाहीं ! एकादशीचे दिवशीं तर भक्तिरसाचा पूरच लोटला होता ! बाल आणि वृद्ध, स्त्री आणि पुरुष, सर्व जण विठ्ठलचरणीं लीन होऊन नामस्मरणांत मग्न झाले होते. द्वादशीचे दिवशीं सर्व उत्सवाचे पारणें होऊन मोठें ब्राह्मणभोजन झालें. या उत्सवाची मूळ कल्पना काढण्यापासून तों थेट पारण्याच्या दिवशीच्या ब्राह्मणभोजनाच्या उष्ट्या पत्रावळी फेकण्याची व्यवस्था करण्यापर्यंत सर्व कार्यक्रम यशस्वी करण्याचें श्रेय, बव्हशीं येथील सुप्रसिद्ध धर्मपरायण बाळकृष्णपत काणे आणि मुरलीधरपत एकबोटे या दोघा थोर सज्जनांच्या अव्याहत व स्वार्थरहित परिश्रमाकडेच जाते यात सशय नाहीं. अशा विभूतींकडे पाहिलें म्हणजे ‘ धर्मसस्थापनार्थाय सभवामि युगे युगे ’ या भगवद्वचनाचें प्रत्यक्ष प्रमाण हातीं आलेसें वाटल्यास नवल नाहीं !! ईश्वर त्यांना चिरायु करून उत्तरोत्तर अशीच धर्मसेवा त्यांचे हातून घडवून आणो.

या उत्सवाला प्रथमपासूनच कांहीं अहमन्य तरुण सुधारकानीं —सुधारक कसले दुधारकच ते—विरोध दर्शवून आपल्या मूर्खपणाचें व नास्तिकतेचें प्रदर्शन करण्यास कमी केलें नाहीं. गावात तोंडीच नव्हे तर ‘ प्रभाकर ’ सारख्या पाखंडी वृत्तपत्रांतूनही त्यांनीं कोल्हे-कुई करण्यास मागेपुढे पाहिलें नाहीं. परतु एखाद्या अज्ञ मनुष्यानें आपल्या हातानें स्वतःचे डोळे झांकल्यानें सूर्याचें तेज कमी होत नाहीं, त्याप्रमाणे या दीडशहाण्या मूठभर नास्तिकांच्या असहकारानें उत्सवाच्या यशस्वितेस कोणतीही बाधा येऊ शकली नाहीं ! यांच्या-सारख्या कितीही श्वानांनीं आपलें संगीत सुरू केलें तरी उत्सवाचा आणि हिंदुधर्माचा ऐरावत आपली गति त्यामुळें कधींही सोडणार

नाहीं हें यांनीं पूर्णपणें लक्षांत ठेवावें ! प्रथम यानीं उत्सवात आरतीच्या वेळेस तरी येथील अस्पृश्यांना मंदिराच्या अंगणात ओट्याखालीं उभे राहण्याची मुभा देत असाल तर आम्ही यांत सहकार्य करू शकू, असा उद्दामपणाचा निरोप उत्सवचालकांचेकडे पाठविला होता; पण ' चंचुप्रवेशे मुसलप्रवेश. ' या चाणक्यनीतीचें पूर्ण ज्ञान असलेले धर्मवीर काणे यांनीं असल्या भ्रष्टाकारास संमति देण्याचें तात्काळ नाकारलें. अशा रीतीनें अयशस्वी झाल्यावर यानीं गांवात उत्सवचालकांच्या विरुद्ध नानाप्रकारच्या कड्या पिकविण्यास प्रारंभ केला. विशेषतः पारण्याच्या दिवशीं ब्राम्हणभोजन झाल्यानंतर उष्ट्या पत्रावळीसाठीं कांहीं अस्पृश्य गोळा झाले असता, त्यातील ' चंदी ' नांवाच्या एका भगिणीनें पत्रावळीच्या लोभाने मंदिराच्या आवारांत पाय टाकतांच, धर्मावतार श्री. मुरलीधरपंत एकबोटे यांना तो अनाचार सहन न होऊन त्यांनी तिला तत्क्षणीं बाहेर हाकलून दिलें, या सत्य कथेचा विपर्यास करून श्री. एकबोटे यांनीं तिला एक पादत्राण फेकून मारलें असला धडधडीत असत्यारोप करण्यासही या धर्मद्वेष्ट्यांनीं प्रारंभ केला आहे असे समजतें ! वस्तुतः धर्मावताराच्या हांतून पादत्राण मारून घेण्याचें सौभाग्य त्या यःकश्चित भंगिणीस विठ्ठलमंदिराच्या पवित्र आवारांत लाभलें असतें तर त्यांत तिचा पारलौकिक लाभच झाला असता ! परंतु तसें कांहीं घडले नसतां, केवळ एकबोटे यांची समाजांत बेअब्रू करण्याच्या नीच उद्देशाने हे स्वतःस सत्त्ववादी म्हणविणारे सुधारक वाटेल तशा अफवा गावात फैलावीत असल्याचे पाहून यांच्या अज्ञानाची कींव करावी, किंवा याच्या दुष्टपणाबद्दल यांना शासन करावें, हेंच क्षणभर कोडे पडते ! तेजस्वी दिव्यावर झेप घालणाऱ्या आत्मघातकी शलभाप्रमाणें धर्मवीराशीं प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष विरोध करणाऱ्याची स्थिति झाल्याशिवाय राहणार नाही, हे यानीं नीट लक्षात ठेवल्यास

त्यांचें पुष्कळ हित होईल !

अस्तु. गांव तेथे महारवाडा या न्यायानें प्रत्येक गांवांत आजकाल आढळून येणाऱ्या या विरोधकाची खरी लायकी सूज्ञ जनता चांगल्या प्रकारें ओळखीत असून, त्यांच्या प्रलापांचा इतका उल्लेख करण्याच्याही लायकीचे ते नाहींत ! स्वतःचें नांव जाहीर करण्याचेंही धैर्य नसल्यानें, बुरख्याआडून टीका करणाऱ्या प्रभाकर—भीत शिखंडींना सत्याची खरी चाड असल्यास त्यांनीं प्रथम बुरख्याबाहेर यावें, आणि मग आपल्या ' विचारी ईश्वरभक्तीचें ' प्रदर्शन करावें असें येथील उत्सवचालकांचे त्यांना जाहीर आव्हान आहे ! मात्र मध्यतरीं असल्या टीकांची मुळींच भीड न ठेवतां, पंढरपूरची भक्तिगंगा येथें कांचनपुरांत आणणारा हा भगीरथ उत्सव आता प्रतिवर्षी असाच चालवून हिंदुधर्माचें नाव उज्वल राखावें, अशी आमची श्री. काणे आणि एकबोटे यांना कळकळीची विनंती आहे. असे धार्मिक उत्सव जागोजागीं वारंवार होत राहिल्यास ईश्वराची कृपा होऊन या अभागी देशाला पुनः स्वराज्याची पूर्वीची सुस्थिति प्राप्त होण्यास काय उशीर लागणार ?



[२९] **बातमी पसरूं लागली.** (श्रीं. गो. दा. कोपरे यांस बंधूचें पत्र)

लखनौ. श्री. गुरुवार, ता. १०-१२-१९३६

ती. रा. रा. नानांस मनोहरचा साष्टांग नमस्कार वि. वि.

गेल्या महिन्यांत आलेलें आपलें पत्र पावलें. त्यावरून चि. मालतीचें पुढील शिक्षण तूर्त बंद असल्याचें दिसून येतें. तरी येत्या नाताळांत तिला इकडे पाठविल्यास आम्हा सर्वांस आनंद होईल. चि. सुशिलेला तिला भेटण्याची फार इच्छा आहे.

सुशिला यंदा मॅट्रिकला बसणार आहे. शिवाय तिला पेन्टिंगची बरीच आवड असल्यानें त्याही दृष्टीनें तिचा अभ्यास चालू आहे.

आता ती काहींशीं बरीं चित्रें काढू लागली आहे. तिनें नुकतेंच काढलेलें सूर्योदयाचें एक चित्र यासोबत पाठविलें आहे.

चि. मालतीचा विवाह यदा करावयाचा आपला विचार आपण लिहिला असून, नाशिकच्या एका स्थळासंबंधीं खटपट करीत असल्याचेंही उल्लेखिलें आहे. तरी तेथील उत्तर काय आलें तें कळवावें. कारण तेथें जमल्यास उत्तमच, न जमल्यास मीही येथें खटपट करून पाहीन.

पण त्याबरोबरच वरासंबंधीं आपली इच्छा व कल्पना आपण खुलासेवार कळवावी. कारण मालतीसारख्या पदवीधर मुलीचा विवाह जमविणें म्हणजे कांहीं एखाद्या जुन्याकाळच्या अशिक्षित मुलीचें लग्न ठरविणें नव्हे. यासंबधांत तात्त्विक वादविवाद आपण मागें अनेकवार केला आहे. पण आता प्रत्यक्ष प्रश्न समोर उभा असल्यानें यावेळेस आपलें नक्की काय मत आहे तें कळलेलें बरें.

कळावें, हे विज्ञापना. आपला बंधू,

**मनोहर कोपरे.**

ता. क. तेथील आपल्या ओळखीचे वामनराव दत्तरे याचा एक मुलगा व मुलगी येथें शिकत असतात. तेथें त्याचेबद्दल काय माहिती असेल ती असो, पण येथे त्यांचेविषयीं एकदरींत चांगलें मत नाहीं. त्याचेकडे मधूनमधून लक्ष असू द्यावें म्हणून रा. दत्तरे यांनीं आपल्यामार्फत मला मागें सुचविलें होते, पण ते मला कधींच भेटत नाहींत. एकदोनदा बरेच महिन्यापूर्वी चि. सुशिलेला फिरावयास जाण्यासाठीं बोलाविण्याकरिता नंदिनी आमचे घरा आली होती; पण त्यावेळेस मी घरीं नव्हतों. दोन महाराष्ट्रीय व्यक्तींनीं इकडे येऊन अपकीर्ति मिळवावी आणि जनतेत टीकाविषय व्हावे याबद्दल मनास फार खेद वाटतो. मनोहर.

## [३०] एक विलक्षण गूढ.

पार्वतीपूर. श्री. मंगळवार ता. १५-१२-१९३६.

चि. रा. माधवराव यांस सप्रेम आशीर्वाद.

तेथील उत्सवासबंधीं तुम्ही पाठविलेले पत्र ता. १२-११-३६ च्या 'प्रभाकर' मध्यें प्रकाशित झाल्यानंतर 'धर्मपत्रिकें' तही त्यासंबंधांत बराच मजकूर येऊन गेला आहे, तो तुमच्या वाचण्यांत आला असेलच.

तुमच्या मागील पत्रात तुम्ही तुमचा इकडे लवकरच येण्याचा विचार असल्याचें लिहिलें होते. परतु अद्याप तुमची भेट झाली नाहीं. एका विशेष कारणासाठीं हा दुःखी म्हातारा तुमच्या भेटीची आतुरतेनें वाट पाहत आहे.

माधवराव, मी स्वतःला दुःखी असें विशेषण लाविलेले वाचून इतरांइतकें जरी नाहीं तरी थोडेसें आश्चर्य तुम्हाला देखील वाटण्याचा संभव आहे. पण माझी सारी वस्तुस्थिति कळली तर तुम्हाला माझ्या मनःस्थितीचीं यथार्थ कल्पना येऊन अनुकपा वाटल्याशिवाय राहणार नाहीं. बरेच वर्षांपूर्वी माझा एकुलता एक मुलगा आम्ही कुंभमेळ्यासाठीं हरिद्वारला गेलो असतां तेथे गर्दीत हरवला हे तुम्हाला माहीत असेल. पण तो कसा हरवला याची खुलासेवार माहिती मी कोणास विशेष कधीं सांगितली नाहीं. आतां मात्र मी ती सर्व तुम्हाला कळविण्याचा विचार केला आहे. कारण ती सगळी तुम्हाला नीट कळली म्हणजे अलीकडे चारपाच वर्षांपासून उत्पन्न झालेल्या आणि गेल्या उन्हाळ्यापासून कळसास पोंचलेल्या एका बिलक्षण घोंटाळ्याच्या परिस्थितींतून बाहेर पडण्यासाठीं तुम्ही मला योग्य साह्य देऊं शकाल. आतां या प्रकरणाचा लवकर कांहीं तरी नक्की तपास लावावा अशी मनाला तीव्र तळमळ लागली आहे. तरी तुम्ही येत्या नाताळच्या

सुटींत येथें येणार आहां काय हें कळवावें. कारण तुमचा तसा विचार नसल्यास ती सर्व हकीकत तुम्हाला पत्रद्वारें तरी कळवीन.

कळावें, हे आशीर्वाद. पत्राचे उत्तर लवकर यावें.

आपला,

**गोविंद महादेव डोळे.**



[३१] **मुलाचा बाप.**

नाशिक श्री. शनिवार ता. १९–१२–३६

रा. रा. गोपाळराव कोपरे, पार्वतीपूर, यास

स. नमस्कार वि. वि.

आपलेकडून आलेलीं दोन्हीं पत्रें पोहोचलीं. मजकूर समजला. आपल्या पत्राच्या वाचनानें फार दिवसांच्या आठवणी जागृत होऊन एक प्रकारचा उदास आनंद वाटला. ‘ तेहि नो दिवसा गताः ’

चि. श्रीपादचा विवाह जमल्यास यंदा करण्याचा आमचा विचार आहे हें खरे आहे. आतांपावेतो आम्हीं पुष्कळ मुली पाहिल्याही आहेत; पण अद्याप कोठें निश्चित ठरविलें नाहीं. आपल्या कन्येचा आणि त्याचा पूर्वीचा थोडासा परिचय आहे ही आनंदाची गोष्ट आहे. त्याला लवकरच आय्. सी. एस्. साठीं इंग्लंडला पाठविण्याचा आमचा विचार आपल्यास माहीतच आहे. पण आय्. सी. एस्. साठीं इंग्लंडला जायचें म्हणजे मोठाच खर्च ( अर्थात् पुढें फायदाही तसाच होण्याचा संभव ). त्याच्या विवाहाचा प्रश्न निश्चित करताना याही गोष्टीकडे आम्हांस लक्ष देणें भाग आहे. माझ्या स्वतःच्या मागें आणखी इतर मुलामुलींचा खर्च असल्याने मी माझ्या स्वतःच्या हिमतीवर त्याची आय्. सी. एस्. होण्याची इच्छा पूर्ण करूं शकेन असें वाटत नाहीं. काय ईश्वर करील तें खरें !

आपण हें पत्र पोहोचतांच आमच्या जातायेतांच्या प्रवासाचे पैसे पाठवून दिले तर या नाताळाचे सुटींतच तेथें येऊन जाऊं. श्रीपाद-बरोबर आजकालच्या प्रघातानुसार त्याचे दोन मित्रही येणार आहेत.

कळावें, लोभ असावा हे विनति. आपलें उत्तर लवकर यावें, कारण आणखीही एक दोन ठिकाणीं याच कामासाठीं जाणें आहे.

आपला कृपाभिलाषी,

**रावबहादुर केसकर.**

**ता. क.** पैसे सेकंड क्लासच्या भाड्याचे पाठवावे हें लिहिणें नकोच.



## [३२] हृदयद्रावक पूर्वेतिहास.

पार्वतीपूर श्री. शुक्रवार ता. ८–१–१९३७

चि. रा. माधवराव यांस सप्रेम आशीर्वाद.

तुमचें पत्र काल मिळालें. तुमच्या वडिलांच्या प्रकृतीच्या कारणामुळें तुम्ही गेल्या नाताळांत येथे येऊ शकला नाहीं हें वाचून वाईट वाटलें. तरी आता त्याची प्रकृति कशी आहे तें कळवून काळजी दूर करावी. तुमची प्रत्यक्ष भेट आतां कांहीं दिवस तरी होण्याचा संभव नसल्यानें माझ्या मागील पत्रांत उल्लेखिलेली हकीगत या पत्रांत आता तुम्हाला सविस्तर कळविण्याचा मी विचार केला आहे.

त्या गोष्टीस आतां बावीस वर्षें होत आलीं आहेत. लहानसा खेळकर प्रभाकर त्यावेळेस तीन साडेतीन वर्षांचा असेल. आम्ही उत्तर हिंदुस्थानात आग्र्यास रहात होतों. माझे आईबाप मूळचे पार्वतीपूरचेच रहिवाशी असून माझें बालपण व विद्यार्थीपण येथेंच गेलें. पुढें बी. ए. झाल्यावर मला योगायोगानें आग्रा येथें एका चांगल्या बॅंकेंत सव्वाशे रुपये पगारावर नोकरी लागली. तेथें आम्ही

राहात असता, सन १९१५ मध्यें सुप्रसिद्ध कुंभमेळा प्रचंड प्रमाणावर हरिद्वारला भरला होता त्याला जाण्याचा प्रभाकरच्या आईनें फार आग्रह धरल्यानें, ती, मी आणि तो असे तिघे त्या वर्षी फेब्रुवारी महिन्यांत तेथें गेलों. महाशिवरात्रीचा दिवस म्हणजे त्या मेळयांतला एक अत्यंत महत्त्वाचा दिवस. अखिल हिंदुस्थानातून असंख्य लोक त्या दिवशीं 'हरीच्या पायरी' जवळ गंगास्नान करण्याच्या उद्देशानें आले होते. लहान, मोठे, स्त्री, पुरुष, गृहस्थ, साधू, इत्यादिकाची एकच गर्दी झाली होती.

अशा त्या दिवशीं गंगास्नानाचें महत्पुण्य कसेंबसें पदरात पाडून आम्ही तिघे सकाळीं दहाचे सुमारास परत आमच्या खोलीकडे जात होतों. रस्त्यात लागलेल्या मेळयात एका दुकानावर असलेल्या एका लहानशा मोटरसाठीं प्रभाकरने फार नाद घेतल्यानें आम्ही परत फिरून मेळयात आलों. दुकानातून ती मोटर घेऊन प्रभाकरच्या हातांत दिली आणि मी तिचे पैसे दुकानदारास देत होतों. इतक्यात एकाएकीं एक मस्त हत्ती मोकळा सुटून इकडे तिकडे धावू लागल्याची हूल उठली. (हातात ती मोटर घेऊन उभ्या असलेल्या प्रभाकरचें दृश्य आजही माझ्या डोळयासमोर स्पष्ट दिसत आहे) हत्तीच्या आक्रमणाच्या भीतीनें जीव घेऊन सैरावैरा पळत सुटणाऱ्या लोकांचा जबरदस्त लोंढा आमच्या अंगावर येऊन आदळला! जिकडे तिकडे धावपळ आणि आरडाओरड चालली होती. मोठ्या मुष्किलीनें मी प्रभाकरला उचलून एका हातानें पत्नीला धरून बाजूला होण्याचा प्रयत्न करू लागलों. दृष्टीआड असलेल्या हत्तीपेक्षां दृष्टीसमोरच्या लोकांच्या जमावाचीच मला भयंकर धास्ती वाटू लागली. लोक मूर्खासारखे चारी दिशांनीं आणि चारी दिशांकडून धावत होते. श्वास घेणेंही कठीण जाऊं लागले. जिकडे पहावें तिकडे लोक रेटीतच

होते. शेवटीं मागून येणाऱ्या गर्दीचा भार अगदीं असह्य होऊन पत्नीचा हात माझ्या हातांतून सुटला, आणि मी तिला इकडे तिकडे पाहण्याचा प्रयत्न करतो, तोंच दुसरा एक जबरदस्त धक्का बसून माझा लाडका प्रभाकर माझ्या हातांतून घसरला. पुढले दृश्य मला पाहवेना. आतां या मागून आणि पुढूनही येणाऱ्या अनिवार्य लोंढ्या-पुढें माझ्या बाळाचें काय होणार याची कल्पना मनांत येऊन माझ्या डोळ्यापुढें अंधारी आली, आणि क्षणमात्र अश्रूंनीं डबडबलेले माझे डोळे मिटले. लोक रेटींतच होते. मीही आता दुःखानें अगदीं भानरहित होऊन कांहीं विरोध न करूं शकतां, एक क्षण लोकाचा जबरदस्त प्रवाह नेईल तिकडे असहायतेनें वहात गेलों. पण दुसऱ्याच क्षणीं भानावर येऊन पहातों तों काय, जिकडे तिकडे तोच अफाट जनसमुदाय आणि कानठळ्या बसविणारा आरडाओरडा ! माझा पुत्र किंवा माझी पत्नी यांपैकीं कोणीच मला दिसेना. कित्येक लोकांनीं उंच हात करून आपल्या खांद्यावर मुलें धरून ठेवलीं होतीं. माझ्या नेत्रांतल्या अश्रुधारा मला आवरेना.

कांहीं वेळानें लोकाचा जमाव पांगला. तो अनर्थकारक हत्तीही पोलिसांच्या साह्यानें पकडला गेला. कित्येक लोक तुडवले जाऊन बेशुद्ध पडले होते; त्यांना सरकारी रुग्णालयाच्या तंबूत नेण्यांत आलें. तेथें मी तपास केला, परतु प्रभाकर किंवा त्याची आई यांची भेट झाली नाहीं. शेवटीं दुःखित अंतःकरणानें असाच भटकतां भटकतां दुपारीं सुमारें दोन वाजतां माझी पत्नी 'गंगाद्वार' मंदिरापाशीं मला आढळली. ती बिचारी आमच्या काळजीनें ग्रस्त होऊन अश्रुपात करीत बसली होती; तिच्या जवळच कांहीं उत्तरहिंदुस्थानी स्त्रिया तिला धीर देत होत्या.

आमची दोघांची गांठ पडली खरी; पण माझ्याजवळ आपला

लाडका पुत्र नाहीं हे पाहताच तिची काय अवस्था झाली असेल तें कल्पनेनेंच जाणलेलें बरें. मलाही शोकावेग अनावर झाला. पण कांहीं तरी करणें भागच होते. त्या अनोळखी प्रदेशात एका मंदिराच्या पायथ्याशीं नुसते रडत बसल्यानें आतल्या देवाने एकदम आमचा प्रिय पुत्र आमचेपुढे आणून उभा करण्याइतके आम्ही पुण्यवान नव्हतो ! म्हणून लवकरच मीं माझें मन कसेंबसें आवरलें आणि तेथील पोलिसठाण्यावर पुन. चौकशी केली, पण व्यर्थ ! मात्र आमच्याप्रमाणेंच आणखीही कांहीं दुर्दैवी मातापिता तेथें आम्हास आढळून आले. त्यापैकीं कांहींचीं मुलें सापडत होतीं, तर इतर कित्येकांच्या वाटेला निराशाच येत होती कांहीं थोडीं मुलें तर चेंगरून अगर गुदमरून गतप्राण झाल्याचे प्रत्यक्ष दिसत होते, त्याच्या जन्मदात्याची स्थिति तर वर्णावयासच नको आमच्या प्रभाकराविषयीं मात्र कोणत्याच प्रकारची माहिती मिळेना. शेवटीं त्याच्या तपासासाठीं मुद्दाम दोन दिवस तेथें राहून आम्ही दुःखित अंतःकरणाने पुत्राशिवायच घरीं परतलो. प्रभाकरासहित गेलेलो आम्ही प्रभाकररहित होऊन रात्रीच्या वेळेस आग्र्यास येऊन आमच्या घरात शिरलो !

आधींच अशक्त असलेल्या माझ्या पत्नीवर या पुत्रवियोगाचा फारच परिणाम झाला. मी माझें स्वतःचे दु.ख आवरून तिचें सांत्वन करण्याचा बराच प्रयत्न केला, इतरानींही केला. पण जसजसे दिवस अधिकाधिक लोटू लागले, आणि मुलाचा मात्र कांहींच पत्ता लागेना, तसतशी ती फारच निराश होऊ लागली. अहोरात्र तिला आपल्या प्रभाकरचा ध्यास लागला. शेवटीं या शोकाचा भार तिच्या दुबळ्या शरीरास सहन न होऊन, आमचा प्रभाकर अस्तास गेल्यानतर एक वर्षाच्या आंतच माझी सहधर्मचारिणी आपल्या पुत्राचा तपास पृथ्वी-तलावर करण्याचें काम मजवर सोंपवून त्याला स्वर्गात शोधण्यासाठीं

स्वतः तिकडे चालती झाली ! या अपार संसारात मी एकटा राहिलों; बारा महिन्याच्या आत नंदनवनासमान माझ्या घराचें रूपांतर सहारा वाळवंटात झालें, दीपिका आणि प्रकाश दोन्ही जाऊन माझ्या मानस-मंदिरात अंधाराचें साम्राज्य पसरलें. या सर्व घटनेमुळें जीवनातली गोडी नाहींशी होऊन मला वैराग्य प्राप्त झाले. पुन्हा वैयक्तिक संसाराच्या मायाजालात न अडकण्याचा मी निश्चय केला. आग्रा येथील नोकरीचा, माझे सहकारी आणि वरिष्ठ नको नको म्हणत असताना, मी राजी-नामा दिला. बॅंकेच्या डायरेक्टरानीं, माझ्या वरिष्ठाच्या खास शिफा-रसीवरून, त्याच्या नेहमीच्या प्रघाताविरुद्ध, माझी नोकरी पूर्ण झाली नसतांही, मला तहाहयात महिना पन्नास रुपये घरबसल्या मिळण्याची व्यवस्था करून दिली. मी तेथील सर्व संसार आटोपून येथे माझ्या मातृभूमींत आलों; व मजजवळ साचलेल्या पैशाच्या साह्यानें एक साप्ताहिक वर्तमानपत्र चालवून, त्याद्वारें संघटन, सुधारणा व साहित्य या दृष्टींनीं लोकजागृति करण्याच्या कार्यास वाहून घेण्याचें ठरवून त्याप्रमाणें लागलीच प्रारंभ केला. ईश्वरकृपेनें माझें वृत्तपत्र जनतेला चांगलेंच आवडलें व आज कित्येक वर्षांपासून तें स्वतःच्या उत्पन्ना-तून स्वतःचा सर्व खर्च उत्तम रीतीनें भागवीत आहे. कळावें, हे आशीर्वाद. बाकीचा मजकूर पुढील पत्रीं कळवीन. आपला,

गो. म. डोळे.

---

## [३३] मातेच्या इच्छेसाठीं कर्तव्य सोडावें काय ?

माधव मुद्रे याच्या खासगी वहींतला उतारा.

शनिवार, मार्गशीर्ष कृ. १२ शके १८५८.

त्या चंदी भगिणीला मारहाण केल्याबद्दल तिच्यातर्फे श्री. एकबोटे यांच्यावर फिर्याद दाखल करण्याचा विचार मी जाहीर करताच, बाहेर

लोकांत तर वादळ उठलेच, पण मला काहींशी कल्पना होती त्याप्रमाणे घरातही ते उठलेच. काय करावे ! बाहेरच्या विरोधाची मी फारशी पर्वा करीत नाहीं; पण या घरातल्या विरोधापुढे मात्र कधींकधीं मन कच खाऊ लागते. एका ब्राह्मणावर भगिणीतर्फे फिर्याद दाखल व्हावी आणि त्यात मी पुढाकार घ्यावा हे ऐकून आईला राग आला यात तसे पाहिले तर काहींच नवल नाहीं. गेल्या दोन वर्षांपासून मी हरिजन कार्यांत प्रत्यक्ष भाग घेऊ लागल्यानें आईच्या पूर्वीच्या कल्पना काहींशा बदलल्या आहेत हे खरे, पण एका हरिजनस्त्रीतर्फे ब्राह्मणावर योग्य कारणासाठीं झालेली फौजदारी फिर्याद सहन करण्याइतकी तिच्या मनाची तयारी अद्याप झाली नाहीं. लहानपणापासून ज्या कल्पना उराशीं बाळगल्या त्या एकाएकीं बदलणार तरी कशा ?

पण यात माझा तरी काय इलाज आहे ! समाजातील एका असहाय व्यक्तीवर होत असलेला धडधडीत अन्याय पाहून देखील जर मी आईच्या मुलाजास्तव त्या व्यक्तीला साह्य करणे सोडीन तर तें माझ्या भेकडपणाचेच लक्षण होईल. माझ्या स्वतःवर अन्याय झाला असता तर ती गोष्ट निराळी होती. पण त्या ' चदी ' वर झालेल्या अन्यायाकडे मी कशी डोळेझाक करूं ? श्री. एकबोटे यानीं तिला का मारहाण करावी ? भगीण झाली म्हणून काय तिला अगदीं कःपदार्थ समजावयाचें ! तिला बिचारीला मानापमान, सुखदुःख, अब्रूची चाड, काहींच नाहीं का ? तिला थोडेच का होईना पण जें लागलें, त्याबद्दल एकबोटे यानीं सरळ दिलगिरी प्रदर्शित करावयाची तें सोडून वर शिव्या का दिल्या ? हें सारें काय त्याच्या त्या दयाघन दीनानाथाला आवडलें असेल !

आईबापांच्या इच्छेखातर कर्तव्यावर पाणी सोडणें कितपत् योग्य होईल ? सुखावर पाणी सोडणें निराळें आणि कर्तव्यावर पाणी सोडणे

निराळें. रामाने पित्याच्या आज्ञेचें पालन केले हे जगप्रसिद्ध आहे; पण त्याच रामानें मातापित्यांची अवज्ञा केली ह्याकडे मात्र लोकांचे जावें तितके लक्ष जात नाहीं. चौदा वर्षे वनवासाची दशरथाची आज्ञा शिरसावंद्य मानून रामाने स्वतःचे कर्तव्य निश्चित केल्यावर मात्र, माता व पिता यानीं या कर्तव्याच्या विरुद्ध अयोध्येत राहण्यासाठीं केलेल्या सूचना रामाने मुळींच ऐकल्या नाहींत. मातापित्याच्या दारुण मानसिक व शारीरिक दुःखाची यत्किंचितही पर्वा न करता श्रीरामचंद्राने आपल्या कठोर कर्तव्याचे पालन नाहीं का केले ?

आई, तू स्वतः दूषित पूर्वग्रह सोडून निःपक्षपातीपणाने विचार करशील तर तुलादेखील माझे करणे योग्य दिसेल अशी मला खात्री वाटते. आणि तसें होऊन जर तुझ्या पाठिंब्यानें मी ही लोकसेवा करू शकलों तर ती किती आनंदाची गोष्ट होईल ? मग मला साऱ्या जगाने विरोध केला तरीही मी डगमगणार नाहीं. पण माझ्या दुर्दैवाने तुझा मनःपूर्वक पाठिंबा मला या पवित्र कार्यांत अद्याप तरी मिळत नाहीं, आणि त्यामुळें कर्तव्याचे पालन करूनही घरांत आलें कीं माझ्या मनाला समाधान वाटत नाहीं तुझा मानसिक ताप पाहिला कीं मन विषण्ण होते. बरे, तुझ्या समाधानासाठी कर्तव्यपालन सोडलें तरी माझ्या मनाला मुळींच स्वस्थता वाटणें शक्य नाहीं. एकूण, पूर्ण मानसिक समाधान माझ्या भाग्यात नाहीं हेच खरें ! पण इतका मात्र विश्वास वाटतो कीं, कर्तव्यपालन आणि मातेचे समाधान यांत विरोध उत्पन्न झाला असता, जर मी पहिल्यालाच अधिक महत्त्व दिलें तर अविचारी लोकांनीं मला नांवें ठेवलीं तरी निदान ईश्वर मला दोष देणार नाहीं खास ! .. ९-१-३७



## [३४] पूर्वेतिहास (चालू ).

पार्वतीपूर			श्री.			शनिवार ता. १६-१-३७

चि. रा. माधवराव यास अनेक आशीर्वाद.

तुमचे ता १२ चे पत्र पोचलें. माझ्या मागील पत्रातली अर्धवट राहिलेली हकीगत पुढे चालू करतो.

पार्वतीपूर येथे येऊन मी स्थायिक झाल्यानतर दिवसामागून दिवस आणि वर्षामागून वर्षे जात होती. हळूहळू माझ्या 'प्रभाकरा' चा प्रसार, आणि त्या बरोबरच पसारा, जास्त जास्त वाढत होता. 'प्रभाकर' चे कार्य करून उरलेल्या फुरसतींत इतर सामाजिक चळवळीत भाग घेऊन मी माझे मन तिकडे गुतवीत होतों. दिवसातले बरेच तास या प्रकारें 'प्रभाकर' कचेरींत किंवा सार्वजानिक कार्यांत जाऊ लागल्याने दु:खभार हलका होऊ लागला; पूर्वस्मृतींची तीव्रता कमी होऊ लागली, घरांतला एकटेपणा सवयीनें तितकासा जाणवेनासा झाला.

हा माझा जीवनक्रम अदाजें तीनचार वर्षे निर्वेधपणें चालला. त्यानतर एक नवीनच आकस्मिक घटना घडून आली. त्या सुमारास माझे लहान बधू एकाएकीं कॉलऱ्याला बळी पडले, आणि त्याची पत्नी व दोन लहान मुली याना मी माझ्या घरीं घेऊन आलों. वडील मुलगी बेबी ही त्यावेळेस चार वर्षांची असावी. या बालिकाच्या आगमनानें माझ्या एकाकी जीवनात पुनरपि प्रेमळपणा व वात्सल्य याचा गोड प्रवेश होऊन नवीनच स्वारस्य उत्पन्न झाले. त्याच्या बोबड्या बालिश बोलानीं प्रथम प्रथम जरी मला माझ्या लहानशा प्रभाकरचें स्मरण होऊन दु:ख होई, तरी लवकरच मला त्यांचा व त्याना माझा लळा लागून त्यांच्याशीं बोलण्यात, खेळण्यांत, त्यांना शिकविण्यांत निर्भेळ आनद होऊ लागला. मध्यतरी बरींच वर्षे

माझ्या ज्या नैसर्गिक भावना योग्य परिस्थितीच्या अभावी सुकून चालल्या होत्या त्याना व्यक्त होण्यासाठीं आतां प्रत्यही संधि मिळू लागल्यानें माझ्या जीवनात मला अधिक पूर्णता प्रतीत होऊ लागली वडील मुलगी बेबी हिच्या शिक्षणाची मी लागलीच योग्य व्यवस्था करून दिली. सवड मिळे त्याप्रमाणे मीही तिला निरनिराळ्या प्रकारच्या मनोरजक ज्ञानवर्धक गोष्टी सागत असे. लवकरच ती मोठी आज्ञाधारक, व सालस असल्याचे मला आढळून आलें

अशा रीतीने ईश्वरी योगायोगानें घरीं आलेल्या या बालिकाच्या सगतींत हळूहळू माझी पूर्वीची दु:खी मनस्थिति अगदी नाहींशी होत आली, आणि पुढेही अशीच परिस्थिति राहिली असती तर आज मी स्वतःला दुःखी समजण्यास फारसा इच्छुक राहिलो नसतो. पण सुमारें सहा वर्षांपूर्वी एक दिवस मजकडे एक विलक्षण पत्र आले आणि त्याने माझ्या स्वस्थ होत चाललेल्या मानससागराला एकाएकी भयकर ढवळून दिले. पत्र अगदीं लहानसेच होतें, आणि त्याच्याखाली कोणाची सही नव्हती. त्यात मजकूर इतकाच होता' 'मा न. वि. वि आपला एकुलता एक पुत्र प्रभाकर हरवून आज बरोबर सोळा वर्षे होत आहेत आपल्यास त्याचा कांहींच तपास लागला नसल्याने आपण त्याच्याविषयीं निराश झाला असाल पण तो खुशाल आहे हे वाचून आपल्यास आनद होईल. तो लवकरच आपल्यास भेटेल क. लो. अ. हे विनंति—आपला एक हितचिंतक.' अगदीं ध्यानींमनींही नसता आलेले हे चमत्कारिक पत्र पाहताच मला अत्यत विस्मय वाटला; आणि प्रथम तें अविश्वसनीय मानण्याकडे माझी प्रवृत्ति होऊ लागली. पण पत्रावर तारीख १२-२-३१ अशी होती, आणि मीं पचांग काढून पाहिले तों प्रभाकर ज्या दिवशीं हरवला होता त्या सोळा वर्षांपूर्वीच्या माघ वद्य १३ म्हणजेच महाशिवरात्रीच्या दिवशीं

हीच तारीख व हाच महिना होता ! पण तरीही मनाला पूर्ण खात्री वाटेना. आणि वाटून फायदा तरी काय होता ? कारण त्या पत्रात माझा पुत्र केव्हा व कोठे भेटेल याचा काहींच खुलासा नव्हता. पत्रावर मुंबईच्या पोस्टाचा शिक्का होता, पण तेवढ्यावरून काय तपास लागणार ? शेवटी मी ईश्वरावर हवाला टाकून स्वस्थपणें काय होते ते पाहण्याचे ठरविले

आणि आश्चर्याची गोष्ट अशी की, दुसरे वर्षीही बरोबर त्याच तारखेचे अगदी तसेंच एक पत्र आले, फक्त त्यात सोळाच्या ऐवजी सतरा वर्षें असे लिहिले होते मग मात्र मला यात काहीं तरी तथ्य वाटू लागलें, आणि यानतर दरवर्षी त्या विशिष्ट दिवशी अत्यत उत्सुकतेनें मी पत्राची वाट पाहू लागलों बरोबर पाच वर्षें याप्रमाणे मजकडे हीं पत्रे येत गेलीं. पहिले आणि शेवटचे पत्र एका हस्ताक्षरात आणि मधलीं तीन निराळ्या हस्ताक्षरात आहे, आणि शेवटच्या चार पत्रात एक लहानसे वाक्य अधिक आहे ते असें: 'मी माझ्या मित्राच्या सागण्यावरून हे आपल्यास लिहीत आहे.'

माधवराव, बरोबर पाच वर्षे नियमितपणें येणारे हें पत्र गेल्या वर्षी फेब्रुवारी महिन्यात मात्र आलें नाहीं. नेहमीप्रमाणे यदाही मी बरोबर त्या तारखेस धडधडत्या हृदयानें पत्राची वाट पहात होतों. पण त्या अज्ञात 'हितचिंतकानें' यदा माझ्यावर कृपा केली नाहीं. त्या दिवसापासून माझ्या मनाला अत्यत हुरहुर लागून राहिली आहे. जोंपावेतों या सबधात मला काहींच माहिती नव्हती तोंपावेतों माझे मन स्वस्थ होते. मी जुन्या आठवणी व सबध जवळजवळ विसरलों होतों. पण या पत्रामुळें माझ्या खुरटलेल्या आशेला कित्येक वर्षांनतर अकुर फुटू लागले. माझा प्रभाकर हल्ली कोठें असेल ? तो आतां चांगलाच मोठा झाला असला पाहिजे. तो कोणत्या परिस्थितींत

आपले दिवस कठीत असेल ? त्याला त्याच्या दुर्दैवी पित्याची आणि मातेची आठवण होत असेल काय ? तो सद्गुणी असेल किंवा कुसंगतीनें बिघडला असेल ? इत्यादि किती तरी प्रश्न गेलीं पाच वर्षें माझ्या मनाला भडावीत आहेत. पण गेल्या फेब्रुवारी महिन्यापासून तर यात एका निराळ्याच भयंकर प्रश्नाची भर पडून फारच अस्वस्थता वाटत आहे. माझ्या प्रभाकराला गेल्या वर्षी काहीं अपाय तर झाला नसेल ना ? त्याचे कुशल मला कोण कळवील ? तो दयाळू ईश्वर माझा आणखी किती अंत पाहणार ? पण ईश्वर करो आणि तसा काहीं प्रकार नसो. कदाचित 'मन चिंती ते वैरी न चिंती' अशातलाच काहीं प्रकार तर माझ्या बाबतींत हल्ली होत नसेल ना ?

या सर्व दुःखदायक परिस्थितींतून मी सुखरूप बाहेर पडेन असा काहीं तरी योग्य प्रयत्न तुम्ही करावा, या हेतूने मी हा इतका सविस्तर व खुलासेवार वृत्तांत तुम्हाला लिहून कळविली आहे. वस्तुतः गेल्या फेब्रुवारीपासूनच तुमचें यात साह्य घ्यावे अशी इच्छा झाली. पण पुनः असेंही वाटे कीं, या वर्षी त्याच्या प्रत्यक्ष भेटीचा संभव असल्यामुळेंच कदाचित तें पत्र आलें नसावें, व म्हणून येत्या फेब्रुवारीपावेतों अशीच वाट पहावी. अशा भवतिनभवतींत पाच सहा महिने निघून गेले. नंतर एक दिवस मी आजारी असता, आता या गोष्टीचा छडा लावलाच पाहिजे असें मनात ठरविलें. पण त्याच सुमारास तुमचें बेबीविषयीं तें चिंताजनक पत्र आल्यानें पुनः थांबलों. पुढें तुमच्या प्रत्यक्ष भेटीच्या अपेक्षेंत काहीं दिवस गेले. शेवटीं गेल्या महिन्याच्या प्रारंभीं मात्र मी यापुढें कोणत्याही कारणानें विलंब न करण्याचा निश्चय केला आणि त्याप्रमाणें आता सर्व हकीगत तुम्हाला सविस्तर कळविली आहे.

मी स्वतः या बाबतींत किंकर्तव्यमूढ झालों असल्यानें कोणत्या

दिशेनें प्रयत्न करावा हेंच मला कळेनासे झालें आहे. तुमच्याबद्दल मला मोठा विश्वास वाटतो. तुम्ही, तुमचे मित्र केशवराव, अशा उत्साही तरुणाच्या संगतींत मला माझ्या दुःखभागाचा विसर पडतो. तुम्ही इकडे लवकरच येणार असल्यास तीं सारीं पत्रें मी येथें तुम्हाला समक्षच दाखवीन. पण तसा विचार नसल्यास मी तीं पत्रें तुमच्याकडे टपालानें पाठवीन. कारण आता अधिक विलंब सहन होत नाहीं.

कळावें, हे आशीर्वाद. चि. सौ बेबीस आशीर्वाद.

आपला,

**गोविंद महादेव ढोळे.**



[३५] **स्त्रीहृदयाचे पृथक्करण.** (श्री. गो दा. कोपरे यांचें वधूस पत्र)

**पार्वतीपूर.** श्री. रविवार ता. २४-१-३७

चि. रा. मनोहरपंत यास अनेक आशीर्वाद वि. वि.

तुमचें पत्र काहीं दिवसापूर्वी आलें तें मिळालें. चि. सुशिलेनें काढलेलें ' सूर्योदयाचें ' चित्रही मिळालें. ते पाहून फार आनंद झाला. हळूहळू तिची चित्रकलेंत चांगली प्रगति होत आहे असें दिसतें.

चि. मालतीचा विवाह यंदा करण्याचा विचार असून सध्या आम्ही तनमनधनेंकरून त्याच खटपटींत लागलों आहे ! पण हें काम मला पूर्वी वाटत होतें त्यापेक्षा बरेंच कठीण व अवघड आहे असें मला अलीकडे आढळून येऊं लागलें आहे. शिक्षण मिळालेल्या, व विशेषतः पदवीधर, मुलींचा विवाह जमविणे इतर मुलींचा विवाह जमविण्यापेक्षा सुलभ असावें अशी माझी समजूत होती. पण अलीकडे आलेल्या अनुभवानें हें माझें मत झपाट्यानें पालटत आहे. गृहजीवनाशीं फारसा संबंध नसणाऱ्या शिक्षणामुळें मुलीच्या मनांत शिरलेल्या काहीं विपर्यस्त समजुती; तिच्या वाढत्या आकांक्षा; भावी पतीविषयीं

तिच्या स्वतःच्या काहीं कल्पना, त्या कल्पनाना अनुसरून असलेले थोडेसे वर, त्या वराना स्वत.च्या शिक्षणाच्या व सामाजिक दर्जाच्या मानाने अधिकाधिक हाव सुटून श्वशुरकन्यका व श्वशुरसपत्ती या दोघींशी एकदमच विवाह करण्याची त्याना होणारी इच्छा, इत्यादि अनेक गोष्टींमुळे मालतीसारख्या पदवीधर वधूच्या विवाहाचा प्रश्न निदान आपल्या हल्लीच्या समाजात तरी फार विकट होऊन बसला आहे. यामुळेच कित्येक पदवीधर मुलीना शेवटी नाइलाजाने परजातीय, परधर्मीय, सपत्नीक, विधुर, वयस्क, अशासारख्या वराच्या हातात हात देणे भाग पडल्याची कटु दृश्ये निदर्शनास येऊ लागलीं आहेत ! आणि अखेरीस अशा विवाहाचे परिणाम पुष्कळ वेळा ' जन्मठेपेंत ' किंवा घटस्फोटात होत आहेत !

माझा स्वत चाच अनुभव पहाना ! काहीं दिवसापूर्वी मी नाशिकचे सेवानिवृत्त डिस्ट्रिक्ट जज रा. सदाशिवराव केसकर यांच्या चिरजीवाबद्दल खटपट केली होती. तुम्हालाही या सबधात मी मागे कळविलेच होते. मुलगा फार हुशार असून नुकताच उत्कृष्ट प्रकारे एम् एस्सी. उत्तीर्ण झाला आहे, आणि लवकरच आय्. सी. एस्.साठीं विलायतेस जाण्याच्या विचारात आहे. मालतीचा आणि त्याचा कॉलेजमध्ये थोडासा परिचयही झाला होता, आणि विद्यार्थीदशेंतील त्याच्या एकदर वागणुकीवरून तो उदार मताचा असावा असे दिसलें. साहजिकच मला या स्थळाबद्दल फार इच्छा होती; मालतीलाही होती. म्हणून बरेच पैसे खर्च करून तो, त्याचे मित्र आणि आईबाप यांना मुद्दाम येथे बोलाविलें. दोन तीन दिवस त्यानीं येथें पाहुणचारही घेतला. मालतीसारखी अव्यग, सुशिक्षित व सालस वधू त्याला वस्तुतः सर्वस्वी योग्य होती. पण त्याचा इंग्लंडचा सारा खर्चही वधूनें आपल्याबरोबरच आणावा असली

भलतीच अट त्याच्या पित्यानें घातल्यानें नाइलाज झाला ! दुसरा एक मुलगा नुक्ताच डॉक्टरी पास झाला असून वडिलोपार्जित घर, शेती, इत्यादि देखील आहे. त्याच्यासबंधीं विचारपूस करतां, डॉक्टरीचा धंदा उत्तमरीतीनें चालू लागे पावेतों आणखी तीन चार वर्षें तरी बायकोचे लोढणें गळ्यात अडकविण्यास तो तयार नाहीं असे कळलें !

मालतीच्या विवाहाचा विचार करिताना एक महत्वाची गोष्ट अशी आढळून आली कीं, सुशिक्षित स्त्रीला आपला पति स्वतःपेक्षां कमी तर नव्हेच पण स्वतःइतकेच शिकलेलाही साधारणतः नको असतो मौज अशी आहे कीं, आपल्या भरतखंडातील स्त्री स्वतः कितीही शिकलेली असली तरी आपला पति आपल्यापेक्षा थोडा कां होईना पण श्रेष्ठ असावा अशीही एक इच्छा तिच्या मनात वसत असते असें मला तरी वाटतें. आपल्या विशिष्ट संस्कृतीचा, चालीरीतींचा, राहण्याच्या पद्धतीचा, बालपणापासून मुलीच्या मनावर ठसणाऱ्या धर्मभावनांचा, सामाजिक वातावरणाचा, किंबहुना वाङ्मयाचाही एक परिणाम असा घडून येतो की, स्त्रीला—निदान तरुण सौभाग्यकांक्षिणी मुलीला—पतीच्या स्थानीं आदरणीय व्यक्ति हवी असते. जो पति स्वतःबद्दल पत्नीच्या मनात आदरबुद्धि उत्पन्न करू शकणार नाहीं त्याच्यावर तिचें मनापासून प्रेम कितपत् राहील याची मला शंका वाटते. अगदीं समान किंवा कनिष्ठ दर्जाच्या व्यक्तीवर ती बंधू म्हणून मनोभावें प्रेम करील, पुत्र या नात्यानें संगोपन करून वात्सल्याचा मधुर वर्षाव करील; पिता म्हणून मान देऊन प्रसंगीं त्याच्यासाठीं जिवापाड श्रमही करील, मित्र म्हणून वागण्यासही एक वेळ ती तयार होईल, पण पती म्हटला कीं स्वतःपेक्षा थोडा तरी तो श्रेष्ठ असला पाहिजे !

आणि आपल्या पतीच्या श्रेष्ठत्वाबद्दलची युवतींची ही अपेक्षा मानसशास्त्रदृष्ट्याही समर्थनीय दाखविता येईल असें वाटतें. संसारातल्या लहानमोठ्या प्रत्येक बाबतींत पतीनें जर हटवादीपणा चालवून पत्नीच्या इच्छाविरुद्ध तिला प्रत्यही वागविण्यास प्रारंभ केला तर तिला—ती शिक्षित असली तर विशेषच—तें जिणें अपमानास्पद वाटेल हे खरे. पण याउलट जर पती सर्वस्वी सर्वच बाबींत स्वतःची स्वतंत्र इच्छा मारून तिच्याच ओंजळीने पाणी पिऊ लागला तर ते देखील भारतीय महिलेला आवडणार नाहीं यात संशय नाहीं. पतीने कांहीं कांहीं प्रसंगीं आपल्या कलाप्रमाणे वागावे, आपल्या ' अंकित ' असावे, असे तिला वाटते खरे, पण ते खरोखर सुखप्रद केव्हा होईल? पतीची स्वतःची स्वतंत्र वेगळी इच्छा असूनही केवळ तिच्या प्रेमाखातर तो आपल्या इच्छेवर पाणी सोडण्यास तयार असेल तर. माहेरीं जाण्यासाठीं एकवार नकार मिळाला असताही, डोळयांतल्या जलास्त्राचा प्रयोग करून प्रेमाच्या जोरावर मिनतवारीनें शेवटीं परवानगी मिळविल्यानंतर पित्याकडे गेलेली पण तेथूनही पतीच्या खाण्यापिण्याची आस्थेनें वारवार चौकशी करणारी प्रेमळ तरुणी पहा, आणि एखाद्या मेषपात्र पतीची समानहक्कवादी ' स्वतंत्र ' पत्नी स्वतःच्या जाण्याचा निश्चय सहज शिरस्त्यासाठीं त्याच्या कानावर घालून माहेरीं आलेली असतांना पहा, म्हणजे या दोघींत कोणाचें जीवन खरोखर अधिक सुखी आहे ते कळून येईल. सर्वसाधारण स्त्रीहृदयाला एखाद्या आदरणीय पुरुषाच्या छत्राखालीं राहून त्याच्या कलानें वागण्यात, आणि प्रसंगविशेषीं त्याला आपल्या कलाप्रमाणें वागावयास लावण्यात आनंद वाटतो, उलट, पुरुषाला पत्नीच्या बाबतींत प्रत्यही स्वतःची स्वतंत्र प्रज्ञा चालविण्याची व प्रसंगविशेषीं तिच्या कलानें चालण्याची, इच्छा असते. आणि केवळ विश्वविद्यालयीन शिक्षणानें स्त्रीपुरुषांच्या

ह्या मूलभूत स्वभावभेदात बदल होतोसें दिसत नाहीं. आज किती मॅट्रिक झालेल्या मुली फक्त मॅट्रिकपावेतोंच शिकलेल्या वराशीं विवाह करतात? बी ए च्या पदवीनें विभूषित झालेल्या किती तरुणी तितक्याच शैक्षणिक योग्यतेच्या तरुणाच्या जीवनौघात आपले जीवन समरस करण्यास उत्सुक असतात? आणि अगदीं समान शिक्षिताचे कितीसे विवाह खरोखर अखेरपर्यंत सुखानें रसरसलेले राहतात?

हे सर्व सविस्तर लिहिण्याचा उद्देश हा कीं, इतर पदवीधर कुमारिकाप्रमाणे मालतीचीही पतीच्या संबधात जी कल्पना आहे तिच्यात मलाही काहीं अयोग्य दिसत नाही. आणि याच दृष्टीनें तुम्हीही प्रयत्न करावा अशी माझी इच्छा आहे. कळावे, हे आशीर्वाद

तुमचा बंधू,

**नाना कोपरे.**



## [३६] प्रकरण भलत्या थराला चालले !

लखनौ श्री. शुक्रवार ता. ५–२–३७

ती. रा नानास मनोहरचा साष्टांग नमस्कार वि. वि.

आपले पत्र पोचले. त्यात व्यक्त केलेल्या विचारसरणीस अनुसरून मालतीसाठीं योग्य स्थळाचा तपास करून पाहतो.

आज हे पत्र लिहिण्याचे विशेष कारण म्हणजे या प्रांतात प्रसिद्ध होणाऱ्या ‘ कलासक्ति ’ मासिकाचा ताजा अंक नुकताच माझे पहाण्यात आला. तिकडे हे मासिक येतें किंवा नाहीं माहित नाहीं. या अंकात अगदी मुखपृष्ठावरच ‘ मीलनोत्सुका ’ म्हणून एक चित्र प्रसिद्ध झाले आहे. चित्राखालींच चित्रकाराचें ‘शरच्चंद्र भट्टाचार्य’ असें नाव दिलें आहे. चित्राकडे पाहताच ते रा. दप्तरे याची मुलगी

नंदिनी हिचे आहे हे तेव्हाच ओळखूं येते. चित्रात ती ज्या प्रकारे दाखविली आहे त्याबद्दल विशेष न लिहिलेले बरें !

हा अंक मी मुद्दाम यासोबत पाठवीत आहे. रा. दत्तरे हे आपले स्नेही असल्यानें त्याच्या कन्येच्या येथील वर्तनाची माहिती त्याना नसल्यास ती कळवून वेळींच सावध करावे या हेतूनें आपल्यास हें पत्र लिहीत आहे. मी स्वतः रा. दत्तरे याना या संबंधानं लिहिणार होतो, पण विचारार्तीं तसें करण्यापेक्षा आपल्याला कळविणेंच अधिक इष्ट वाटलें. कारण रा. दत्तरे याना सर्व माहिती असून त्याच्या संमतीनेंच हे असले चाळे चालू असल्यास आपल्या अनाहूत मध्यस्थीचा परिणाम उलटा व्हावयाचा ! म्हणून आपण रा. दत्तरे याच्याशीं समक्ष बोलण्यात युक्तीनें आवश्यक दिसेल त्याप्रमाणे ही माहिती त्याचे कानावर घालावी; म्हणजे त्याची इच्छा असल्यास प्रकरण अगदींच भलत्या थराला जाण्यापूर्वींच ते त्याला आळा घालू शकतील.

या चित्रासंबंधीं एक विशेष उल्लेखनीय गोष्ट त्याच्याखालीं दिलेल्या टीपेंतल्या मजकुरावरून आपल्या ध्यानीं येईलच. ती ही कीं, हें चित्र चित्रकाराने केवळ कल्पनेनें काढलेले नसून चित्रित व्यक्ति अशा स्थितींत समोर बसली असता ते रेखाटलेले आहे.

रा. दत्तरे याचें 'कला आणि नीति' या विषयावरील एक विपर्यस्त व्याख्यान 'प्रभाकरा'तून मागें वाचलें होते. त्यात व्यक्त केलेल्या विचारसरणीचीं हीं कटुफळे पाहून विषाद वाटतो.

कळावें, हे विज्ञापना.

आपला बंधू,

**मनोहर कोपरे.**



## [३७] ‘ उद्यांच्या संसारांत ’ भागीदारीण होशील काय ?

( मूळ इंग्रजी पत्राचें मराठी भाषांतर )

लखनौ, १३-२-१९३७

कुमारी सुशिला कोपरे,

आमच्या कॉलेजातील तरुण–महाराष्ट्र–सभेकडून, येत्या संमेलन-प्रसंगीं, सुप्रसिद्ध मराठी लेखक प्र. के. अत्रे यांचे ‘ उद्याचा संसार ’ हे नाटक करून दाखविले जाणार आहे, हे तुम्हाला माझी बहीण नंदिनी हिच्याकडून माहीत झालेंच आहे. या नाटकात तुम्हीही एखाद्या पात्राचे काम करून आमच्याशीं सहकार्य करावे अशी मी, त. म. सभेतर्फे, विनंति करितो. मराठी वाङ्मय व येथील मराठी विद्यार्थीवर्ग या दोहोंचेंही हित साधणारी ही संधि पाहून तुम्हाला आनंदच होईल असा मला विश्वास वाटतो. शिवाय खर्चवेंच वजा जाता उरणारे या नाटकाचे उत्पन्न गरीब विद्यार्थ्यांच्या मदतीसाठीं खर्च केलें जाणार आहे.

नंदिनीचे या संबधात तुमच्याशीं बोलणे झालेंच आहे. तरी आता हे पत्र घेऊन येणाऱ्या मनुष्याबरोबर तुम्ही आपली नक्की संमति कळविण्याची कृपा केली तर या नाटकात तुम्ही कोणत्या पात्राचें काम करावयाचें ते लवकर तुमच्या सल्याने ठरवून टाकू.

तकलिफीची माफी असावी.      तुमचा

सुरेश दप्तरे.

सेक्रेटरी, नाट्यसमिती, त. म. सभा.

ता. क. मी स्वतः ‘ शेखर ’ चे काम करणार असून नंदिनी ‘ शैला ’चें काम करणार आहे. तुम्ही ‘ नयना ’चें काम करावें अशी आमची इच्छा आहे.      सु. द.



## [३८] मला मान खाली घालावी लागेल.

पार्वतीपूर श्री. सोमवार, ता. १५–२–३७

चि. कु. नंदिनीस आशीर्वाद.

पत्र लिहिण्यास कारण कीं माझे मित्र रा. कोपरे यांचे घरीं ‘ कलासक्ति ’ मासिकाचा ताजा अंक पाहण्यात आला. त्यात रा. शरच्चंद्र भट्टाचार्य यानें काढलेले एक चित्र प्रकाशित झालें आहे तें पाहिलें, त्याच्या खालील टीपही वाचली. नंदिनी, तुझी मजल येथवर जाईल अशी मला कल्पना आली नव्हती. फार लिहवत नाहीं आणि लिहिण्याची आवश्यकताही नाहीं. तूं आतां ताबडतोब इकडे निघून यावें. तुझ्या पुढच्या शिक्षणाची व्यवस्था येथेच कॉलेजमध्ये किंवा खासगी रीत्या करिता येईल, असे नीट विचार केल्यानंतर मी ठरविलें आहे. अद्याप येथे फारशा लोकांच्या कानावर तुझे हे चाळे गेले नसले तरी त्यांना लवकर पायबंद न बसल्यास त्याची वार्ता पसरण्यास विलंब लागणार नाहीं. आणि मग तुझ्या शिक्षणाचा कैवार घेतल्या-बद्दल मला मान खालीं घालण्याशिवाय मार्ग उरणार नाहीं. कळावें, पत्र पोचताच निघून यावें.

तुझा पिता,

व्ही. एस्. दप्तरे



## [३९] विद्यार्थीजीवन आणि नाटकप्रयोग.

लखनौ. श्री. मंगळवार ता. १६–२–३७

चि. रा. सुरेश दप्तरे यास अनेक आशीर्वाद.

सुशिलेच्या नांवाची तुमची आलेली ता. १३ ची चिठ्ठी पोचली. त्यावेळेस मी घरीं नसल्यानें तेव्हांच उत्तर पाठवितां आलें नाहीं.

तुम्ही केलेल्या सूचनेसंबंधात मी सुशिलेला परवानगी देऊं शकत नाहीं, आणि तिचीही इच्छा नाहीं, याबद्दल खेद वाटतो.

शाळा कॉलेजांतील विद्यार्थीवर्गानें नाटकप्रयोग करण्याची कल्पना मला कधींच विशेष आवडली नाहीं. त्यातही असे प्रयोग करावयाचेच झाले तर अशीं नाटकें उत्तानशृंगाररसप्रधान वाक्यापासून आणि प्रसंगांपासून कटाक्षानें अलिप्त असावीत असें माझें मत आहे.

शिवाय ज्यात मिश्र पात्रे आहेत अशीं नाटकें, काहीं थोडे अपवाद वगळल्यास, विद्यालयीन विद्यार्थ्यांनीं करूं नयेत असेंही मला वाटते. कारण, त्याचे प्रयोग एकतर मुलामुलींच्या सहकार्याने करावे लागतील; किंवा त्यात मुलांना स्त्रियाचीं (अगर मुलींना पुरुषाचीं) कामें करावीं लागतील.

पण हे उभय प्रकार मला वर्तमानकाळातील परिस्थिति पाहतां एकदरींत अनिष्टच वाटतात विशेषतः विद्यार्थीजीवनासारख्या पवित्र कालात मुलाने स्त्रीवेष (अगर मुलींने पुरुषवेष) परिधान करून सार्वजनिक रीत्या तसें वर्तन करण्याचाही प्रयत्न करावा, आणि ते नीट साधण्यासाठीं आपल्या अमूल्य आयुष्यातील दिवसचे दिवस खर्ची घालावे, हे निर्विकार दृष्टीनें विचार करतां कोणालाही निषेधार्हच वाटेल. पूर्वकाळचीं सर्वच कडक बंधने आजच्या बदललेल्या परिस्थितींत विद्यार्थ्यांवर लादणे योग्य नसलें, तरी कोणाही मुलाने शिक्षण चालू असता, निसर्गाच्या विरुद्ध जाऊन, नानातऱ्हेचे बायकी (अगर पुरुषी) शृंगारिक चाळे व हावभाव करून लोकानुरंजन करण्याचा प्रयत्न करावा, आणि त्यांत अभिमान मानावा हें, निदान मला तरी, विद्यार्थीजीवनाच्या पावित्र्याला विघातक, व त्या मुलाच्या व्यक्तिमत्वाला बाधक वाटते.

आणि सुशिलेने या नाटकात काम करावें या सूचनेला अमान्यता देऊनच केवळ न थांबता, एक पाऊल आणखी पुढे जाऊन, मी तुमच्या वडिलांचा एक मित्र या नात्याने तुम्हालाही या कार्यापासून परावृत्त करूं इच्छितो. शिवाय तुमची परीक्षाही आतां जवळ येत आहे.

शेवटीं एकच गोष्ट आणखी राहिली. जे कार्य जात्याच वाईट आहे त्याचा केवळ दानधर्माशीं संबंध जोडल्यानें तें इष्ट ठरू शकत नाहीं.

कळावें, हे आशीर्वाद. आपला,

म. दा. कोपरे.

---

[४०] मुलीचा बापास उपदेश !

लखनौ श्री. शनिवार ता. २०—२—३७

ती. रा. बाबास नंदिनीचा नमस्कार वि. वि.

तुमचें ता. १५ चे पत्र आले ते वाचून फार सखेदाश्चर्य वाटले. माझ्याविषयीं तुमचा कोणी तरी बराच गैरसमज करून दिला आहे असें दिसते. 'कलासक्ति' मासिकात प्रकाशित झालेल्या शरच्चंद्राच्या चित्राशीं माझा प्रत्यक्ष संबंध आहे हे खरे आहे. पण, बाबा, मला फार आश्चर्य वाटते ते या गोष्टीचें कीं, एखादी सुंदर कलाकृति 'पहात असता वासनांची बरीवाईट हालचाल झाली तर तो त्या कलावस्तूचा गुण नसून तो प्रेक्षकाच्या विकृत दृष्टीचा परिणाम होय...बोध, नीति, अनीति या साऱ्या गोष्टी मूळ कलाकृतींतल्या नसून तिच्याकडे मनुष्य ज्या दृष्टीनें पाहील त्या दृष्टीवर अवलंबून आहेत' या प्रो. ना. सी. फडके यांच्या 'प्रतिभा-साधनात' त्या महनीय उद्गारांचा तुम्हीच नाहीं का या पूर्वी किती तरी वेळा गौरवाने उल्लेख केला ? कोणतेही चित्र चांगलें अगर वाईट समजणे हे त्याच्याकडे पाहणाऱ्याच्या दृष्टीवरच सर्वस्वी अवलंबून असते असें शरच्चंद्र देखील नेहमी म्हणतो ते कांहीं खोटें नव्हे. हेंच चित्र कोणी जातिवंत कलावंतानें पाहिलें तर त्यांत त्याला कांहींच वावगे दिसणार नाहीं, उलट त्याची मार्मिक कलात्मक दृष्टि त्या चित्राची शुद्ध कलेच्या दृष्टीनें छाननी करण्यांत गुंग होऊन, भावनांच्या उत्कटत्वाचे दिग्दर्शन, शरीराचें प्रमाणबद्ध

सौष्ठव, रंगाचे योग्य मिश्रण, प्रसंगास अनुसरुन वस्त्रादि परिस्थितीची अवस्था, प्रकाश व अंधार यांच्या निरनिराळ्या छटांचे अनुरूप चित्रण, इत्यादि गोष्टी कितपत साधल्या आहेत याचा विचार करण्यात तो मग्न होईल. आता इतरेजनांना ते शक्य नसल्याने त्यांना त्या चित्रात अश्लीलता किंवा बीभत्सपणा दिसावा यात काय नवल ! पण म्हणून खऱ्या कलाकाराने व कलाप्रेमी व्यक्तींनी त्याची कां बरे क्षिती बाळगावी ! कला म्हटली की तिला कोणताही प्रसंग वावगा नाहीं. प्रत्येक प्रकारच्या परिस्थितींतून सौंदर्यानंदाचा मधु लुटणारी ती एक आदर्श मक्षिका आहे, हे काहीं मींच तुम्हाला सांगावयास पाहिजे असे नाहीं. कलेवर रूढ नीतिकल्पनांची बंधनें नसावीत असे तुम्हींच नव्हते का काही दिवसापूर्वी म्हटले ?

एखादी कलाकृति तयार झाल्यानंतर तिचे अवलोकन करणाऱ्याच्या दृष्टीचा हा विचार झाला. आतां ती कृति प्रत्यक्ष तयार होत असताना तिच्या निर्मात्याच्या मनःस्थितीचा विचार करणेंही अनाठायीं होणार नाहीं.कारण याच बाबतींत तुमचा मुख्यत्वेकरून गैरसमज झाला आहे असें वाटते.बाबा,इतरांचे मला माहीत नाहीं, पण मी किंवा शरच्चंद्र, आम्ही चित्रे काढण्यास बसतो तेव्हां आम्ही त्यात इतके गुंग होऊन जातो कीं, आमच्या मनात दुसरा तिसरा विचार यायला अवकाशच रहात नाहीं ! हे चित्र काढले तेव्हांचीच गोष्ट सांगते कित्येक तास कसे निघून गेले ते कळले सुद्धा नाहीं आम्हाला ! तो तर इतका मग्न झाला होता आपल्या कामात कीं, शेवटीं शेवटीं दादा हळूच येऊन त्याच्याजवळ उभा राहिला तरी पुष्कळ वेळ त्याची समाधि उतरलीच नाहीं. माझ्याकडे पाहणे, चित्र काढणें, आणि मधून मधून मला माझ्या पोझबद्दल सूचना करणें, यांशिवाय त्याला तितक्या वेळापुरती कशाचीही शुद्ध असेल असे मला तरी वाटत नव्हते. त्याच्या कला-

नैपुण्याकडे आणि तल्लीनतेकडे कौतुकाने पाहण्यात मला देखील साऱ्या विश्वाची विस्मृति पडली होती.

तुम्ही आमच्या कलोपासनेकडे विकृत दृष्टीनें पाहून आपला भलताच समज करून घेतला आहे याबद्दल मला फार खेद होतो. इतरानी अशा प्रकारचे काहूर माजविले तर गोष्ट निराळी. पण निदान तुमच्याकडून असे कधीं होणार नाही अशी आमची अपेक्षा होती. येथील एकदर परिस्थितींत आणि वातावरणात माझी चित्रकलेत इतकी झपाट्याने प्रगति होत आहे की, हे सारे असेच अर्धवट सोडून तिकडे निघून येण्याचे मनच होत नाही. आणखी हे खुलासेवार पत्र वाचल्यानंतर तुम्हीही तसा आग्रह धरणार नाहीं असा मला विश्वास वाटतो

तुमची कन्या,

नंदिनी.



## [४१] पत्नी देखील व्यक्ति आहे.

माधव मुद्रे याच्या खासगी वहीतला उतारा.

सोमवार, माघ शु. १२ शके १८५८

फार वाईट वाटत आहे आज सकाळीं ती वार्ता ऐकली तेंव्हापासून ! असे वाटावयास लागते कीं, एकवेळ राष्ट्राराष्ट्रातील विरोध या अवनीतलावरून नाहींसे होतील; पण एकाच कुटुंबात राहणाऱ्या दोन व्यक्ती—सासू आणि सून—यांमधील विरोध कधीतरी नाहींसे होतील का ? एकीकडे पहावे तो, पलीकडे राहणारा विनायक नाकेदार, मॅट्रिकपावेतो शिकलेला, पचवीस-तीस रुपये महिना कमावणारा, खुशाल आपल्या पत्नीच्या खुशामतींत आणि सुखविलासात निमग्न राहून गरीब बिचाऱ्या, वृद्ध, रोगांनीं जर्जर केलेल्या, स्वतःच्या आईकडे अक्षम्य दुर्लक्ष करीत आहे ! दुसरीकडे पहावे तो, शेजारचे

गोपाळराव आणि त्याची आई बिचाऱ्या इंदिराबाईंच्या व्यक्तित्वाला प्रत्यही खच्ची करण्याचा प्रयत्न करीत आहेत!

गोपाळरावाच्या बाह्य वर्तनावरून स्वतःच्या पत्नीविषयीं त्याची इतकी अनुदारवृत्ति असेल असें कोणाला तरी वाटेल का? तसे पाहिले तर इंदिराबाईंचा आणि आमचा दूरचाच संबंध. माझी मामे-बहीण मालती कोपरे ती याची मावसबहीण. म्हणून मला जर त्याच्याविषयीं काहीं वाटत असेल तर ते आपल्या निकटच्या नात्यांतली एक स्त्री म्हणून नव्हे तर एक सर्वसामान्य भारतीय विवाहित स्त्री म्हणूनच.

आपल्या हाताखालील कारकुनाने कधीं फाउंटनपेन वापरू नये, फक्त शाई टाक व शिसपेनच वापरावी, असा एखाद्या अरेरावी अधिकाऱ्याने आग्रह धरला, आणि तसे न करणाऱ्याला शिक्षा करण्याचा उपक्रम सुरू केला, तर ते विक्षिप्तपणाचे नाहीं का होणार? मला खात्री वाटते कीं, उद्या स्वतः गोपाळरावाच्या अधिकाऱ्यानेंच तसा जुलूम सुरू केला तर तेच ओरड करूं लागतील. पण त्याच गोपाळरावांनीं घरांत पत्नीवर अशाच प्रकारचा जुलूम करावा हें आश्चर्य नव्हे का? त्याच्या पत्नीनें पोलके न घालता चोळीच घालावी असा त्याच्या सासूने आग्रह धरावा, आणि मातृभक्तीच्या गोंडस नावाखालीं गोपाळरावांनीं तो उचलून धरावा, हे काय शहाणपणाचें लक्षण आहे? बरें, सासूला आवडत नाहीं म्हणून तिच्यासमोर इंदिराबाई कधीं पोलकें वापरीत नाहींत असे ऐकतो. परंतु पर्वा कोठें बाहेर समवयस्क स्त्रियांचे समारंभांत जाण्याचा प्रसंग आला असता, बिचारीनें माहेरून करून आणलेलें पोलकें एक दिवस घालण्याचें महान पाप केलें म्हणून तिजवर प्रथम तिच्या प्रेमळ सासूने व नंतर मातृनिष्ठ पतीनें खूप गहजब केला, आणि नानातऱ्हेच्या

कटुवाक्यांनीं तिचें हृदय विदीर्ण केले, हे कानावर आल्यापासून मनाला बरे वाटत नाहीं !

मला राहून राहून आश्चर्य वाटते ते हे. जिच्यांत तात्विक दृष्ट्या कांहीं आक्षेपार्ह नाहीं अशी एखादी गोष्ट आपल्या देखरेखीखालीं असलेल्या व्यक्तीला आवडत असली, तरी केवळ स्वतःची अरेरावी इच्छा गाजविण्याच्या आसुरी महत्वाकांक्षेने प्रेरित होऊन ती गोष्ट करण्याची त्या व्यक्तीला मनाई करणे, ही काय माणुसकी म्हणावयाची ? ज्याना इंग्रजी भाषेत ' इनोसट् प्लेझर्स् ' असे म्हणता येईल त्याचा अनुभव घेण्याच्या बाबतीत कुटुंबातील व्यक्तींना स्वतंत्रता का असू नये ? छचोरपणाचा अगर नटवेपणाचा पोशाख कोणी करू म्हटल्यास त्याला पालकांनीं हरकत घेऊ नये असे नाहीं. पण मुलाला जांभळ्या रंगाचा कोट आवडत असता, तू पांढऱ्याच रंगाचें कापड वापर असा एखाद्या पित्याने विनाकारण आग्रह धरणे जसे चुकीचे होईल, तसेच सुनेची पोलके वापरण्याची किंवा अंबाड्याच्या ऐवजी वेणी घालण्याची इच्छा जबरदस्तीनें दाबू पाहणाऱ्या सासूचे कृत्यही चूक होईल, यांत संशय नाहीं. कित्येक प्रसंगीं बेछूट छचोरपणा आणि स्वतंत्र कुलीनपणा यांतला भेद फार सूक्ष्म होतो हे खरे, पण म्हणून तो जेथे स्पष्ट असेल तेथेही तो मान्य करू नये असे कसे म्हणता येईल ? न्याय आणि अन्याय यांच्या सरहद्दी तरी नेहमींच कोठें सुस्पष्ट रीतीने भिन्न असतात ? पण म्हणून कोणी न्यायदान बंद करू म्हणेल तर ते सूज्ञपणाचे होणार नाहीं. कित्येक प्रसंगीं स्वतंत्रतेचा दुरुपयोग केला जातो खरा, प्रत्येक गुन्हेगार अशा दुरुपयोगाचे प्रत्यक्ष उदाहरणच आहे, पण यावरून स्वतंत्रतेच्या इष्टतेला कांहीं बाधा येते काय ? इतकेंच की, घरांतल्या व्यक्तींना योग्य स्वातंत्र्य असले तरी वडिलांची देखरेख असली म्हणजे झालें; मात्र ती देखरेख प्रेमाची पाहिजे, जुलुमाची नको.

बिचाऱ्या इंदिराबाईंच्या शिक्षणाचा आज काय उपयोग ? मला आठवते कीं, त्या पार्वतीपूर येथे शिकत होत्या त्यावेळेस वर्गात त्याचा क्रम पहिला असे. इंग्रजी शिक्षणही बरे झाले आहे त्यांचें. मालतीला किती अभिमान वाटतो त्यांच्या हुशारीबद्दल ! आज त्या हुशारीचे मातीमोल होत आहे योग्य क्षेत्र मिळाले असते तर हीच हुशारी समाजसेवेला किती उत्कृष्ट प्रकारे कारणीभूत होऊ शकली असती ! गोपाळराव स्वतः इतकी वृत्तपत्रे वाचतात आणि प्रचलित राजकारणातील भिन्न भिन्न प्रवाहावर आवेशाने चर्चा करतात, पण स्वतःच्या पत्नीला आठवड्यातून एकदा तरी वृत्तपत्र वाचण्याची संधि मिळते किंवा नाही याकडे त्यांनीं कधी लक्ष देण्याचे कष्ट घेतले आहेत काय ? आमच्या येथे कधी महिना दोन महिन्यातून एखादे प्रसगीं कामानिमित्त आल्यास किती उत्सुकतेने वाचून टाकतात सारा 'केसरी' त्या !

इंदिराबाईंच्या जीवनाचा विचार मनात आला म्हणजे वाटतें कीं, परवा मानसशास्त्रावरील त्या आंग्ल पुस्तकातील गृहिणीमनोभूमिकेचे उत्कृष्ट विवेचन वाचले, ते घ्यावे आणि गोपाळरावांना नेऊन दाखवावे. किती ततोतत लागू पडतात त्यातले कांहीं उद्गार गोपाळरावाच्या बाबतींत ! पण तेच पुस्तक कशाला हवे ? निर्विकार बुद्धीनें कोणीही विचार करील, तर त्याला पतीने पत्नीच्या व्यक्तित्वाबद्दल योग्य आदर बाळगण्याची आणि त्या व्यक्तित्वाचा योग्य विकास होईल अशी खटपट करीत राहण्याची आवश्यकता सहज पटेल. ज्या स्त्रीच्या योग्य नैसर्गिक प्रवृत्ति आणि स्वाभाविक आवडीनिवडी जबरदस्तीनें प्रत्यही दाबल्या जात आहेत, जिच्या स्वतंत्र इच्छाशक्तीला पुरेसा वाव नाकारण्यात येत आहे, दैनंदिन जीवनक्रमाच्या ठरीव चाकोरींतून ताग्याच्या घोड्याप्रमाणे जातांजातां जिच्या विचारशक्तीचें तेज नष्ट होत चालले आहे, स्वतःच्या मनात

साहजिक उसळणाऱ्या नानाविध न्याय्य आकांक्षांना पूर्ण करणे, आणि कधीं कधीं तर व्यक्त करणे देखील शक्य नसल्यानें जिच्या मनोव्यापारावर एक प्रकारचा उदासीन नैराश्यवाद पसरत आहे; सभोवतालच्या व्यक्ति स्वतःच्या इच्छा सफळ करण्याचा प्रयत्न करीत असता स्वतःला मात्र तसे करण्याची संधि मिळत नाही, हे परस्पर-विरोधी दृश्य वारवार मनात बिंबून जिच्या अंतःकरणांत कुटुंबा-विषयीं, समाजाविषयीं, एक प्रकारच्या सुप्त मत्सराच्या, तिरस्काराच्या, सूडाच्या भावना धुमसत आहेत, जिच्या व्यक्तित्वाचा इष्ट विकास योग्य क्षेत्राच्या, सहानुभूतिपूर्ण, वातावरणाच्या अभावीं बंद पडला आहे, ती अभागी स्त्री आपली कुटुंबातली, समाजातली, किंवा राष्ट्रातली भूमिका काय पार पाडू शकणार? घरातली व्यवस्थापक गृहिणी, पतीची प्रेमळ पत्नी, अपत्याची वत्सल माता, वृद्ध सासूसासऱ्याची आधारभूत सून, समाजाची खरी सेविका, राष्ट्राची उद्धारकर्ती, यापैकीं कोणत्याही दृष्टीने तिजवर येऊन पडणारें कर्तव्य ती कितपत योग्य प्रकारे पाळू शकेल?

पण हे सारे विचार शेवटीं माझे मजपाशींच राहणार ना! आज या विचारमालिकेचा उपयोग इंदिराबाईंचे किंवा त्यांच्या-सारख्याच परिस्थितींतल्या इतर महिलांचें जीवन सुधारण्याकडे कितपत होऊ शकेल? प्रत्यक्ष डोळ्यासमोर घडणारा धडधडीत अन्याय देखील दूर करण्यास मनुष्य कधींकधीं कसा असमर्थ असतो! इंदिराबाईंच्या जीवनाकडे पाहिलें म्हणजे ‘ दात आहेत तिथें चणे नाहींत, आणि चणे आहेत तिथे दात नाहींत ’ या म्हणीची सत्यता पटून, हार्डीनें आपल्या कादंबऱ्यांत निसर्गाच्या विषम रचनेविरुद्ध काढलेले जळजळीत उद्गार कांहींसे पटूं लागतात...

२२—२—३७



## [४२] विषवृक्षाचीं कटुफळें.

तार ( मराठी भाषांतर )

पार्वतीपूर. २३–२–३७

म. दा. कोपरे, मॉडेल हाउसेस, लखनौ, यास—

सुरेशाने दोनशे रुपयासाठीं तार केला आहे, तरी कृपा करून काय भानगड आहे ती चौकशी करून कळवावी. —दप्तरे.

---

## [४३] हीच ती पूर्वीची मालती !

पार्वतीपूर श्री. गुरुवार, ता. २५–२–३७

चि. रा. मनोहरपंत यास अनेक आशीर्वाद वि वि.

मागील पत्रांत मी तुम्हाला मालतीच्या विवाहासंबंधी कांहीं विचार कळवून त्या अनुरोधाने खटपट करण्यासाठीं लिहिले होते. त्या गोष्टीस आता कांहीं दिवस लोटले आहेत. तुमच्या ता. ५ च्या पत्रातही तुम्ही खटपट करतो असे कळविले होते. तरी तुम्हाला या अवधींत एखाद्या चांगल्या स्थळाची कांहीं माहिती मिळाली असल्यास लवकर कळवावी.

निकड लावण्याचे कारण असे कीं, या दोन तीन महिन्याच्या अवधींत मालतीच्या विवाहाच्या प्रश्नाने आमच्या लहानशा संसार-सागरांत भयंकर वादळ उत्पन्न करून आमच्या मानसनौका हेलावून सोडल्या आहेत. मालतीच्या आईने तर फारच मनाला लावून घेतलें आहे. मालती मॅट्रिक झाल्यानंतर मी स्त्रीशिक्षणाच्या आवडीमुळे तिला पुढील अभ्यासक्रमासाठीं कॉलेजात पाठविलें, त्यावेळेसच तिच्या आईनें विरोध प्रदर्शित केला होता. पण त्याला न जुमानता मालतीनें माझ्या पाठिंब्यावर विसंबून चार वर्षें कॉलेजात काढून बी. ए. ची पदवी संपादन केली. मालती बी. ए. झाली म्हणजे मग मात्र तिचा

विवाह लावणीवर टाकणार नाही असे मी आजपावेतों तिच्या आईला वारवार आश्वासन देत आल्यानें तिने आतापावेतो कसाबसा दम धरला. पण आता मात्र तिने साहजिकच फार निकड लावली आहे; आणि एखाद्या चागल्या स्थळाचे नकारात्मक उत्तर आले म्हणजे तिला मनस्वी वाईट वाटते. शिवाय शेजारपाजारच्या बाया यासबधात काहीं स्पष्टास्पष्ट अधिकउणा शब्द बोलून तिचा मनस्ताप वाढविण्यास कारणीभूत होतातच मालतीचा विवाह होऊन जावई घरात केव्हा येईल याचा जणू तिला ध्यासच लागला आहे.

घरातल्या अशा वातावरणाचा स्वत. मालतीवर काहीं परिणाम झाल्याशिवाय अर्थातच कसा राहील ? दिवसेदिवस तिच्यावरही यामुळें शारीरिक व मानसिक प्रतिकूल परिणाम होत असल्याचे स्पष्ट आढळून येत आहे विशेषत आम्ही, तिच्या मातापित्यानी, अशा प्रसगीं तिचे लक्ष शक्य तितके या प्रश्नावरून काढून दुसरीकडे वेधण्याचा प्रयत्न करावयाचा, पण याऐवजीं तिची आईच मालतीचे लक्ष वारवार तिकडे वेधीत असते ही दैवदुर्विलासाची गोष्ट होय ! बिचारी मालती ! कॉलेजमधे शिकत होती तोपावेतो ती एक आनदी खेळकर स्वभावाची पोर होती. या मतलबी जगाच्या काड्याकुड्यानीं तिला स्पर्शही केला नव्हता. अभ्यास करणें, खेळणें, आणि मैत्रिणींशी थट्टाविनोद करणें यातच तिचीं गेलीं चार वर्षें मुख्यत्वे गेली. वर्तमान विद्यालयीन वातावरणामुळे मुलींच्या—विशेषतः मालतीसारख्या हुशार मुलींच्या—अगीं उद्भवणारा काहींसा उथळ अभिमान साहजिकच तिच्याही ठायीं उत्पन्न झाला होता. पण कॉलेजच्या आवारांत स्त्रीदाक्षिण्य व महिलाकर्षक प्रवृत्ति यांमुळें वारवार दिला जाणारा मान, आणि लग्नाच्या बाजारात वधू म्हणून उभी असतां त्याच मुलीची होणारी अवहेलना, यांतला भेद जेव्हा तिच्या ध्यानांत आला

तेव्हा एका क्षणात तिचा सारा अभिमान गळाला. तिची अल्लडवृत्ति पार लयाला गेली, ती गभीर दिसू लागली, स्वतःकडे आणि जगांतल्या इतर व्यक्तींकडे ती आता निराळ्या दृष्टीने पाहू लागली. विद्यालयांत हुशार विद्यार्थिनी म्हणून पदोपदी विद्यार्थ्यांकडून आणि प्राध्यापकाकडूनही मान मिळत असला, तरी त्याची किंमत तितक्यापुरतीच समजावयाची, आणि तें मोहमय वातावरण सोडून सत्यसृष्टीच्या अवघड ओबडधोबड प्रदेशात शिरताच, आपली किंमत केवळ बौद्धिक लायकीवरच अवलबून रहात नसून काही अशी स्वतःच्या ईश्वरदत्त पार्थिव सौंदर्यावर पण पुष्कळ अशीं स्वतःबरोबर पतिगृहीं येऊ शकणाऱ्या पितृदत्त सपत्तीच्या कमीअधिकपणावर अवलबून असते, हे कठोर सत्य तिला आता कळू लागले ! कॉलेजमध्यें आपल्याशीं पाच मिनिटे बोलण्याची सधि मिळाली तरी धन्य मानणारे उल्लू तरुण अनेक असले, तरी जन्माचा सोबती म्हणून निवड करण्याचा प्रसग येताच, त्यातले कित्येक आपल्या कसाला उतरत नाहींत आणि उरलेल्याच्या कसाला आपण उतरत नाहीं, अशी ही या जगाची परस्परविरोधी अवस्था तिच्या लक्षात विदारकपणे येण्यास फारसा उशीर लागला नाही

वस्तुतः सर्वसाधारणपणे प्रत्येक पदवीधर स्त्रीला ही नवीन दृष्टि अशा परिस्थितीत कमीअधिक प्रमाणात प्राप्त होत असली, तरी स्वभावतः प्रेमळ आणि अल्लड पण त्याचबरोबर नम्र आणि आज्ञाधारक अशा माझ्या मालतीवर या परिस्थितीचा दिवसेदिवस होत असलेला परिणाम पाहून मला घरांत येतांच आता कसेसेच होऊ लागते. आजपावेतो ती आणि मी घरीं असलो म्हणजे तिनें कधीं आपले कॉलेजांतले नाना प्रकारचे मनोरंजक अनुभव सागावे, कधीं विनोदी भाषेत प्रोफेसराचे गुणदोष वर्णावे, तर कधीं काहींतरी पेचात्मक प्रश्न टाकून मला

उत्तर सागता आले नाहीं म्हणजे आपणच ते सागून मला हसवावें. पण आता मी घरात शिरलो कीं एक प्रकारची भयाण शातता मला आढळून येते, आणि ती बहुधा कोठेंतरी एकीकडे एखादे पुस्तक वाचीत, किंवा मान खाली घालून काहीं काशिद्याचे काम करीत, अगर मुकाट्यानें तिच्या आईला स्वयपाकात मदत करीत असलेली मला दिसून येते. मी काहीं प्रश्न विचारलाच तर जितक्यास तितकेंच उत्तर देते आणि पुन्हा स्तब्ध राहते. अजून कॉलेजातच शिकत असलेल्या तिच्या पूर्वींच्या मैत्रिणी आल्या तरी त्यांच्याशीं ती फारसें बोलत नाही, आणि म्हणून त्याही अलीकडे फारशा येईनाशा झाल्या आहेत. तिच्या चेहऱ्यावर विचारमग्नता, दृष्टींत शून्यता, आणि स्वरात उद्विग्नता आल्याचा स्पष्ट भास होतो. पूर्वीं आईला प्रत्येक वाक्या-गणिक गमतीचीं प्रत्युत्तरें करणारी ती आता आई काहीं बोलली तरी उलटून पहात देखील नाहीं, शेवटीं मलाच मध्ये पडावे लागते आणि मग तिला अधिकच वाईट वाटते. मनोहरपत, तिच्या शारीरिक व मानसिक अवस्थेकडे पाहता आता शक्य तितक्या लवकर तिचा विवाह करणे मला फारच आवश्यक वाटूं लागले आहे. यापेक्षा आतापावेतों वाट पहात स्तब्ध न बसता, ती मॅट्रिक झाली तेव्हांपासूनच तिच्या विवाहाच्या खटपटीस लागून योग्य स्थळ आढळताच तिचा विवाह करून दिला असता, आणि मग तिच्या पतीच्या संमतीनें वाटल्यास तिचें विश्वविद्यालयीन शिक्षण पुढे चालू ठेविलें असतें, तर फार बरें झालें असतें असे आता तुमच्याप्रमाणेंच मलाही वाटू लागलें आहे. अस्तु, या विचारसरणीचा अवलंब आता मी कुसुमच्या बाबतींत करणार असलो, तरी मालतीच्या बाबतींत त्या विचारांचा आता कांहीं उपयोग नाहीं. ईश्वराच्या कृपेंकरून तिचा विवाह लवकरच जमून ती सुखी व्हावी अशी प्रार्थना करीत योग्य

खटपट करीत राहणें हेंच आता मुख्य काम आहे. आणि यात तुमचेंही सहकार्य मिळेल अशी खात्री आहे.

कळावे, हे आशीर्वाद.

तुमचा बंधू,
**नाना कोपरे.**

---

## [४४] वेश्येच्या घरी जाणारा कलाप्रेमी प्रवासी.

पार्वतीपूर, ता. २८-२-३७

चि. सुरेशला अनेक आशीर्वाद

तुझा तार आला होता त्यास अनुसरून येथून ताबडतोब दोनशे रुपये पाठविले ते तुला मिळालेच असतील

रा. मनोहरपंत कोपरे यांचेकडून तुम्हा दोघांबद्दल अलीकडे जी माहिती मला वेळोवेळी कळली आहे त्यामुळे फार खेद होत आहे तुला आणि नंदिनीला कांहीं वर्षांपूर्वी मुद्दाम इतक्या लांब लखनौसारख्या ठिकाणीं शिक्षणासाठी ठेवलें, त्यावेळेस पुढे तुम्ही मज-वर पश्चात्तापाचा प्रसंग आणाल अशी कल्पनाही नव्हती.

नंदिनीचे ता. २२ चे पत्र मिळाले त्यावरून तिला इतःपर एक अक्षरही लिहिणे व्यर्थ आहे असे दिसून आल्याने तुलाच हे पत्र लिहीत आहे. यापुढे जोपावेतो तिला तिची हल्लीची मूर्खपणाची प्रवृत्ति चालू ठेवायची असेल, तोपावेतो तिने आमचा तिच्याशीं कोणताही संबंध राहिला नाही असे समजावे. तिच्या भावी जीवना-बद्दल ती स्वतःच सर्वस्वी जबाबदार राहील.

आता तुझ्याबद्दल लिहितो. तू देखील तिला योग्य भाऊ शोभला आहेस ! गायन, अभिनय, नाट्य, इत्यादि कलांच्या मागे लागून त्यांच्या अभ्यासाच्या निमित्तानें वेश्यागृहापर्यंत तुझें पाऊल गेल्याचें

वर्तमान कळले. आणि त्यासंबधात काही भानगड उपस्थित होऊन शेवटीं पैसे भरून तुझ्या मित्रांनी ती मिटविल्याचे वर्तमानही कानीं येऊन मी धन्यता पावलो आहे ! फार उत्तम दिवे लावलेस तू तेथें ! मूर्खा, धंदेवाईक वेश्येपाशीं असलेली कला म्हणजे सर्पाच्या मस्तकावरचा मणी हे तुझ्या ध्यानात कसे आले नाहीं ? तो मणि हस्तगत करावयाला चांगला मांत्रिकच पाहिजे. नाहींतर कोणीं बेजबाबदारपणाने कांहीं तरी उपदेश करावा, आणि त्याच्या नादीं लागून तुझ्यासारखा बेअक्कल तरुण प्रवासी त्या मण्याच्या मागावर निघावा; म्हणजे तो मणि हस्तगत होणे तर दूरच राहून मोहाचा कृष्णसर्पच प्रथम विळखा घालून दंश करावयाचा ! शिवाय गायनकला शिकण्याचीं इतर सर्व साधने नष्ट झालीं की काय ? जवळपास शुद्ध पाण्याचीं वाटेल तितकीं जलाशये भरलीं असता, एखाद्या अतिउच्च हिमाच्छादित पर्वताच्या भयानक कड्यावरील बर्फ आणून त्याचेंच पाणी पिण्याच्या आग्रहास पेटून तन्निमित्त मृत्युमुखीं पडणाऱ्याबद्दल आदराऐवजीं कींवच येईल !

अस्तु. तुमच्या पायीं आता माझे पैसे आणि माझी कीर्ति याहून अधिक गमाविण्याची माझी इच्छा नाहीं. दोनदा बी. ए. ला बसूनही ती पायरी तुला अद्यापि ओलांडता आली नाहीं ! व अशीच परिस्थिति चालू राहिली तर तेथें राहून पदवीची पालखी तुझ्या हातीं येण्याऐवजी तुझ्या अभ्यासाची शेंडीच शेवटीं तुटेल अशी मला भीति वाटते ! यासाठीं हें पत्र मिळताच तू इकडे निघून यावें. आता तुझें कॉलेज ' प्रिपेरेटरी लीव्ह ' निमित्त बंद होणारच आहे. तू येथेच येऊन अभ्यास कर आणि परीक्षेच्या वेळेस तेथें पुनः जा. शिवाय महत्वाची गोष्ट म्हणजे येथें भारतशिक्षणमंडळीच्या कचेरींत कारकुनाची एक जागा सात आठ दिवसांतच रिकामी होण्याचा संभव आहे. तेथें

तुला लावण्याचा माझा विचार आहे. तू बी. ए. झालास म्हणजे कारकुनाचा मास्तर होणें मुळींच कठीण जाणार नाहीं. आजकालच्या काळात ही नोकरीची संधि किती महत्वाची आहे हें सांगणे नकोच. इतके स्वहित कळण्याइतकी अक्कल अद्याप तुझ्यात आहे अशी अपेक्षा करतों. कळावे, हे आशीर्वाद.

तुझा पिता,

**व्ही. एस. दप्तरे.**

ता. कः—येताना नंदिनीसही इकडे येण्यासाठीं पुन्हा एकदा विचारून पहावें. ईश्वर तिला सद्बुद्धि देवो.



[४५] **'उद्याच्या संसाराची' तयारी** (नंदिनी दप्तरेचें बंधूस पत्र)

लखनौ, २२–३–३७

प्रिय बंधू सुरेश यास,

सप्रेम नमस्कार वि. वि. बाबांच्या हेकेखोरपणामुळें मला हे पत्र तुझ्या मित्राच्या पत्त्यावर पाठवावे लागत आहे याबद्दल मला फार खेद होतो.

दादा, तू एकाएकीं येथून निघून गेल्यानंतर मला किती विलक्षण करमेनासे झाले म्हणून सांगू! जेवणखाण वगैरे कांहींच गोड लागेना. कधीं कधीं तर मनाचा निश्चय डळमळू लागे आणि चटकन रेल्वेचें तिकीट काढून तुम्हा सर्वांमध्यें चालले यावें असे वाटे. आईची आठवण तर किती वेळां येत असे त्याचा नेमच नाहीं. पण अशा सर्व प्रसंगीं शरच्चंद्रानें मला धीर द्यावा व मग मला बरें वाटावें. आता मात्र मला संवयीनें तितकेसें वाटत नाहीं. सुदैवाने मला येथील एका मुलींच्या खासगी शाळेंत ड्रॉइंग शिक्षकिणीची जागाही मिळाल्यानें चरितार्थासाठीं मी कोणावर अवलंबून राहिले नाहीं. तुझी

मात्र तशी स्थिति नसल्याने तुला बाबाच्या सांगण्याप्रमाणे करणे भागच होतें.

आईला माझी फार आठवण होते, नाही ! पण मी तरी काय करू ! बाबांनी व्यर्थ भलताच हेका धरून माझ्या कलोपासनेत मध्येच बिब्बा घालण्याचा आग्रह केल्याने, मलादेखील माझे स्वतंत्र अस्तित्व कायम ठेवणे भागच झाले मी माझ्या पत्रात त्याना सर्व गोष्टी नीट रीतीने समजावून लिहिल्या असताही, त्यांच्या डोक्यातील भ्रामक कल्पना नाहीशी होऊ नये याबद्दल आश्चर्य वाटते. त्यांनी संबंध तोडण्याचा धाक घातला म्हणजे निराधार होऊन मी लाचारावरयेत त्यांच्या हुकुमाला शेळीप्रमाणे मान तुकवीन असे त्याना वाटले असावे. पण ईश्वराने माझ्यात जी चित्रकलेची आवड उत्पन्न केली आहे तिची वाटेल ते करून योग्य जोपासना करणे हे मी माझे परम कर्तव्यच मानतें. सुदैवाने मला ही नोकरी लागली हे उत्तमच झाले, पण ती लागली नसती तरी कोणत्याही परिस्थितींत बाबाचा अयोग्य हुकुम मानावयाचा नाहीं असे मीं माझ्या मनाशीं ठरविलेच होते.

‘ उद्याच्या संसारा’ची तयारी चालू आहे. तुझें काम श्री. दडवते यानीं करण्याचे कबूल केले आहे.

तू तेथे कोणत्याही उद्योगात असला तरी तुझ्या गायनकलेच्या अभ्यासांत तू खंड पडू देणार नाहींस अशी मला आशा आहे. मला तर वाटतें, दादा, कीं कलाप्रेम हेच मनुष्य व पशू यांतील भेदाचें मुख्य गमक आहे. प्रत्येक मनुष्यात देवाने कोणत्या ना कोणत्या कलेची खास आवड उत्पन्न केलेली असते, आणि ती नीट ओळखून काढून त्या कलेचा पराकाष्ठेचा अभ्यास करणे हे प्रत्येकाने आपलें आयुष्यांतले एक मुख्य कर्तव्य मानले पाहिजे, असे शरच्चंद्र नेहमी म्हणतो तें मला ततोतंत पटतें. आजकाल आमचा बराच वेळ चित्रकलेत जातो. मला

शाळेत चित्रकला शिकविण्यात फारसे प्रयास पडत नाहीं, आणि त्यासाठी घरून तयारी करून जाण्याचाही प्रश्न नाहीं, यामुळे दिवसभरातला पुष्कळ वेळ आम्हाला मोकळा सापडतो. ह्या दोनतीन वर्षात इतर सर्व गोष्टी दूर सारून एकदा माझ्या मनासारखी चित्रकलेत निपुणता मिळवून भारतीय महिलांचे नाव या क्षेत्रात उज्वल करण्याची महत्वाकांक्षा माझ्या हृदयांत मला स्फूर्ति देत आहे आणि असें झाले म्हणजे आज जे मला हसत असतील तेच पुढे माझी स्तुति करू लागतील. अविरत, अनिर्बंध, एकनिष्ठ कलोपासनेचे फल व महत्व माझ्या स्वत:च्या जीवनाच्या द्वारे मी प्रत्यक्षपणे जगाच्या निदर्शनास आणीन. शरच्चंद्रांचेंही मला यात पूर्ण निरपेक्ष साह्य आहे. आजकाल तर त्यांच्या सहवासात मला एक प्रकारचा अनावर उत्साह व आनंद वाटू लागला आहे. त्यांचे बोलणे तरी किती स्फूर्तिप्रद असते, वाटतें, तासन्तास ऐकतच बसावें. परवा तर आम्ही एक चित्र काढायला म्हणून मुद्दाम बसलों, पण बोलण्यात वेळ कसा निघून गेला ते कळलें सुद्धा नाहीं, आणि शेवटीं चित्र तसेंच राहून गेले! असो. आता लवकरच आमच्या दोघांच्या शाळा उन्हाळ्याच्या सुटीनिमित्त बंद होणार आहेत. कळावें, तुझे उत्तर आले म्हणजे बरे वाटेल.

तुझी भगिनी,

**नंदिनी दप्तरे.**

---

## [४६] वर्तमानकाळांतला एक अनुभव.

पार्वतीपूर श्री गुरुवार ता. २५-३-३७

रा. रा. मित्रवर्य माधव यास सप्रेम नमस्कार वि. वि.

काहीं महत्वाच्या कामासाठीं मला भेटण्याकरिता तूं येथे ता. २३ ला येणार असल्याबद्दल तुझें ता. २१ चे पत्र येथें आलें त्यापूर्वीच

मी येथून चदनगावला निघून गेलों होतों. तेथे बॅंकेत एका कारकुनाची जागा रिकामी झाली असून, त्यासाठीं कमींत कमी बी. ए. झालेल्या उमेदवारांनीं अर्ज करावे अशी जाहिरात वाचल्यावरून मीं देखील एक अर्ज त्या जागेसाठीं केला होता. त्या अर्जाचे सुमारे वीस दिवसांनीं उत्तर येऊन मला 'इटरव्ह्यू' साठीं बोलाविले होते. त्यासाठीं मी तिकडे गेलो होतो, आज सकाळींच परत आलो. पण तूं ता. २३ ला येथे येऊन काल सायकाळींच परत निघूनही गेल्याने भेट होऊ शकली नाहीं याबद्दल मला फार वाईट वाटते. माझीही तुला भेटण्याची फार इच्छा होती.

'इटरव्ह्यू' ची फलनिष्पत्ति काहीं झाली नाहीं, पण त्याबद्दल मला आता पूर्वीसारखे वाईट वाटेनासे झाले आहे. मला ता. २२ ला दुपारीं अकरा वाजता हजर होण्यासाठीं कळाविले होते, त्याप्रमाणे मी तेथे त्या वेळेस गेलो. पण बॅंकेच्या मॅनेजरला त्या दिवशीं फार काम असल्याने दुसरे दिवशीं या असे सागून पहिल्या दिवशी माझी बोळवण करण्यात आली! माझ्याप्रमाणेच इतर ठिकाणाहून आलेल्या चार उमेदवाराना सागण्यात आले. परगावाहून मुद्दाम आलेल्या व्यक्तीला एक एक दिवस राहणें किती कष्टाचे व खर्चाचे जाते याची त्याना कल्पनाच नसावी. दुसरे दिवशीं पुन्हा अकरा वाजता गेल्यावर सुमारे साडेबारा वाजता मला बोलावणें आले. सुरवातीचे प्राथमिक प्रश्न झाल्यावर, तुम्ही 'अकाउटन्सी' शिकला आहा काय असे विचारण्यात आले. मी नाहीं म्हणताच मॅनेजरसाहेब मला म्हणाले, 'मग मला वाईट वाटते कीं, तुमचा अर्ज मजूर होऊ शकणार नाहीं, कारण, अकाउटन्सी शिकलेल्याचेही काहीं अर्ज आमचेकडे आले असल्यानें, त्यांना नाकारून तुमच्यासारख्याना ती जागा देणें रास्त होणार नाहीं.' औपचारिक

रीत्या आभार मानून मी बाहेर पडलो. 'औपचारिक रीत्या' असे मीं लिहिले खरें, पण एका दृष्टीने मीं खरोखरच त्याचे आभार मनापासून मानले. त्यानीं निदान आपले मनोगत मला स्पष्टपणे तेथेच कळविले, व काहीं दिवस व्यर्थ सशयात ठेवून नतर निराशा करण्याचा मार्ग अनुसरला नाहीं, हे तरी त्याचे उपकारच म्हणावयाचे ! पण, माधव, मला अकाउटन्मी येते किंवा नाहीं ही पृच्छा मला भेटीसाठी बोलावितानाच पत्रात केली असती, आणि ते शिक्षण मिळाले असेल तरच यावें असे त्यात स्पष्टच लिहिले असते, तर माझा हा सारा जाण्यायेण्याचा खर्च तरी वाचला असता ! पण इतकी काळजी काय म्हणून बाळगायची ? असो एकदरींत तुझी भेट होण्याचा योग नव्हता हेच खरे. आता पुन्हा केव्हा होईल ती खरी.

कळावे, लोभ असावा हे विनति तुझा मित्र,

**केशव दाते.**

ता क तेथील एका उच्चवर्णीय गृहस्थावर चदी नावाच्या कोणा हरिजन स्त्रीनें फिर्याद दाखल केली असून त्यात फिर्यादीतर्फे तू काम चालवीत आहेस, व त्यामुळे गावात फार खळबळ माजली आहे, अशा आशयाचा मजकूर 'प्रभाकर' मध्ये काही दिवसापूर्वी वाचला होता. सदरहू फिर्यादीचा निकाल काय लागला ?

---

**[४७] एक विचित्र विनंति.**

काचनपूर. श्री रविवार फा. व २ शके १८५८

प्रिय मित्र केशव यास सप्रेम नमस्कार वि. वि.

तुझे पत्र मिळाले. मी तेथे नुकताच आलो होतो त्यावेळेस तुझी भेट न झाल्यानें माझाही बराच हिरमोड झाला. पण त्यातही तुझा चदनगांवचा प्रवास फलद्रूप झाला असता तर काहीं वाटले नसते.

पण दुर्दैवाने तुझा पिच्छा अद्याप सोडला नाही असे दिसते. माझ्या या दोन दिवसाच्या तेथील वास्तव्यात तात्यासाहेबानीं तुझ्या भेटीची इच्छा पुष्कळ वेळा प्रदर्शित केली. तू ' प्रभाकरा ' साठी काहीं तरी लिहीत असावे अशी त्याच्यातर्फे माझी तुला आग्रहाची सूचना आहे त्यानीं बऱ्याच आस्थेने तुझी हल्लीची परिस्थिति जाणून घेतली, व त्यानाही वाईट वाटले. तुझीं अलीकडील काहीं हृदयस्पर्शी पत्रेंही मीं त्याना दाखविली. तीं वाचताना अनेक वेळा त्याना गहिंवरून आले. हल्लीच्या सर्वसाधारण पदवीधर तरुणाच्या परिस्थितीवर व मनःस्थितीवर उत्कृष्ट प्रकाश पाडणारी ती पत्रे नावें बदलून ' प्रभाकरातून' प्रसिद्ध करण्याची त्याची फार इच्छा आहे, याला तुझीही हरकत राहणार नाहीं असा मला विश्वास वाटतो

केशव, तुझ्या वडिलाचा एखादा फोटो व त्याचें हस्ताक्षर तू मजकडे लवकर पाठवावें अशी माझी इच्छा आहे हस्ताक्षरासाठीं त्याचे एखादें पत्र किंवा आणखी काहीं मजकूर असला तरी चालेल.

तू सवड पाहून तात्यासाहेबांस जरूर लवकरच भेट त्याच्या एकदर दिनचर्येवरून व सामाजिक चळवळींवरून इतराना नीटशी कल्पना नसली, तरी खरोखर त्याचेंही अतःकरण दुःखाने पोळलेले व पोळत असलेले आहे हें मला उत्तम प्रकारे माहीत आहे ईश्वराची कृपा झाली तर तुमच्या दोघाच्याही दुःखाचा अत लवकरच होऊन, उभयताच्या जीवनात समाधानाचा प्रभाकर उदय पावेल अशी मला आशा आहे. चंदी वि. एकबोटे फिर्यादीचे काम चालू आहे, निकाल अद्याप लागला नाहीं.

क. लो. अ. हे विनंति. तुझा मित्र,

**माधव मुद्रे** २८–३–३७



## [४८] सुशिक्षित कुमारी आणि वधूपरीक्षा.

पार्वतीपूर. श्री. गुरुवार, ता १–४–३७

चि. रा. मनोहरपत यास अनेक आशीर्वाद, वि. वि

तुमचे पत्र मिळाले. तुम्ही कळविलेली दोन स्थळाची माहिती वाचली प्रत्यक्ष मालती तेथे असल्याशिवाय या स्थळाकडून निश्चित उत्तर येणे सभवनीय नसल्यानें मी तिला लवकरच तिकडे पाठावितो.

वधूपरीक्षेच्या चमत्कारिक पण आवश्यक प्रसगाबद्दल तुम्हीं लिहिलेले मार्मिक विचार मलाही योग्य वाटले गेल्या वर्षांपासून उत्पन्न झालेल्या एकदर उद्विग्नताजनक परिस्थितींत विशेषेकरून कोणत्या एका गोष्टीचा तिच्या हळुवार मनावर परिणाम होत असेल तर तो याच गोष्टीचा. या प्रसगामुळे तिच्या हृदयास काय वाटत असेल याची मला पूर्ण कल्पना आहे. एखाद्या निरक्षर मुलीची पूर्वी जशी परीक्षा घेतली जात असे, त्या प्रकारें तिची ‘ परीक्षा ’ घेण्याचा प्रश्न उद्भवत नाहीं हें खरें. पण अमुक एक व्यक्ति भावी वधू या दृष्टीने माझी योग्यता ठरविण्यासाठीं येऊन गेली, पण नतर त्या व्यक्तीकडून नकार आला इतका विचार तिच्यासारख्या शिक्षित मुलीला दुःखी करण्यास पुरेसा आहे. पण, मनोहरपत, मी तरी काय करणार ? अतरपट दूर सारण्यापूर्वी वधूवरांचे परस्पर दर्शनही न होतां, केवळ आकाशस्थ ग्रहाची जन्मकुडलींतलीं स्थानें पाहून निश्चित मनानें दोन जीवांना जन्माच्या सोबतींत गुतविण्याइतकी जुन्या काळची श्रद्धा आज, दुर्दैवाने म्हणा अगर सुदैवाने म्हणा, आमच्यात राहिलेली नाहीं. पण, उलट प्रत्येक सुशिक्षित मुलीने स्वतःच विचारपूर्वक आपला सवगडी निवडावा अशी तरी परिस्थिति आज आपल्या समाजात कोठें आहे ! खऱ्या प्रीतिविवाहाचें जीवन खडीसाखरेचा खडा घातलेल्या दुधासारखे

असते, तें प्रथम विशेष गोड लागले नाहीं, तरी हळूहळू त्याची गोडी वाढत जाते, आणि अगदी शेवटचा घोट सर्वांत अधिक गोड लागतो. असे प्रीतिविवाह आज हिंदुस्थानात–नव्हे, अखिल विश्वात–कितीसे होत असतील?

आज मालतीने स्वत:च्या परिचयाच्या मार्गानें एखादा खरोखर अनुरूप वर माझ्या निदर्शनास आणला तर मी त्याला हरकत करणार नाहीं. पण अशी निवड करण्याची तिला संधि कोठें मिळते? येऊनजाऊन तिच्या निकट सान्निध्यातल्या वातावरणात जे काहीं थोडेफार तरुण तिच्या दृष्टिपथात येतील त्यातूनच ती निवड करू शकणार. बरे, या संकुचित क्षेत्रात तिच्या पसंतीचा एखादा तरुण आढळला तरी तो उलटपक्षीं तयार आहे किंवा नाहीं हा प्रश्न उरतोच. आणि दोघेही तयार झाले तरी ते केवळ विकारवश होऊन, क्षणिक भावनांच्या आहारी जाऊन, हे महत्वाचे पाऊल तर घेत नाहींना, हे बारकाईने पाहण्याचे माझे पितृकर्तव्य उरतेच. हार्डी या प्रसिद्ध इंग्रज लेखकाने 'फार फ्रॉम दि मॅडिंग क्राउड' या कादंबरींत उत्कृष्ट प्रकारे दर्शविल्याप्रमाणे प्रीतिविवाहाच्या मार्गाने जाऊ पाहणाऱ्या स्त्रीपुरुषानीं प्रथम परस्पराचे दोष जाणून घेतले पाहिजेत. गुण केव्हाही कळले तरी आनंदच देतील, दोष मात्र विवाहानंतर कळू लागले म्हणजे विवाहसौख्याचा घट हळूहळू गळू लागलाच म्हणून समजावे. केवळ वरवरच्या देखाव्याला भुलून, विकाराच्या अधीन होऊन, सुशिक्षित म्हणविणाऱ्या तरुणतरुणींनीं स्वतःच्या जबाबदारीवर केलेल्या प्रीतिविवाहाची नव्या नवलाईची चकाकी क्षणभरानें नाहींशी होताच, पतिपत्नींमधील अनेकविध विसंवादाचे हिडीस स्वरूप घटस्फोटाच्या किंवा अशाच इतर मार्गे जगासमोर आल्याचीं शोचनीय उदाहरणे, आपल्या समाजांत देखील आपण गेल्या काहीं

वर्षांत पाहिलींच आहेत. सारांश, मुलगी शिकलेली झाली तरी तिला अनुरूप वर पाहून देण्याचे पित्याचे कर्तव्य साधारणत. उरतेंच. आणि ते कसोशीनें बजावताना केवळ आपल्या भोवतालच्या जगावरच दृष्टि खिळू न देता दूरदूरच्या गावीही दृष्टि फिरवू म्हटले, म्हणजे वर आणि वधू यांची परस्पर 'परीक्षा' होण्याचा प्रसग प्राप्त झालाच !

बरे, यात वरपक्षाचा तरी काय दोष ? वधूच्या शिक्षणाची, स्वभावाची, व इतर प्रकारची कितीही माहिती मिळाली, तरी पूर्वी ओळख झाली नसल्यास वधूला एकवार प्रत्यक्ष पाहून मगच विवाहाचे नक्की ठरविण्याचा वरपक्षाने विचार केला, तर ते साहजिकच होय. मात्र इतकेच कीं, आधीं इतर सर्व गोष्टींचा विचार नीट करून, त्या जमत असल्यास, नतरच वधूपरीक्षेचा प्रसग घडवून आणावा. कित्येकाना वधूपरीक्षा हा एक मौजेचा व सहज होण्यासारखा प्रसग वाटतो. पण ही समजूत फार घातुक असून मुलीच्या मनाच्या दृष्टीनें विचार करता अत्यत अन्यायाची आहे. विवाहाचीं बोलणीं वधूपरीक्षे-पासून कधींही सुरू होऊ नयेत, वधूपरीक्षा ही त्यातली शेवटची पायरी असावी. द्रव्याच्या सबधीवर नकार द्यावयाचा असल्यास तो वधूपरीक्षे-पूर्वीच द्यावा, मुलगी 'पाहिल्यानतर' तसा नकार देणे बरे नव्हे. प्रत्येक वधूपरीक्षेचा शेवट विवाह जमण्यातच व्हावा असा आग्रह धरणे योग्य नसलें, तरी बहुसख्याक वधूपरीक्षाच्या बाबतींत तसे व्हावे. समाजानें या दृष्टीने वधूपरीक्षेकडे पाहिल्यास तरुण मुलींच्या मनाला होणारा व्यर्थ त्रास, व त्याची होणारी अवहेलना, पुष्कळ वाचेल

ही जाणीव आपल्या समाजातील पालकाना केव्हा होईल ती होवो. आज तरी या बाबतींत इतर मुलींपेक्षा पदवीधर मुलींच्या संबंधांतच अधिक त्रास पडतो असा मला अनुभव आला आहे. मुलींच्या शैक्षणिक योग्यतेमुळें निवड करण्याचे क्षेत्र अगदीं सकुंचित

झालेले, आणि म्हणून या सकुचित क्षेत्रातील व्यक्तींची स्वतःविषयीची कल्पना अवास्तव वाढलेली ! मनोहरपंत, अत्यंत श्रीमंत लोकांची गोष्ट वगळली तर आपल्यासारख्या मध्यम वर्गाच्या गृहस्थांनीं मुलींना कॉलेजचें शिक्षण देण्यास प्रारंभ करण्यापूर्वी आतां या दृष्टीने नीट विचार करण्याची वेळ खात्रीने आलेली आहे. नाहींतर तिच्या शिक्षणाच्या पायींच आधीं पुष्कळ खर्च व्हावयाचा, आणि त्या शिक्षणाचाच परिणाम म्हणून तिच्या विवाहप्रसंगीं आणखी अवाढव्य वित्तव्यय करण्याची पाळी यावयाची ! आणि शिवाय इतकेंही करून ती इतर मुलींपेक्षा अधिक सुखी राहतेच असे म्हणता येतें काय ?

पण तें कांहींही असले तरी आज मालतीच्या बाबतींत मोठाच प्रश्न माझ्यासमोर उद्भवला आहे खरा. आणि त्यापासून तिलाही फार मनस्ताप होत असतो. मुलगा काय किंवा मुलगी काय, विद्यार्जन चालू असतें तोंपावेतो त्याच्या मागे कांहीं तरी उद्योग असतो. तें संपल्यानें हा उद्योग नाहींसा झाला म्हणजे दुसरा कांहीं स्वाभिमानपूर्ण उद्योग लवकर मिळाला तर बरें असतें, येऱ्हवीं नुसतें घरीं बसून वेळ घालविण्याची पाळी आली म्हणजे मनाची केविलवाणी स्थिति झाल्याशिवाय राहत नाहीं. म्हणून मालतीला कांहीं दिवसांसाठीं तुमच्याकडे पाठविल्यास तिलाही थोडेसे बरें वाटेल असें वाटतें. लवकरच निश्चित करून कळवितो.

कळावें, हे आशीर्वाद. तुमचा बंधू,

नाना कोपरे.

---

## [४९] एक उद्बोधक चर्चा.

पार्वतीपूर. श्री गुरुवार, ता. ८–४–३७.

चि. रा. माधवराव यास सप्रेम आशीर्वाद.

तुम्ही येथून गेल्यानतर तुमचे एक पत्र आले होतें, त्यात मीं येथें तुम्हाला दाखविलेल्या निनावी विलक्षण पत्राच्या लेखकाबद्दल माहिती काढण्याचा तुमचा प्रयत्न चालू असून, तुम्हाला त्यात थोडी आशाही वाटत आहे असे तुम्ही लिहिले होते. ते तुमचे पत्र आल्यापासून मी तुमच्या प्रयत्नाच्या पुढील हकीकतीची उत्कटेने वाट पहात आहे.

मध्यतरीं तुमचे मित्र रा केशवराव दाते याची भेट झाली. परवांच ते येऊन गेले. सरासरी दोन तास ते येथे होते. फार आनदात गेला तितका वेळ माझा पुष्कळ गोष्टींची आम्ही मनमोकळेपणानें चर्चा केली.

त्यानी तुम्हाला पाठविलेल्या पत्रातील काहीं उद्गाराना मीं आक्षेप घेतल्यानें वादविवादास रग चढला. तारुण्याचा आवेश, कठीण परिस्थिति, अपेक्षाचा भग, निराशेचा तीव्र अनुभव, ज्याच्याशीं त्याचा प्रत्यक्ष सबध आला त्या विशिष्ट व्यक्तींची अरेरावी स्वार्थी वृत्ति, इत्यादि गोष्टींचा विचार करता त्यानीं तुम्हाला तसा मजकूर लिहिणे साहजिकच होतें. पण, निर्विकार दृष्टीनें पाहता, त्यातील मुख्य मुद्दे मान्य असले तरी त्यातली भाषा काहीं ठिकाणीं कशी अतिशयोक्तीची झाली आहे हे त्याना पटविण्याचा मी बराच प्रयत्न केला.

पण त्याच्याशीं परवा वादविवाद करण्यात माझा मुख्य उद्देश निराळा होता. त्याच्या मानसवाटिकेत केवळ सतापजन्य विघातक टीकेचीं काटेरी झुडुपेच उगलीं आहेत, किंवा सुविचारजन्य विधायक सूचनाच्या सुवासिक लताही वाढल्या आहेत हें मला अजमावयाचें होतें. आणि मला लिहिण्यास आनद वाटतो कीं, त्यांच्या मानाने त्यानीं या दृष्टीनेंही विचार केला आहे. त्याच्या म्हणण्याचा मथितार्थ असा दिसला की, मुलाना प्रथमपासूनच

पुस्तकी शिक्षणाबरोबर काही धंदेशिक्षणही मिळाले, प्रवेशपरीक्षेस बसणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्यास समाजात नेहमी उपयोगी पडणाऱ्या काहीं हस्तव्यवसायाचे ज्ञान आवश्यक ठेवण्यांत आलें, कॉलेजमधील शिक्षण-क्रमांतही इतर विषयाबरोबर याच्या अधिक विस्तृत प्रकाराचा समावेश करण्यात आला, आणि विशेषत. शास्त्रीय (सायन्स) शाखेतील विश्व-विद्यालयीन अभ्यासाला व्यावहारिक, औद्योगिक, स्वरूप देण्यात आलें, तर पदवीधराची आज जी असहाय स्थिति दिसून येते ती पुष्कळ कमी होऊ शकेल अशा प्रकारचें शिक्षण मिळाल्यास ते कोणत्या ना कोणत्या प्रकारे स्वत'चा चरितार्थ चालविण्यास समर्थ राहतील, आणि मग त्याचे ठायीं स्वाभिमान, उत्साह, धडाडी याचीही वाण पडणार नाहीं. आज पदवीधराना 'खेड्यात जा' असा उपदेश करण्याचा प्रघातच पडला आहे. पण तेथे जाऊन ते करणार तरी काय? कमींत कमीं त्याना श्री. वामनराव जोशाच्या 'इंदू काळे व सरला भोळे' मधील विनायकरावाप्रमाणे थोडीफार वैद्यकी तरी चरितार्थाचे साधन म्हणून यावयास नको काय? खेड्यातील जनतेला त्याचे तेथील अस्तित्व व साहचर्य उपयुक्त वाटेल अशी कोणती गोष्ट आज पदवीधर तरुणाना शिकविण्यात येत आहे?

माधवराव, तुमच्या मित्राचे असे भाषण ऐकून मला खरोखर आनंद झाला. प्रचलित विश्वविद्यालयीन शिक्षणाच्या ते सर्वस्वी विरुद्ध दिसले नाहींत. या पद्धतींतही काहीं उत्तम गुण आहेत हे त्यानी मोकळ्या मनानें मान्य केले, आणि राष्ट्रातील तरुणाना केवळ पोटभरू शिक्षण द्यावें असेही त्याचें म्हणणें नाहीं. पण हल्लीच्या शिक्षणक्रमात चरितार्थाच्या स्वतंत्र साधनांचा जो शोचनीय अभाव आहे तो जर दूर केला, तर उदात्त वृत्तीचे, सुसंस्कृत मनाचे, शिक्षणानें दृष्टि व्यापक झालेले, पण त्याचबरोबर स्वतःची उपजीविका स्वाभिमानानें चालवूं

शकणारे तरुण विद्यालयातून बाहेर पडतील अशी रम्य कल्पना त्यांनीं मजपुढे माडली.

केशवरावानीं दिग्दर्शित केलेल्या विचारसरणींत त्याना आज जाणीव नसतील असे काही खाचखळगे कदाचित असतील, आणि पदवीधराच्या बेकारीच्या रोगाला समाजांतून नाहींसे करण्याचा व्यापक प्रयत्न प्रत्यक्ष सुरू केल्यावर, त्यानीं सुचविलेले हे एकच औषध पुरेसे नाहीं असेही कदाचित आढळून येण्याचा सभव आहे पण त्याच्या-कडून एखाद्या दशवार्षिक सविस्तर योजनेची मीं अपेक्षा केली नव्हती. अशा योजना आखणे हें काम इतराचे आहे, केशवरावासारख्या एकट्यादुकट्याचें नाहीं. त्याच्या दृष्टीने त्यानी जे स्थूल विचार व्यक्त केले, त्यात मात्र मला पुष्कळच तथ्य वाटले यात सशय नाहीं.

त्याची काहीकाहीं वाक्ये तर हृदयाला जाऊन भिडण्यासारखीं असत चर्चा सपल्यावर मी त्याना सहज म्हटले, ‘ केशवराव, तुम्हीं दुपारची वेळ कशी घालविता ? तुमची हरकत नसली तर येत जा ना आमच्या ‘ प्रभाकर ’ कचेरीत ? ’ यावर ते म्हणाले, ‘ तात्यासाहेब, आजारी मनुष्याला रात्र आणि बेकार मनुष्याला दुपार ही सारखींच त्रासदायक जातात ! इतर सर्वजण स्वस्थ घोरत पडले असता आजारी व्यक्ति बिछान्यावर इकडून तिकडे करीत तळमळत पडलेली असते, इतर सर्व कामावर गेले असता बेकार व्यक्ति आपल्या खोलींत तळमळत पडली असते. याशिवाय आजारी अवस्थेत नसणारी एक असहायपणाची, स्वाभिमानशून्यता आणणारी, जाणीव बेकार मनुष्याच्या मनाला सदासर्वदा पोखरून काढीत असते ! तुमची इच्छा असल्यास दुपारीं येथें येण्यास माझी काहीं हरकत नाहीं. ’

पदवीधर तरुणांच्या सद्यस्थितिबद्दल चार भलीमोठीं पुस्तकें वाचूनही जें ज्ञान मला प्राप्त झाले नसतें ते केशवरावाच्या संगतींत

दोन तासात मिळाले इतकेच सांगितले म्हणजे पुरे आहे. आम्हाला चर्चेत तुमची वारवार आठवण होत होती.

उत्तर लवकर पाठवून पत्रारंभीं विचारलेली माहिती कळवावी. कळावे, हे आशीर्वाद. आपला,

गो. म. डोळे.



## [५०] शाबास माझी !

लखनौ ता ९-४-१९३७

प्रिय बधू सुरेश यास—

शेवटीं सर्व अडचणी सोसून ‘ उद्याच्या समारा ’ चा प्रयोग आम्हीं गेल्या चार तारखेस यशस्वी रीत्या करून दाखविलाच ! तुला हे ऐकून फार आनद होईल याबद्दल मला खात्री आहे. या नाटकाच्या गडबडीमुळेंच हे पत्र पाठविण्यास मला काहींसा उशीर झाला आहे. नाट्यसमितीचा सेक्रेटरी तो तूच एकाएकी निघून गेल्यामुळें काहीं दिवस सारेंच घोटाळयात पडून, केलेले परिश्रम वाया जातात की काय अशी धास्ती वाटू लागली होती. पण सुदैवानें श्री. दडवते यानीं तुझ्याऐवजीं ‘ शेखर ’ चें काम करणे कबूल केले. सुशिला कोपरेच्या सनातनी वडिलानीं तिला ‘ नयनाचें ’ काम करण्यास परवानगी नाकारल्याचें तुला माहीतच आहे. पण तेंही काम करण्यास येथील दुसरे एक महाराष्ट्रीय विद्यार्थी श्री. मनगटे तयार झाले. खरें सांगायचें म्हणजे शरच्चद्रानेच त्याना तयार केलें. तो स्वतः महाराष्ट्रीय नसताही त्यानें या प्रसगीं माझ्याखातर जी अपूर्व मेहनत जातीनें केली त्याबद्दल आम्ही सर्व त्याचे अत्यत आभारी आहोंत. नाटकासाठीं पडदा ‘ पेट करण्यात ’ आणि पात्राचे चेहरे रगाविण्यांत त्याचें साह्य आम्हाला किती झालें असेल हें तुला तरी सांगायला नकोच.

माझा शैलेचा पार्टही माझ्या कानावर आलेल्या अनेक श्रोत्यांच्या उद्गारावरून चांगला वटला असे दिसते. तो तयार करण्यात तर शरच्चंद्राची मदत अतिशयच झाली. त्याला अलीकडे मराठी चांगले समजू लागले आहे फारच लौकर आले मराठी त्याला ! तू यापूर्वीच नीट शिकवले असते तर त्याला ते केव्हाच येऊन गेले असते मला तर अलीकडे असेही मधूनमधून वाटते कीं, तो मूळचा एखाद्या महाराष्ट्रीय कुटुंबातलाच असावा. पण त्याच्या घराण्याची माहिती मीही फारशी कधी विचारीत नाहीं, आणि तोही सांगण्याला फारसा उत्सुक दिसत नाहीं काय असेल तें त्याचे त्यालाच माहीत ! माझ्या—आय् मीन् 'शैले'च्या—भाषणातल्या कितितरी महत्वाच्या वाक्यावर आम्हीं दोघांनीं परस्परात वादविवाद केला आहे ! 'शैले'चीं काहीं काहीं जळजळीत वाक्यें अजूनही आठवलीं कीं, थेट माझ्या हृदयाला जाऊन भिडतात. दुसऱ्या अंकाचे शेवटीं 'करुणेचे' अखेरचें हृदयस्पर्शी वाक्यही माझ्या हृदयाचा ठाव घेऊन तेथे समतीचे पडसाद उठवितें. ढोंगी समाजाच्या अन्याय्य बंधनावर अत्र्यानी काय जोराने ओढले आहेत कोरडे या अप्रतिम नाटकात !

हो, सुशिलेला तिच्या वडिलानी नाटकात काम करण्याची बंदी केली, तरी नाटक पाहण्याची परवानगी देण्याइतका भलेपणा मात्र त्यांनीं दाखविला होता विशेष म्हणजे, आपली मालती कोपरेही तिच्याबरोबर नाटकाला आली होती. मालती नुकतीच काहीं दिवसापूर्वी येथे आली आहे. दादा, मागे चारपाच वर्षांपूर्वी आपण तिघे एकत्र शिकत असताना मी तिला कधीं कधीं 'वहिनी' म्हणून चिडवे हें तुला आठवतच असेल. पण तेव्हाच्या त्या मालतींत आणि आताच्या या मालतींत फारच फरक पडला आहे ! ती मातली

किती आनंदी होती आणि बोलायची तरी किती मोकळ्या मनाने ! उलट, आजची मालती उदासीन दिसते आणि आपण काहीं बोलले तर जितक्यास तितकेंच उत्तर देते. तिच्या अंतःकरणाला आतून कोणत्या तरी चिंतेचा भुंगा पोखरीत असावा असा तिच्याशीं बोलताना आताशी मला प्रतिक्षणीं भास होत असे मला वाटते की, तिच्या घरातल्या वडील माणसाच्या फाजील बंधनामुळे मनाच्या तळाशीं साचणाऱ्या ' रिप्रेस्ड् वुइशेस् ' मुळे तर हा असा विपरीत परिणाम घडून आला नसावा ?

पण ती माझ्याशीं देखील इतक्या तुटकपणाने वागेल अशी माझी कल्पना नव्हती ! शरच्चंद्राशीं तिचा परिचय करून देण्याचा मीं प्रयत्न केला, पण त्याच्याशींही तिने फारसे संभाषण केलें नाही. माझी एक प्रिय बालमैत्रीण म्हणून शरच्चंद्राजवळ मी तिची आधी बरीच स्तुति करून ठेवली होती, त्यामुळें मला तिचे त्याच्याशी असे वर्तन पाहून फार संकोच वाटला. मी फार आग्रह केल्यामुळें एक दिवस ती माझ्या येथे आली होती, पण कशीबशी दोन तीन तास थांबून ती निघून गेली. मधूनमधून काही वादविवाद सुरू करण्याचा मी प्रयत्न करीत असे, पण ती लागलीच विषय टाळीत असे.

तुझे कसे काय चाललें आहे ? तू येथे परीक्षेसाठी येणार आहेस ना ? केव्हा येशील ? आईचीही माहिती जरूर कळव.

तुझी भगिनी,

नंदिनी.



[५१] बेकारींत पुत्रजन्म.

पार्वतीपूर. श्री. गुरुवार ता. १५-४-३७

रा. रा. मित्रवर्य माधव यास सप्रेम नमस्कार वि. वि.

तुझें पत्र मिळालें. कै. अप्पाचा एक फोटो यासोबत पाठवीत आहे. हस्ताक्षरास मात्र विलंब लागेल त्याच्या निधनानंतर एक दिवस मी उद्वेगाचे भरात दुःखद स्मृति उत्पन्न करणारीं त्याचीं सारीं पत्रे फाडून फेकून दिलीं. पण एखाद दुसरें कोठें तरी राहिलें असावें असे वाटते. तें शोधून लवकरच पाठवितो येथें न मिळाल्यास मानपूरहून त्याच्या हस्ताक्षराचा एखादा कागद मागवून देईन. पण तुला माझ्या वडिलाचे हस्ताक्षर कशासाठीं हवे ते मात्र मला मुळींच कळत नाही. हस्ताक्षरे जमविण्याचा नाद तर नाहीं ना लागला ? पण माझे अप्पा कोणी मोठे ‘ साहित्तिक ’ नव्हते, किंवा राजकीय अगर सामाजिक पुढारीही नव्हते, किंवा लक्षावधि रुपयाच्या उत्पन्नातून काही हजार खर्च करून त्यानीं दानशूरत्वाची कीर्ति देखील कमाविली नव्हती !

माधव, परवा आलेला एक हृदयद्रावक अनुभव तुला कळविल्या-वाचून राहवत नाहीं आपल्या बरोबरच कॉलेजमध्ये शिकत असलेला वामन माडे तुला आठवत असेलच त्याचे वडील माझ्या वडिलाचे फार मित्र होते, नेहमीं येत असत ते आमच्याकडे. तीन वर्षांपूर्वीं वारले ते. आपण बी. ए. झालो त्याच्या दुसऱ्या वर्षीं तो बी. एससी. च्या पदवीने विभूषित झाला होता. कॉलेजमध्यें शिकत असताना कविता करण्याचा आणि चर्चा, वादविवाद, इत्यादि समारभात आवेशानें भाग घेण्याचा त्याला किती नाद ! कॉलेज मॅगेझीनमध्ये लेख तरी किती यायचे त्याचे ! स्वारी सीनियर बी. एससी. मध्यें होती तेव्हाच त्याच्या आईबापानीं मोठ्या हौसेनें, कर्ज काढून, त्याच्या दोन हाताचे चार हात करून घरात सौभाग्यलक्ष्मी आणली, आणि ज्या द्वारानें मोठ्या थाटामाटानें वामनच्या वडिलानीं ती सौभाग्यलक्ष्मी घरात आणली, त्याच द्वारानें आठ महिन्यानतर त्याचें प्रेत बाहेर पडले ! साराच कारभार आटोपला, आणि बिचाऱ्या वामनवर ससाराचा सगळा भार

घेऊन पडला. तोंपावेतो निदान बी एस सी. चे शिक्षण तरी त्याचें पूर्ण झालें होतें म्हणून बरें. यानतर बरेच दिवस पावेतो त्यानें कोठें शाळा-शिक्षकाची नोकरी मिळावी म्हणून खटपट केली. पण दरवर्षी शेकड्यानीं बाहेर पडणाऱ्या एकाच साच्याच्या इतक्या पदवीधराना नोकऱ्या देण्याइतक्या शाळा तरी कोठून असणार ? अखेरीस नाइलाज होऊन त्यानें येथील एका विमाकपनीच्या कचेरींत कारकुनाची तात्पुरती नोकरी पतकरली. काय करणार ?

अलीकडे सहा महिन्यापासून त्या विमा कपनीची ती शाखा बद झाल्यानें याची नोकरीही गेली घरचा रोजचा खर्च चालविणेच जड जात आहे, मग मागील कर्ज फेडणे तर दूरच. पूर्वींचा वामन आणि आताचा वामन यात जमीनअस्मानाचें अतर पडले आहे. त्या वेळचा त्याचा तो दाडगा उत्साह, तो जोम, ती धडाडी, तो आवेश,—सर्व काहीं पार लयाला गेले आहे आता ! उदरपोषणार्थ कांहीं सोय लागावी म्हणून खटपट करता करता नाकीं नव आले आहेत त्याच्या. परवाच कोठेशीं एका दूरच्या शाळेंत शिक्षकाची जागा रिकामी झाल्यानें यानें अर्ज केला होता, पण ' अनुभव नाहीं ' या कारणासाठीं याच्या नावानें तेथें नकारघटा वाजली ! कॉलेजमध्ये सायन्स शिकत असतांही नीतिशास्त्राच्या प्राध्यापकाकडे मुद्दाम खासगी रीतीनें जाऊन मानवी कर्तव्याविषयींच्या अनेक कूट प्रश्नाची जोरजोराने चर्चा करणारा वामन कोठें, आणि त्या विमाकपनींत कारकून म्हणून काम करीत असता कांहीं पैसे खाल्याचा गवगवा ज्याचेबद्दल माझ्या कानीं आला तो वामन कोठें ! तसा तो हाडाचा वाईट असेल असें मला वाटत नाहीं. पण, म्हणतात ना—बुभुक्षितः किं न करोति पाप ?

असो. मुख्य मुद्याची गोष्ट लिहावयाची म्हणजे, परवा मी त्याचे शेजारीं राहणाऱ्या एका गृहस्थाकडे काहीं कामानिमित्त गेलों होतों.

परत येताना त्याने मला पाहिले व मी त्याचेकडे गेलो. आमच्या गोष्टी चालू असता मध्येच त्याच्या नावाचा तार आला. त्याला एकदम वाटलें की, कोठल्या तरी अर्जाचा जबाब आला असावा ! बेकार तरुणाला तार पाहताच दुसरा कोणता विचार प्रथम सुचणार ? आशाळभूत-पणाने त्यानें तारेचा लिफापा फोडला, आणि आतील मजकूर वाचला. मीही उत्कंठेनें त्याच्याकडे पहात होतो. एका क्षणातच त्यानें मजपुढें तो कागद फेकला. त्याला पुत्ररत्न झाल्याबद्दल त्याच्या सासऱ्यानें पाठविलेला तार होता तो.

माधव, प्रथम पुत्रजन्माची वार्ता ती ! कोणाला आनंददायक वाटणार नाहीं ? पण वामनच्या मुद्रेवर त्या प्रसंगीं मला निर्भेळ आनंद दिसला असे म्हणवत नाहीं. निराळ्याच अपेक्षेने लिफापा फोडल्यामुळे, मजकूर वाचल्यानंतर त्याच्या चेहऱ्यावर निराशेची एक स्पष्ट छटा प्रतीत झाल्याशिवाय राहिली नाहीं. ‘ इनाम ’ म्हणून एक पावली मिळवून तारवाला निघून गेल्यानंतर मी वामनला म्हटले, ‘ वामन, मी तुझें मनःपूर्वक अभिनंदन करतो या प्रसंगीं ! आता तू आम्हाला पेढे केव्हा देणार ते सांग पाहू ? ’

आणि, खरेंच सांगतो, माझे हे शब्द ऐकल्यानंतर त्या नूतन जन्मलेल्या अर्भकाच्या जनकाचा चेहरा पूर्णपणे उदास झाला ! केविल-वाण्या स्वरात वामन म्हणतो—‘ केशव, तुझ्यापासून माझी सारी परि-स्थिति लपलेली का आहे ? अरे, या अशा स्थितींत पुत्रजन्म म्हणजे ‘ ॲन् ॲडिशन् टु माय डिफिकल्टीज् ’ नाहीं का ? केशव, पुत्र-जन्माचा आनंद मानणें हें आमच्यासारख्या बेकाराच्या भाग्यात नाहीं रे ! ’ इतके बोलल्यानंतर मात्र त्याला अश्रू आवरेना !

हा अगदीं विपरीत पण हृदय हलविणारा प्रसंग पाहून मला काय वाटलें तें लिहून दाखविण्यास मी समर्थ नाहीं. कॉलेजमध्ये

असताना संततिनियमनाच्या विरुद्ध आवेशानें व्याख्यान देणारा वामन अलीकडे र. धों. कर्व्यांचा गिऱ्हाइक बनला आहे हे मला माहीत होते. पण पुत्रजन्मामुळें त्याला आनंदाऐवजी दुःख होईल ही मात्र मला कल्पना नव्हती. बाकी, त्याच्या आजच्या परिस्थितीचा नीट विचार केला तर त्यात नवल कांहींच नाहीं म्हणा काय ही आपल्या समाजाची परिस्थिति ! ज्या समाजात वामनसारख्या शिक्षित, कर्त्या आणि उत्साही तरुणांना, त्यांचा दोष नसताना, प्रथम पुत्र-जन्माचा अत्यंत नैसर्गिक आनंदही उपभोगणें आर्थिक परिस्थितीमुळे शक्य होऊ नये, त्या समाजाचें भवितव्य चितारताना चित्रकार कोणता रंग वापरील, हें कोणीही विचारी मनुष्य सहज समजू शकेल.

तुझ्या तेथें उपस्थित झालेल्या हरिजन विरुद्ध कर्मठ भानगडीचें पुढें काय झालें ? तुझा मित्र,

**केशव दाते.**



## [ ५२ ] 'असें ऐकण्यांत आहे' आणि 'असे म्हणतात'.

## धर्मपत्रिका

पार्वतीपूर, रविवार, जेष्ठ कृ. ११, शके १८५९, ता. ४-७-३७



( छापता छापता )

कांचनपूर येथील सुधारकी चाळे ( खास तार )

येथील एक नामधारी सुधारक श्री. माधव मुद्रे यांची काल सायंकाळीं गांवातील वेशीपाशीं कांहीं हलक्या लोकांशीं बाचाबाची होऊन शेवटीं मारामारीपर्यंत पाळी आली ! या गडबडींत श्री. मुद्रे यांच्या काठीनें एका मनुष्याचें डोकें फुटलें असें समजतें; खुद्द त्यांनाही प्रसाद मिळाला. भानगडीचें निश्चित कारण अद्याप कळलें नसलें तरी

काहीं असभ्य, अतस्थ ‘ समाजकारण ’ या घटनेच्या मुळाशी असावे अशी दाट वदता आहे. समाजसुधारणेच्या नावाखालीं हिंदुधर्मद्वेषाचे प्रदर्शन करणाऱ्या या स्वार्थी धर्मद्रोह्याचीं बरींच कृष्णकृत्यें या भानगडीमुळे चव्हाट्यावर येणार असल्याचा अदाज असल्याने, गावात सर्वत्र खळबळ उडाली आहे. श्री. मुद्रे याचे हातून मार बसल्याने ज्याचे डोके फुटले त्याने आज सकाळींच त्याचे विरुद्ध पोलिसात फिर्याद गुदरल्याचेही ऐकिवात आहे खुद्द श्री. मुद्रे यानाही पोलिस अधिकाऱ्याकडून बोलावणे आलें होतें, पण ते त्यानीं नाकारले असे म्हणतात

( टीपः—धर्मवीर एकबोट्याच्या विरुद्ध खोट्यानाट्या फिर्यादी दाखल करून प्रसिद्धी मिळवू पाहणाऱ्या या गृहस्थाचें खासगी वर्तन कोणत्या प्रकारचे आहे हे आता जगजाहीर होईलच. पोलिस अधिकाऱ्यानीं या प्रसगीं कोणताही मुलाहिजा न बाळगता, श्री. मुद्रे याच्या असल्या घाणेरड्या कृत्यांची पूर्ण चौकशी करून त्याना योग्य शासन मिळण्याची व्यवस्था केल्याशिवाय जनतेचें कधींही समाधान होणार नाहीं. —सपादक धर्मपत्रिका. )

## [५३] सत्कार्यांतले कष्ट.

काचनपूर श्री. मगळवार, जेष्ठ कृ. १३

शके १८५९

ती. रा. रा. तात्यासाहेब यास सादर साष्टाग नमस्कार वि. वि.

आपला तार मिळाला. धर्मपत्रिकेंतील विपर्यस्त मजकुरामुळें आपणांस काळजी लागणें साहजिकच होतें. पण आता प्रकृति चांगली आहे. सुदैवानें विशेष लागलें नाहीं. टेकडीच्या बाजूला नेहमींप्रमाणें त्या दिवशीं सायकाळीं फिरावयास गेलों होतों, मात्र या प्रसंगीं

एकटाच होतों मी. परत येताना सांधिकालच्या अंधारात, गावाला लागून असलेल्या आंबराईजवळ कोणींतरी एकाएकी मागून हल्ला केला! पण फक्त पाठीवरच एक तडाखा बसला डोक्यावर पुन्हा नेम धरला गेला होता, पण मी तेवढ्यात वाकून सरकल्याने वचावलो, ही ईश्वरकृपाच म्हणावयाची! हल्ला करणारे पुन्हा नेम धरण्याचा प्रयत्न करीत होते, पण इतक्यात माणसाची चाहूल लागल्याने ते पळून गेले. अंधारात जास्त दिसू शकले नाहीं, पण हल्ला करणारे दोघे असावे असे वाटते

या आकस्मिक हल्ल्याचे कारण अगदीं निश्चितपणे सांगता येणे शक्य नसले, तरी मी 'चंदा' भगिणीच्या तर्फे येथील कांहीं गृहस्थां-वर मारहाण करण्याच्या आरोपावरून दाखल केलेल्या फिर्यादीशीं या घटनेचा संबंध असावा असा माझा दाट संशय आहे गेल्या कार्तिकी एकादशीच्या उत्सवप्रसंगीं त्या हरिजन स्त्रीस विनाकारण अन्याय झाल्यानंतर, त्यासंबंधात 'धर्मपत्रिके'त जो विपर्यस्त मजकूर प्रसिद्ध झाला होता त्यातच विरोधकाना मारहाणीची प्रच्छन्न धमकी दिलेली होती. शिवाय, गेल्या पधरा दिवसात मी हजर असताना मला ऐकू जातील अशा प्रकारे येथील काहीं मंडळी जे कित्येक संदिग्ध उद्गार काढीत असत, त्याच्या अर्थाचीही आता मला नीट संगति लागते. आणि धर्मपत्रिकेच्या ताज्या अंकात जी विपर्यस्त बातमी धिसाडघाईने प्रसिद्ध झाली आहे तिने तर माझी जवळजवळ खात्रीच झाली आहे

पण ते कांहींही असलें, तरी ज्या सद्गृहस्थाचा या घटनेच्या मुळाशीं हात असल्याचा मला साधार संशय येत आहे, त्याचीं नांवे पोलिसांत देऊन हें प्रकरण वाढविण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं त्या भंगिणीच्या तर्फे मी दाखल केलेल्या फिर्यादीचें कारण वेगळे होते. एक गरीब अज्ञानी स्त्री, स्वतःवर झालेल्या अन्यायाचा केवळ असहा-

यतेमुळे प्रतिकार करण्यास असमर्थ होती, अपराधी व्यक्तींना अतः-करणापासून क्षमा करण्याइतकी तिच्या मनाची वाढ झाली नव्हती. अशा स्थितींत तिच्या वैयक्तिक व सामाजिक दुर्बलतेचा गैरफायदा कांही अन्यायी व्यक्तींना बिनाहरकत घेऊ देणे योग्य नव्हते. माझी गोष्ट निराळी आहे. सुदैवाने मला फारशी इजा झाली नाहीं, तशी झाली असती तर पोलिसांनीं चौकशी चालविलीच असती पण तसे नसल्याने, आता मी स्वत या बाबतींत पोलिसाचेकडे तक्रार गुदरण्याऐवजी हा त्रास सहन करणेच श्रेयस्कर समजतों. पोलिसचा येथील अधिकारी माझ्या परिचयाचा असल्याने, त्याने स्वत. मजकडे या बाबतींत चौकशी केली होती पण मी तक्रार गुदरण्यास अनिच्छा दर्शविली. मात्र, चौकशी झालीच तर खरे गुन्हेगार पुढे येणे फारसे कठीण नाहीं कारण, पळून जाण्याच्या धांदलींत एका माणसाच्या हातची लाठी तेथेच पडली, तिच्यावर तिच्या मालकाचीं अद्याक्षरे खोदलीं आहेत. ज्याची चाहूल लागल्याने हल्ला करणाऱ्यांनीं पलायन केलें, ते म्हणजे येथील सरकारी डॉक्टर व त्याचे एक पाहुणे होते ते सायकल-वरून घरी परत येत होते. त्यांनींच ती लाठी पाहिली व उचलली.

पण मला वारवार हेच वाटतें कीं, या संबधात मीं दुसरी एक फिर्याद दाखल करण्याने गावातले वातावरण अधिकच बिघडून, चालू कार्यात आणखी व्यत्यय येईल. सत्कार्यांत आपत्ति व कष्ट भोगणे भागच असतें.

धर्मपत्रिकेतील मजकुरानें उत्पन्न झालेली आपली काळजी वरील सविस्तर वृत्तात वाचून दूर होईल अशी खात्री वाटते. कळावे, सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. आपला,

माधव मुद्रे. ६–७–३७



[५४] **पहाटेचा प्रकाश.**

पार्वतीपूर श्री. बुधवार, ता. १४–७–३७

रा. रा. मित्रवर्य माधव यास सप्रेम नमस्कार वि. वि

तुझें पत्र मिळाले. मी मागें कबूल केल्याप्रमाणें माझ्या वडिलांच्या हस्ताक्षराचा कागद मानपूराहून आणून यासोबत पाठवीत आहे. मात्र हे तुला कशासाठीं हवे आहे ते अद्याप मला समजत नाहीं.

तुझ्यावर झालेल्या हल्याची बातमी 'धर्मपत्रिके'वरून व नंतर तात्यासाहेबाकडून समजली. या दिव्यातून तू सुदैवाने सुखरूप पार पडल्याबद्दल मी तुझे अभिनंदन करतो.

माधव, आता यापुढें मी या पत्रात ज्या प्रकारचा मजकूर लिहिणार आहे, तसा तुला माझ्या आजपावेतोंच्या पत्रात कधींच आढळला नसेल. गेले कित्येक महिने मनस्तापात काढल्यानंतर अलीकडे सात्विक समाधानाचीं आल्हादकारीं किरणे आपल्या पवित्र प्रकाशाने माझे अंतःकरण उज्वल करू लागलीं आहेत ! पूर्वी मनुष्यस्वभावांतील काळेकुट्ट पाषाणच माझ्या तीव्र अनुभवास येऊन सर्वसाधारण मनुष्याविषयीं मला एक प्रकारचा तिरस्कार वाटू लागला होता, आतां मानवी स्वभावाच्या सुप्रदेशात सद्गुणाच्या वेलींवर लागलेलीं सद्वर्तनाचीं पुष्पें आपल्या मधुर सुवासाने माझे मन भरून टाकीत आहेत !

तू म्हणशील हा इतका बदल झाला तरी कशानें ? काहीं मोठीशी नोकरी लागली ? एखादें घबाड हातीं आलें ? कोणा निपुत्रिक गर्भश्रीमंतानें दत्तक घेतलें ? कोठें खोदतां खोदतां द्रव्याच्या हंड्यावर कुदळी आपटली ? नाहीं. माधव, हल्लीं मला लाभलेलें समाधान या घटनांमुळें उत्पन्न होणाऱ्या समाधानापेक्षा निराळ्या

प्रकारचें आहे. तें मधुर आहे, पण मादक नाहीं. ते मनात आत्म-विश्वास उत्पन्न करतें, पण वृथाभिमानाला त्यांत थारा नाहीं. ते इत-रातले दोष दाखवितें, पण त्याच्याबद्दल तिरस्कार उत्पन्न करीत नाहीं.

खरें सागायचे म्हणजे हा बदल बाह्य सृष्टींत झाला नसून माझ्या दृष्टींतच झाला आहे. सुख बाहेर नसून आपल्यातच असतें असें म्हण-तात त्याची प्रचीति मला येत आहे आजपर्यंत एकीकडे जगाला आपलपोटेपणाबद्दल शिव्या देत असता मी स्वतः त्याच मार्गाचा प्रवासी होतो इतरानीं मला साह्य करावे अशी अपेक्षा करीत अस-तानाच, माझ्या साह्याचीही जगातल्या काहीं व्यक्तींना आवश्यकता आहे हे मीं दृष्टीआड केले होते. इतराची उन्नति करण्याच्या प्रयत्ना-तच स्वतःची खरी उन्नति होते हें मला आतापावेतो नीट कळलें नव्हतें.

आणि या माझ्या नवीन जीवनक्रमाचा उदय ही सकृद्दर्शनी अगदीं आकस्मिक भासणाऱ्या एका प्रसगातून झाला. माझ्या शेजारीं मागील बाजूस एक गरीब मजूर राहतो. काहीं दिवसापूर्वी त्याच्या एका नाते-वाइकाचे पत्र आले. स्वत. निरक्षर असल्याने ते घेऊन तो प्रथम एका वाण्याकडे गेला, पण वाण्याला गिऱ्हाइकाच्या गर्दीमुळे फुरसत नव्हती. नतर तो आणखी एकाकडे गेला, पण तेथेही तोच प्रकार घडला. शेवटी तो मजकडे आला. पत्र वाचून दाखविल्यानतर मी त्याला सहज म्हटलें, ‘ पहा, तुला स्वतःला लिहिता वाचता येत असतें, तर आज अशा प्रकारे इतराच्या जवळ तोंड वेंगाडण्याचें तुला काम पडले नसतें ! ’ त्यालाही तें पटले. तो म्हणाला, ‘ बाबूजी, खरें आहे तुमचें म्हणणें. पण काय करणार ? लहानपणापासून बापानें पैशासाठीं धद्यांत टाकलें, त्यामुळें शाळेंत लहानपणीं जाऊच शकलों नाहीं. आतां शिकावेसें वाटतें; पण काय उपयोग ? पोटासाठीं दिवसभर

मजूरी केलीच पाहिजे.'

मला काय वाटले कोणास ठाउक? मी त्याला एकदम म्हटले, 'शिकण्यासाठीं तुला धंदा सोडलाच पाहिजे असे नाहीं. रोज रात्रीं एक तास शिकशील तर दोनतीन महिन्यात लिहूवाचू शकशील. मी स्वतः शिकवीन तुला रोज रात्रीं, तू तयार असलास तर मलाही सध्या फुरसत आहे.' झाले, तो तयार झाला, आणि या क्षुल्लक घटनेतून माझ्या नवीन जीवनक्रमाचा उदय झाला.

प्रथम प्रथम मला वाटे कीं, उगीच हे विकतचे श्राद्ध आपण स्वतःवर लादून घेतलें आहे! दररोज ठरलेल्या वेळीं मला घरीं हजर रहावे लागे; त्यामुळे काहीं दिवस बांधल्यासारखे वाटू लागले. सुरवातीला त्या मजुराच्या लक्षात साध्यासाध्या गोष्टीही येत नसत, त्यामुळे एखादेवेळीं मला चिडल्यासारखे देखील होई. पण लवकरच त्या कामात गोडी उत्पन्न झाली, व जसजसा तो मजूर अधिकाधिक अक्षरे ओळखूं लागला, तसतसें मनाला सात्विक समाधान वाटू लागले. पुढेंपुढें तोही मोठ्या उत्साहानें शिकू लागला, आणि मीही मोठ्या आवडीनें शिकवू लागलो. दुसऱ्याची निरपेक्ष सेवा केल्याने मनाला होणारा आनंद वर्णिता येत नाहीं, तो अनुभविलाच पाहिजे. पैसे घेऊन चांगलें औषध दिलें व रोगी बरा होऊ लागला म्हणजे डॉक्टरला आनंद होईल खरा; पण पैशाची अपेक्षा न करतां एखाद्या निर्धन बिमाराला काळजीपूर्वक औषध देऊन, तो बरा होऊ लागल्यावर डॉक्टरला जो सात्विक आनंद होईल तो निराळाच!

हळूहळू माझा शिष्य सोपेसोपे शब्द वाचू लागला. आता त्यालाही जास्त मौज येऊ लागली; व त्या आनंदाच्या भरांत तो अधिकाधिक उत्साहानें नवीन पथ आक्रमण करूं लागला. लवकरच त्याच्या परिचयाच्या चारपांच निरक्षर लोकाना ही माहिती कळली.

प्रथम माहजिकच त्यानीं टवाळी केली; पण त्या बाबतींत मीं माझे आणि माझ्या शिष्याचें मन आधींच तयार करून ठेवले असल्याने त्याने टवाळीची पर्वा केली नाहीं. कोणतेही नवीन सत्कार्य सुरू करून चिकाटीने चालू ठेवले, म्हणजे प्रथम टवाळी, नतर आदर, व शेवटीं अनुकरण, हा सर्वसाधारण समाजाच्या प्रतिक्रियेचा क्रमच असतो. त्यास अनुसरून त्या मजुराचे मित्रही अक्षरे स्वतः शिकण्यास तयार झाले, व आता माझ्या घरीं रोज रात्रीं एक तास साक्षरता प्रचाराचा वर्गच सुरू लागला आहे !

मात्र, या एकदर घटनेमुळे जीवनाकडे पाहण्याची माझी पूर्वीची दृष्टि आता काहींशी निवळली आहे पूर्वी सारा वेळ माझ्या मनात वैयक्तिक स्वार्थाचेच विचार येत असत, आणि त्या दिशेनें कोणताही प्रकाश न दिसता अधारातच चाचपडत राहिल्यानें, सारे विश्वच मला निराशामय वाटू लागले होते. आता म्हणजे स्वार्थ सुटला आहे असे नव्हे, काहीं अशाने प्रत्येक मनुष्य स्वार्थी असावाच. पण आता काहीं वेळ तरी इतराच्या निरपेक्ष सेवेत खर्च होतो त्याना मी हळूहळू जगाची भौगोलिक माहिती देण्यास सुरवात केली आहे. माधव, त्याना आपल्या देशाचे नाव देखील माहित नव्हतें रे ! हें पाहिलें तेव्हा मला फार राग व तिरस्कार वाटला पण तो त्याच्या बद्दल नव्हे, तर माझ्या-बद्दल ! वाटले, आज इतके दिवस आपण याच्या शेजारीं राहून केवळ वैयक्तिक जीवनाचें ओझे वहाता वहातां दिवसचे दिवस निघून गेले. रोज थोडासा वेळ जरी या देशबाधवाचे प्रीत्यर्थ खर्च केला असता, तरी आज याची प्रगती होऊन देशाचे हे जबाबदार घटक झाले असते. आज त्याच्या भयंकर अज्ञानावस्थेची जबाबदारी कांहीं अशानें त्याच्यावर येत असली, तरी त्याना अशा अवस्थेत राहू देणारे त्यांचे शिक्षित शेजारी देखील त्या जबाबदारींतून सुटत नाहींत. निर-

क्षराना—मग ते बालक असोत किंवा वयस्क असोत—ज्ञानाची गोडी लावणें हे शिक्षिताचें कर्तव्यच नाहीं काय ?

माझ्या शिष्याप्रमाणेंच मला देखील हा मार्ग नवीनच आहे. म्हणून जसजसे दिवस अधिक लोटतील तसतसा या मार्गाचा जास्त अनुभव येऊन विचाराना आपोआपच निश्चित दिशा प्राप्त होईल यात आश्चर्य कसले ? कळावे, लोभ असावा हे विनंति. तुझा मित्र,

केशव दाते

---

[५५] गूढ उकलण्याचा प्रयत्न.

काचनपूर श्री शनिवार श्रा शु ९ शके १८५९

प्रिय मित्र केशव यास सप्रेम नमस्कार वि वि

तुझ्या वडिलाचे हस्ताक्षर तु पाठविल्यास आता एक महिना होत असल्याने तुला त्याविषयी कुतूहल वाटणे साहजिकच आहे. काहीं महत्त्वाच्या कारणामुळें मी यापूर्वी त्यासबधात खुलासा करू शकलो नाहीं. आज या पत्रात एकदर भानगडीचा खुलासा करणार असल्याने तुला आता अधिक वेळ बुचकळयात पडावे लागणार नाहीं।

केशव, माझे श्वशुर तात्यासाहेब डोळे याच्याशीं तुझा परिचय झालाच आहे. पण त्याच्याविषयी एक महत्वाची गोष्ट तुला माहीत नाहीं. आणि ती तुला सागू नये असें मींच त्याना सुचविल्यानें अद्याप त्यांच्या तोंडानें तुला ती कळली नाहीं.

तात्यासाहेबाना स्वतःला अपत्य असे एकच होते. तें म्हणजे त्यांचा मुलगा ‘ प्रभाकर ’. पण दुर्दैवानें तो देखील बरेच वर्षांपूर्वी हरिद्वार येथील कुभमेळयाच्या गर्दीत त्यांचे हातून हरवला. या सबंधांत त्यानीं मला जीं पत्रें लिहिलीं आहेत, तीं मी यासोबत तुजकडे पाठवीत आहे. त्यांवरून तुला सर्व कल्पना येईलच.

या पत्रात त्यानीं गतवर्षींपावेतो त्याचेकडे नियमित येणाऱ्या काहीं विलक्षण पत्राचा उल्लेख केला आहे. तीं पत्रे मी ज्यावेळेस समक्ष पाहिलीं त्यावेळेस मला दोन गोष्टींचें एकदम स्मरण झालें. एक म्हणजे, आपण दोघे एकत्र रहात असताना तुझ्या वडिलाकडून तुझ्याकडे येणारीं पत्रे, त्याचा लेखक आणि तात्यासाहेबांकडे आलेल्या सदरहू पत्रांपैकीं निदान काहींचा लेखक एकच असावा असे मला वाटूं लागले. पण तुझ्या वडिलाचे हस्ताक्षर पाहून पुष्कळ दिवस लोटले असल्याने मनाची एकाएकी खात्री होईना. म्हणून मी गेल्या मार्चे महिन्यात तुला यासंबधात समक्षच भेटणार होतो. पण त्याप्रसगीं तू चदनगावला गेल्यानें भेट झाली नाहीं. यामुळे शेवटीं मीं तुला तुझ्या वडिलाच्या हस्ताक्षराचा नमुना मागितला

तात्यासाहेबाकडचीं तीं पत्रे पाहून मला आठवलेली दुसरी महत्वाची गोष्ट म्हणजे तुझ्या वडिलाच्या मृत्यूनतर तू पाठविलेलें पत्र. तुझ्या वडिलाच्या मनात काही गुप्त वार्ता तुला सागावयाची राहून गेली असे तू त्यात लिहिले होते मला राहून राहून वाटू लागले कीं, त्या वार्तेचा सबध या पत्राच्या घटनेशीं असावा. एका अकल्पित आशेनें माझें मन प्रफुल्लित झाले केशव, तुझा आणि माझा आतांपावेतो मित्रभावाचा सबध राहिला, पण तो अगदी निकटचा असणे सभवनीय आहे या विचाराने माझें हृदय धडधडू लागले.

यानतर गेल्या महिन्यात तुझ्याकडून तुझ्या वडिलांच्या हस्ताक्षराचा नमुना आल्यावर मी सर्व परिस्थितीचा पूर्ण विचार केला; तेव्हां मला कांहीं गोष्टी स्पष्ट झाल्या, पण काहींचा मात्र अद्याप उलगडा होत नाहीं. त्या पत्रांपैकीं पहिलें व शेवटचे पत्र तुझ्या वडिलांच्या हातचें आहे यांत शका नाहीं. ( सर्व पत्रांवर छाप मुबईच्या पोस्टाचा आहे. ) बाकीचीं पत्रें कोणाच्या हातचीं आहेत तें कळत नाहीं. पण

शेवटच्या चार पत्रातील एका विशेष टीपेने मन फार घोटाळयात पडते. ती टीप 'मी माझ्या मित्राच्या सांगण्यावरून हे आपल्यास लिहीत आहे' अशी आहे. तुझ्या वडिलांचे हे मित्र कोण असावेत ? बरे, शेवटच्या पत्रात त्यांनीं जोडलेली ही टीप पहिल्या पत्रात का नाही ?

मला आणि तात्यासाहेबाना या प्रकरणात याहून जास्त उलगडा होत नाहीं. शेवटीं ही सर्व माहिती तुला सविस्तर कळवून तुझे मत घ्यावे असे आम्हीं ठरविलें. तुझा स्वतःचा व्यक्तिशः या सर्व प्रकरणाशी किती निकट व नाजुक संबंध असण्याचा संभव आहे हे ध्यानात घेतल्यावर, इतके दिवस आम्हीं शक्य तोंपावेतों स्वतंत्रपणेंच या गोष्टीचा निर्णय लावण्याचा प्रयत्न का केला हे तुलाही दिसून येईल.

तुझ्या पत्रात साक्षरताप्रचाराविषयीं जे तू लिहिले आहेस ते वाचून फार आनंद वाटला. इतरांची निरपेक्ष सेवा हाच खरे आत्म-समाधान मिळविण्याचा मार्ग आहे यांत शंका नाहीं. आपल्या देशा-तील नानाविध दुःखाच्या कारणांचे पृथक्करण केलें, तर त्यांचें मूळ फार मोठ्या अंशानें सार्वत्रिक निरक्षरतेंत सापडेल असें वाटतें. तू तुझा प्रयत्न नुकताच सुरू केला असल्याने तुला दिवसेंदिवस कायकाय अनु-भव येतात ते अवश्य कळव, मला स्वतःलाही ते बोधप्रद होऊ शकतील.

कळावे, लोभ असावा हे विनंति. तुझा मित्र,

**माधव मुद्रे.** ७-८-३७.

ता. क.—तुझ्या गेल्या पत्रातील मजकुराच्या शेवटचे काहीं निरर्थक शब्द आणि त्यानंतरचीं प्रश्नचिन्हें पाहून फार मौज वाटली. मागेंही तुझ्या एका पत्रांत तूं शेवटीं असेच एक निरर्थक प्रश्नचिन्ह घातलें होतें. मुंबईच्या 'नवाकाळ' दैनिकाच्या संपादकीय खात्यांत भरती होण्याची तुझी महत्वाकांक्षा दिसते ! **माधव.**



## [५६] गूढ उकलण्याचा प्रयत्न ( चालू ).

पार्वतीपूर　　श्री.　बुधवार ता. २५-८-३७

रा. रा. मित्रवर्य माधव यास सप्रेम नमस्कार वि. वि.

काहीं दिवसापूर्वी मीं पाठविलेले एक पत्र तुला मिळालेच असेल. त्यात लिहिल्याप्रमाणें, तात्यासाहेबाकडे आलेल्या त्या विलक्षण पत्रासंबंधात मी आईकडे खुलासा विचारला होता. आईचें नुकतेंच उत्तर आलें असून तें माझ्या अपेक्षेप्रमाणेंच आहे. माझी ही आई सावत्र असल्याने माझ्या वडिलांच्या जुन्या गोष्टी तिला माहीत नाहींत.

पण प्रस्तुत प्रकरणाचा खुलासा काढण्यासाठीं मला दुसरा एक मार्ग अलीकडे एक दिवस सहज सुचला यासंबंधींच विचार करीत असता वामन माडेची मला एकदम आठवण झाली. त्याची हल्लीची परिस्थिति मी मागे तुला कळविलीच आहे त्याचे वडील अण्णासाहेब माडे माझ्या वडिलांचे निकट स्नेही असल्याने मधूनमधून आमचे-कडे येत असत, आणि कधींकधीं बाबाही त्याना जाऊन भेटत. अण्णा-साहेब माडे कामानिमित्त बहुधा मुंबईसच रहात असत, आणि तात्या-साहेबाकडे आलेल्या त्या पत्रावर मुंबईचाच छाप आहे. अण्णासाहेब निवर्तल्यास सुमारे तीनच वर्षे झालीं असून तात्यासाहेबाकडे माझ्या वडिलांखेरीज इतर कोणा गृहस्थानें लिहिलेलीं पत्रेंही याच अवधींत बंद झालीं आहेत. या जुळून येणाऱ्या एकंदर परिस्थितीचा विचार करून मी वामनकडे गेलों व त्याला सर्व हकीगत सांगितली. माझ्या कल्पनेप्रमाणे तीं मधलीं पत्रें त्याच्या वडिलांच्याच हातचीं असल्याचें त्यानें खात्रीलायक सांगितले व मला पटवून दिलें. त्याचे वडील सन १९३४ च्या ऑगस्ट मध्ये वारल्याचें त्यानें सांगितले, व त्यानंतरच त्यांच्या हातचीं तीं पत्रें बंद झालीं.

येथपावेतों उलगडा झाला खरा; पण मूळ मुद्यावर यामुळें

प्रकाश पडत नाही. वामनचे व माझे वडील दोघेही आता खुलासा विचारण्याच्या पलीकडच्या अवस्थेला गेले आहेत. ( प्लॅंचेटची प्रचीति वाटल्यास पहाता येईल तुला या संबधात ! ) तात्यासाहेबांच्या दृष्टीनें नक्की असे अद्याप कांहींच ठरत नाहीं. पण वामनला मी त्याच्या घरच्या मंडळींकडून व कागदपत्रावरून शक्य तितकी चौकशी करण्यास सांगितले आहे. कदाचित् त्याच्याच येथून या घटनेवर कांहीं प्रकाश पडला तर पडेल !

तुझ्या योग्य सूचनेप्रमाणें तात्यासाहेबांनीं व मीं आता पावेतो परस्पराशीं या घटनेबद्दल एक अवाक्षरही काढले नाहीं. तुझ्याच मार्फत साऱ्या गोष्टी निश्चित होऊ दे. वामनकडून मला खुलासा कळताच तुला कळवितो. कळावें, लोभ असावा हे विनति.

तुझा मित्र,
**केशव दाते.**

---

## [५७] समाजाविरुद्ध बंडाचा बावटा उभारला !

लखनौ ता. ७–९–३७

मालतीस—

बाई मालू, तुझें सात ओळींचें पत्र मिळालें. त्याबद्दल तुला शतशः धन्यवाद !

तू येथें होतीस त्यावेळेस माझ्याशीं पूर्वीप्रमाणें मोकळ्यामनानें बोलली नाहींस; पण तरीही कोडगेपणा स्वीकारून मी तुला तू येथून गेल्यानंतर पत्र पाठविलेंच. तुझा अमूल्य वेळ खर्चून त्याला लहानसें उत्तर पाठविण्याचे परिश्रम तू घेतलेस याबद्दल मी तुझी फार फार आभारी आहे ! विशेषतः माझ्या विनतीस मान देऊन तू माझ्या घरीं गेलीस व आईची प्रकृति पाहून मला कळविलें,

याबद्दल मी तुझी सदैव ऋणी राहीन !

मालू—नव्हे, श्रीमती कुमारी मालतीबाई ! कारण मी आता तुझी पूर्वीची बरोबरीची मैत्रीण राहिले नाहीं. आपण समाजाच्या शिखरावर विराजमान असाल, मी त्याच्या लोखंडी टाचेखालीं चिरडलें जात आहे ! आपले समाजपुरुषाकडून गोडवे गाइले जात असतील, मी समाजाची शिव्याशाप देण्याची भूक शमवीत आहे ! समाजाच्या हिशेबवहींत आपल्या नांवानं पुण्याच्या प्रचंड राशी जमा केल्या असतील, माझ्या नांवानं पापाचे पहाड चढविले असतील ! समाजाच्या दृष्टीला आपल्या अंतःकरणात सद्गुणाचे मयूर नयनमनोहर नृत्य करताना आढळून येत असतील, तर माझ्या अंतःकरणातून त्याला दुर्गुणवुबडाच्या कर्णकर्कश चीत्काराचा नाद ऐकू येत असेल !

होय, मालती, मी स्पष्टच जाहीर करते कीं, मला शरच्चंद्रापासून गर्भ राहिला आहे ! मला त्यात कोणाचीही भीड अगर शरम वाटत नाहीं. शरम वाटावी तरी काय म्हणून ? मातृत्व हा स्त्रीत्वाचा नैसर्गिक उपसिद्धांतच आहे. ईश्वरापासून एकदां स्त्रीत्व स्वीकारल्यावर मातृत्वाचें खुल्या दिलानें स्वागत केलेंच पाहिजे. मुलींच्या कौमार्याचें, महिलांच्या पातिव्रत्याचें, फाजील स्तोम माजवून स्वतःसाठीं मात्र अनाचाराचीं सर्व द्वारें मोकळीं ठेवणाऱ्या आपलपोट्या नीतिशास्त्र-कोविद धेंडांनीं खुशाल माझें हें जाहीर विधान ऐकण्याऐवजी आपलीं बोटें कानात घालावीं, आणि इतकेंही करून हें कठोर सत्य त्याच्या ढोंगी संस्कृतीला व सोवळ्याला न जुमानतां त्यांच्या अंतःकरणापावेतों जाऊन पोंचलेंच तर तींच बोटें कानातून काढून माझ्या नावानें कडकडा मोडावीं ! मला त्याची काडीमात्रही पर्वा नाहीं.

धिःकार असो या ढोंगी समाजाचा ! या ढोंगी समाजाच्या

स्वार्थी नीतीचा ! या स्वार्थी नीतीच्या खोट्या एकांगी बंधनाचा ! या एकांगी बंधनाच्या बेगडी पुरस्कर्त्यांचा !

मालू, तू येथें असताना माझ्याशीं तुटकपणानें वागलीस त्याच्या कारणाचा अंदाज काहींसा मला त्यावेळेस लागला होता, पण त्याचें खात्रीलायक कारण आता कळले तुझ्या काकामारखीं सुशिक्षित म्हटलीं जाणारीं माणसे इतकी स्वार्थी, दुष्ट, ढोंगी असतील अशी मला कल्पना नव्हती ! असल्या शिक्षितापेक्षा हाडाचे सनातनी शतपटीनें बरे

तुझ्या काकाचीं जुनाट मते मला कधींच पटलीं नाहीत, पण मी त्याची कधींही प्रत्यक्ष निर्भत्सना केली नाही. त्याच्याने मात्र तेवढाही शिष्टाचार पाळला गेला नाहीं. परवा शरच्चंद्र एक दोन दिवसासाठीं गावाला गेला, मला अगदींच करमेना, म्हणून मी सहज सुशीलेला बोलावणें पाठविले. त्याबरोबर तुझ्या धर्ममार्तंड काकानीं जे विषारी पत्र पाठवून त्यात माझ्याविषयीं व माझ्याबरोबरच बिचाऱ्या निरपराध शरच्चंद्राविषयीं गरळ ओकलें आहे, त्याने तुझ्या काकाच्या दगडी अंतःकरणाची चांगलीच ओळख पटली मला !

आणि मग कोणाच्या शिकवणीवरून तू येथें माझ्याशीं अशी वागली असावीस तेंहीं अगदीं स्पष्ट कळलें मला. क्षमा कर, मालू, माझ्यासारख्या पतितेच्या पापी संगतीनें तुझ्या पवित्र जीवनातले काहीं क्षण विटाळले गेल्याबद्दल !

समाजांतील या ढोंगी ‘ बॅरिस्टर विश्रामाची ’ चीड येते मला ! अरे, तुम्ही पुरुषांनीं वाटेल तें केले तरी माफ ! जणू पुरुषत्व म्हणजे पापाचें पुण्य करणारें परिसच ! आणि निसर्गाच्या दुर्दम्य हाकेला ओ देऊन, माझ्यासारख्या एखाद्या स्त्रीनें वाडवडिलांच्या टरीव मार्गापेक्षां बाहेर जरा एखादें पाऊल टाकलें कीं लागलेच तुम्ही कोल्हेकुई करायला ! स्वतःच्या डोळ्यांतलें मुसळ दिसत नाहीं

तुम्हाला, आणि माझ्या डोळ्यातलें कुसळ असह्य झाल्याचा आव आणावा तुम्ही ?

असल्या नीच टीकाकाराचा विचार मनात आला कीं पुन्हा पुन्हा मला ' उद्याच्या ससारा ' तलीं तीं जळजळीत वाक्यें आठवू लागतात. ' शैले ' च्या शद्बात, उद्याच्या ससारातल्या भाषेत, मी याना स्पष्टच म्हणते, ' चोरून चालविलेली वाटेल ती अनीति तुम्हाला खपते—पण लग्नाच्या आधीं प्राप्त झालेले मातृत्व मात्र तुम्हाला महापातक वाटत ! समाजाच्या या खोट्या नीतीची—या ढोंगी अन्यायाची—आतां मला शिसारी आली ! नाहीं—ही शैला ढोंगान जगणार नाहीं किंवा बेअब्रूच्या भयान मरणारही नाहीं ! समाजाच्या या अन्यायाविरुद्ध बड पुकारण्यासाठीं ही शैला अविवाहित माता म्हणूनच जगात जगणार ! " आम्हा स्त्रीजातीच्या उद्धाराचा हाच एक मार्ग होय. अविवाहित मातृत्वात अपवित्र असें काहींही नाहीं ही शिकवण दृढमूल होईल तेव्हाच आमची हल्लीची स्थिति बदलेल.

मालती, लग्न, लग्न, ही काय चीज आहे ? माणसासाठीं कायदे आहेत, कायद्यासाठीं माणसे नव्हत जरा डोळे उघडून निसर्गाकडे पहा, आणि सागा तो विवाहित आणि अविवाहित यात काहीं भेद करतो का ? हा तर स्वार्थी पुरुषानीं स्वत च्या चैनीचा व सुखाचा प्रवाह अव्याहत चालू रहावा म्हणून शोधून काढलेला एक कृत्रिम अनैसर्गिक भेद आहे. मीं तो काय म्हणून पाळावा ? जो समाज माझ्या भावनाना कःपदार्थ समजून पायदळीं तुडवितो त्याच्या भावनांची, मताची, नियमाची, मीं काय म्हणून तमा बाळगावी ? उद्या आम्हा दोघाच्या कलानैपुण्याचा सगम होऊन एखाद्या त्रिखडप्रसिद्ध कलावताची माता होण्याचें भाग्य मला लाभले, तर आज पागल कुत्र्याप्रमाणें चावावयास धावणारा हाच समाज उद्या पाळलेल्या

कुत्र्याप्रमाणें आमच्या मागोमाग येईल !

असो. समाजाचे शिव्याशाप सहन करण्यास माझी मी पूर्ण समर्थ आहे. पण सवडीनुसार आईकडे जाऊन तिची चौकशी करीत राहण्याबद्दल विनति केल्यावांचून मात्र राहवत नाहीं. सर्व जगानें माझा तिरस्कार केला किंवा सर्व जगाचा मी तिरस्कार केला, तरी आईची आठवण मात्र मला वारंवार होते आणि होत राहील. कळावे, कृपा-लोभ असावा हे विनति. पूर्वी मैत्रीण असलेली, पण आता

तिरस्कृत बहिष्कृत झालेली,

नंदिनी दप्तरे.

ता. कः—तुझ्या काकाच्या पत्राला वेगळें उत्तर देण्याची माझी इच्छा नाहीं. पण तूं हे पत्रच कृपा करून जर त्यांचेकडे पाठवून देशील तर उपकार होतील बघ माझ्यावर. आणि त्याना म्हणावें कीं, जरा एक रुपया खर्च करून 'उद्याचा संसार' नाटक पहा किंवा विकत घ्या; म्हणजे स्वतःच्या टीचभर संसारांतल्या आरामांत गुग होऊन अखिल संसारातल्या सत्य परिस्थितीविषयीं मिटलेले त्याचे डोळे चांगलेच उघडतील !



## [५८] पुढें पाऊल.

पार्वतीपूर श्री. बुधवार, ता. ८–९–१९३७

रा. रा. मित्रवर्य माधव यास सप्रेम नमस्कार वि. वि.

तुझें पत्र काल मिळालें. तू विचारलेल्या तीन प्रश्नांपैकीं दोघाचीं उत्तरें नकारात्मक आहेत. वामन मांडेकडून अजून खुलासा आला नाहीं; आणि माझ्या नोकरीच्या खटपटीलाही अद्याप यश आलें नाहीं. मात्र, साक्षरता प्रचाराच्या माझ्या कार्याविषयीं तूं विचारलेल्या तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर बरेंच आशादायक आहे.

आता ते कार्य सुरू करून दोन महिने होत आले आहेत. या अवधींत मीं—नव्हे आम्हीं—बरीच मजल गाठली आहे. आता आम्ही तीन चार वर्ग चालवीत आहोत. पुष्कळ वयस्क गरीब लोक शिक्षण घेत आहेत. त्याची पूर्वीची स्थिति आणि आजची प्रगति यातला भेद त्याच्या स्वतःच्या लक्षात येऊन त्याना विद्येची महति पटू लागली आहे. दररोज नियमितपणें ते ज्ञानगंगेत स्नान करून पावन होण्यासाठीं उत्साहाने वर्गास येतात. प्रथम मला वाटले होते कीं, निरक्षराची शिकण्याकडे प्रवृत्ति वळविणे हेंच सर्वांत कठीण काम राहील, पण आता असें आढळून येते कीं, शिक्षिताची आपल्या गरीब अज्ञानी देशबांधवाना शिकविण्याकडे प्रवृत्ति वळविणे हे त्याहीपेक्षा कठीण आहे ! शिकणारे तयार असूनही शिकविणारेच थोडे या अवस्थेतून आम्ही हल्लीं जात आहोत. उथळ देशप्रेमाच्या नावाखालीं विनाकारण कोणी सपाची वावटळ उठवितांच, शेकड्यानीं त्यात भाग घेऊन विद्यालयें एक दिवस बंद पाडण्यात पुरुषार्थ मानणारे विद्यार्थी, आज या खऱ्या देशकार्यांत भाग घेण्यासाठीं हाताच्या बोटानीं मोजण्याइतक्या संख्येनेंदेखील तयार होताना दिसत नाहींत !

पण एकदरींत आमच्या कार्याचे पाऊल रोज पुढेंच पडत आहे. 'सत्यसंकल्पाचा दाता नारायण' या म्हणीचें प्रत्यंतर या कार्यांतही आम्हाला आलेंच. जसजशी विद्यार्थ्यांची संख्या वाढू लागली, तसतसें पाट्या, पेनसिली, पुस्तकें, कंदील, इत्यादींची व्यवस्था करणें आम्हास जड जाऊ लागलें. आणि याच विवंचनेंत असतांना सुदैवानें दोन सधन गृहस्थानीं ( यांच्यापैकीं एकाचें नाव तुला पुढें कळेलच ) आम्हाला स्वखुशीनें चांगली आर्थिक मदत करण्याची तयारी दर्शविली आणि तूर्त तरी परमेश्वरानें आम्हाला काळजींतून मुक्त केलें !

या कार्याच्या अनुषगाने मला किती तरी चागले अनुभव आले. तात्यासाहेबाना माझ्या या प्रयत्नाबद्दल फार आनद वाटला, पुष्कळ वेळां मुद्दाम येऊन ते वर्ग पाहूनही जातात. एकदा तर स्वतः एक वर्ग घेण्याविषयींही त्यानीं म्हटले. पण त्याच्यामागें आधीच असलेलें 'प्रभाकर'चें व इतर सामाजिक कार्य, आणि त्याबरोबरच त्याचे हल्लीचे प्रकृतिमान, या गोष्टींचा विचार करून मी त्याना त्या विचारापासून परावृत्त होण्याची विनति केली माधव, तात्यासाहेबा-प्रमाणे जे अन्य प्रकारे आपल्या वेळेचा सदुपयोग करीत असतील त्याना या कार्याशीं सहानुभूति व्यक्त करण्याचे निराळे मार्ग नाहींत का ? (चुकलों. 'मार्ग आहेत'. 'निरर्थक' प्रश्नचिन्हाची सवयच पडली आहे मला !) म्हणून त्यानीं शेवटी आर्थिक साह्य करण्याची इच्छा प्रकट केली तिला मात्र मीं आनदाने हो म्हटले.

यानतर त्यानीं एक दिवस 'प्रभाकरा'त या विषयावर एक अग्रलेख लिहून ज्याना या सत्कार्यांत भाग घेण्याची इच्छा असेल त्यांनीं 'प्रभाकर' कचेरींत येऊन भेटावे अशी सूचना केली (हा अग्रलेख तुझ्याही वाचण्यात आलाच असेल). माझे नाव त्यातून माझ्या समतीनें मुद्दामच वगळले होते. कीर्तीहून अधिक मादक वस्तू जगात फारशा नसतील. कीर्तीच्या मोहाला व्यक्ति बळी पडली कीं कृति लांब लाब गेलीच ! उलट कीर्तीकडे दुर्लक्ष करून मनुष्य कृती-लाच चिकटून राहिला तर मात्र खरी कीर्ति आपोआप चालत येते. कीर्तीतले मोहविष कधीं पूर्णपणे नाहींसे होत असेल किंवा नाहीं याची मला वानवाच वाटते, पण खऱ्या अतःकरणपूर्वक सेवावृत्तीचा उतारा जवळ असेल तर कीर्तीच्या नांगींतलें मदोत्पादक विष तितकेसें बाधक ठरत नाहीं. कितितरी सस्थाच्या उज्वल भवितव्याचा, समाज-सेवकांच्या कार्यतत्परतेचा, देशभक्तांच्या स्वार्थत्यागी वृत्तीचा, अभिजात

लेखकाच्या कलानैपुण्याचा, विद्वानाच्या विद्वत्तेचा, या उथळ कीर्तीच्या सवंग लोकप्रियतेच्या, वृत्तपत्रवृत्तांतबाजीच्या, खडकावर आपटून चक्काचूर झाला आहे ! ( आपल्या कॉलेजातील वाङ्मयमंडळाच्या वार्षिकोत्सवाचे अध्यक्ष म्हणून आपण आमंत्रित केलेल्या त्या सुप्रसिद्ध पत्रपंडित साहित्यिक महाशयाची आठवण तुला असेलच. स्वतःच्या भाषणाचे सविस्तर वृत्तांत वृत्तपत्रांतून झळकावे म्हणून त्यांची कोण धडपड ! जिवाची किती तारांबळ ! आणि तेवढ्यासाठीं आपल्यासारख्या स्थानिक कार्यकर्त्यांवर कोण ती अरेरावी सक्ति ! त्यांनीं स्वतःच थोड्या उच्च भूमिकेवरून या सर्व प्रकाराकडे पाहिले तरी त्यांना सुद्धा तो सांग किळसवाणा वाटेल ! ) कीर्तीची इच्छा सर्वस्वी हानिकारक आहे असे नाहीं, सर्वसाधारण व्यक्तीचे तोंड कृतीकडे वळविण्यासाठीं कीर्तीचे आमिष काहीं अंशीं उपयोगी पडते खरे, पण लवकरच—फारच लवकर—कीर्तीकडे तोंड फिरविलें कीं कृतीकडे पाठ करण्याची प्रवृत्ति होऊं लागते. ध्येय साधन होते व साधन ध्येयाच्या आसनावर विराजमान होते !

आमच्या साक्षरता-प्रसाराच्या कार्याविषयीं लिहितां लिहितां कीर्तीवरच मी घसरलो ! पण पूर्वी मनांत सहसा न येणारे पुष्कळ उदात्त विचार अलीकडे माझ्या मनांत येत असतात. मनुष्यानें सत्कार्य करीत रहावे असे म्हणतात तें यासाठींच तर नाहीं ? खरेंच, मनांतले वाईट विचार दूर करण्याचा उत्तम उपाय म्हणजे चांगले विचार मनांत आणणे हाच होय हें मला आतां पटूं लागलें आहे. आणि हीच गोष्ट वाङ्मयाला, किंबहुना जगांत सर्वत्रच, लागू नाहीं का ? वाईट अनिष्ट वाङ्मयावर टीका करणें समाजहिताला आवश्यक तर खरेंच; पण शेवटीं नुसत्या टीकेनें तें वाङ्मय नष्ट होईलसें वाटत नाहीं. समाजापुढें चांगलें वाङ्मय आलें कीं वाईट साहित्य उपासमारीनें

मेलेंच पाहिजे. ' समाजाची हल्ली रुचि ( टेस्ट ) बिघडली आहे, ती सुधरली की आम्ही चागले वाङ्मय समाजासमोर ठेवू ', असें म्हणणें हे ' विश्वातला अधार नाहींसा होऊ द्या मग मी उगवीन ' असे सूर्यानें म्हणण्यासारखेच आहे ! सूर्य उगवला कीं अधार गेलाच; समाजापुढे चागले वाङ्मय आले कीं, केवळ जनमनरजनाच्या उघड उद्देशाने आपल्या कलेचा पैशाच्या मोलाने विक्रय माडणाराची वाङ्मयीन विदूषक वृत्ति, किंवा अधिक कठोर शब्दात बोलावयाचे झाल्यास वाङ्मयीन वेश्यावृत्ति, मागल्या दाराने पळालीच समजावे !

असो. ' प्रभाकर ' मधील त्या अग्रलेखाचा परिणाम होऊन सात आठ व्यक्ती तात्यासाहेबाकडे येऊन भेटून गेल्या परतु त्यांतले काहीं जण या कार्यांत आर्थिक प्राप्ति होईल या कल्पनेने आल्यामुळे कामाचें खरें स्वरूप समजताच निराश होऊन चालले गेले ! तीन व्यक्तींचा लाभ मात्र फार अमूल्य झाला. मनुष्यानें अतःकरणपूर्वक सत्कार्य सुरू करून चिकाटीने तें चालू ठेवल्यास ईश्वर साधनाची आणि सहकाऱ्याची वाण पडू देत नाहीं हेच खरें

कळावें, लोभ असावा हे विनति तुझा मित्र,

केशव दाते.



[५९] **महात्मे बंडखोर असतात, मीही बडखोर आहे, अर्थात्...**

लखनौ. श्री. ता. ९–९–३७

प्रिय बधू सुरेश यास

सप्रेम नमस्कार. तुझें पत्र पोचले. बरेच दिवसांत तुझें पत्र न आल्यानें मला आईच्या प्रकृतीविषयीं काळजी वाटू लागली होती. म्हणून मग मी मालती कोपरेस पत्र लिहिलें; तिचेंही पण उत्तर नुकतेंच आलें. दादा, आईची मला वारवार आठवण होते रे !

तिच्याबद्दल फार काळजी वाटते मला. तिला होणाऱ्या मनस्तापाचा विचार आला कीं माझें मन अगदीं भांबावून जातें. वाटते, तिच्या समाधानासाठीं तरी बाबांच्या म्हणण्याप्रमाणें चालावें. पण लागलीच असेही वाटतें कीं, मनाला योग्य वाटणारा मार्ग केवळ मातेच्या मायेत गुरफटून सोडणें कितपत् योग्य होईल ?

कोपऱ्याच्या घरून बाबाना माझ्याविषयींची काहीं विशेष माहिती कळून ते संतापाने लाल झाल्याचे तुझ्या पत्रात वाचले मी तरी काय करू ? गेल्याच वर्षी कलानीतीवर तें सुदर भाषण करणारे बाबा एका वर्षातच समाजातल्या 'रिॲक्शनरी ग्रूप'शीं अशा प्रकारे पदोपदीं सहकार्य करु लागतील, असे भविष्य कोणीं त्यावेळेस वर्तविले असते तर त्याची गणना मी वेड्यातच केली असती !

दादा, मातृत्व म्हणजे वास्तविक काय आहे असे या सनातन्याना वाटते ? मातृत्व कधीं तरी अपवित्र होऊ शकेल का ? ईश्वराने जी सृजनशक्ति स्त्रीच्या स्वाधीन केली आहे तिचा परिणाम होऊन कोणा स्त्रीला मातृत्व प्राप्त झाले, तर त्याबद्दल तिला—त्या स्त्रीला—दोष काय म्हणून द्यावा ? दोष द्यायचाच असला तर तो त्या तुमच्या परमेश्वराला द्या. 'उद्यांच्या संसारा' तलीं सुवर्णाक्षरानीं लिहून ठेवण्याऱ्या पात्रतेचीं जीं काहीं काहीं वाक्ये माझ्या हृत्पटलावर कोरलीं गेलीं आहेत, त्यामध्ये दुसऱ्या अंकाच्या शेवटचें 'करुणे'चे अंतःकरण हलवून सोडणारे वाक्य मला फार महत्वाचे वाटतें. 'करुणा' आवेशाने म्हणते: 'मातृत्व हें कधींही पापी नसत ! मातृत्व कधींही अपवित्र नसत ! मातृत्वाला पावित्र्याचा चिरंतन अमरपट्टा मिळाला आहे. जगाच्या आरंभापासून तों जगाच्या अंतापर्यंत माता ही मंगलच राहाणार ! मातेच रक्षण करणं हें समाजाच पहिल कर्तव्य आहे ! मग ती माता विवाहित असो अगर अविवाहित असो !' किती मोलाचे

आहेत हे उद्गार ! स्त्रीजात त्याच्या लेखकाची सदैव ऋणी राहील !

'शैले'ला निदान माता तरी अशा उच्च विचाराची मिळाली; पण माझ्या तेही भाग्यात लिहिलें नाहीं !

कोणी काय वाटेल ते म्हणो. एकदा ज्या मार्गानें मीं जीवनरथ हाकला आहे त्या मार्गाची अनिष्टता माझ्या मनाला पटेपर्यंत, मी कोणाच्या भिडेस्तव अगर भयास्तव त्या मार्गापासून रेसभरही चळणार नाहीं. जगाच्या इतिहासातले मोठमोठे महात्मे तत्कालीन प्रचालित समाजकल्पनाच्या प्रचंड विरोधातूनच नाहीं का निर्माण झाले ?

आईचें कुशल वारवार कळवीत जाण्यास विसरू नकोस. तिला साग कीं, तुझ्या नंदिनीचे मन अगदीं शुद्ध आहे, स्वतःच्या मनाला पाप वाटेल असे तिने काहीं एक केलें नाहीं. बस, एक आईची आठवण झाली कीं मला येथे सारें भयाण वाटू लागतें. माता—किती प्रेमळपणा भरला आहे नुसत्या या शब्दातच ! पाप या मातृत्वाच्या जवळ तरी कसें येऊ शकेल ?

तुझी भगिनी,

नंदिनी.

---

[६०] न्याय आणि धर्म.

कांचनपूर श्री. गुरुवार विजयादशमी शके १८५९

ती. रा. रा. तात्यासाहेब यास सादर साष्टांग नमस्कार वि. वि.

आपलें पत्र पोचलें. 'प्रभाकर' च्या येत्या अंकांत प्रसिद्ध करण्यासाठीं आपण चंदी वि. एकबोटे फिर्यादीचा वृत्तांत विचारला आहे. पण गेल्या तारखेस कांहींच झालें नाहीं; फक्त पुढे तारीख लागली ! फिर्याद दाखल करून आतां बरेच महिने लोटले आहेत. पण न्याय देण्यांत उशीर करणें म्हणजे तो नाकारणेंच होय ही गोष्ट आमच्या येथील न्यायाधीशांचे ध्यानीमनींही नसावीसी दिसते. आम्हा

वकिलाचे काहीसे ठीक आहे, आमचीं घरें गावातच तरी असतात. पण बिचारे अज्ञानी गरीब अशील न्यायाच्या अपेक्षेनें लांब-लांबच्या खेड्यापाड्यातून तारिखेच्या दिवशीं येतात, आणि कचेरीच्या आवारात चपराशाच्या पुकारीकडे चातकाप्रमाणे कान टवकारून बसण्यात सारा दिवस निरर्थक घालविल्यानंतर, सायंकाळचे सुमारास 'आज मुकदमा चालणार नाहीं, सबब तारीख वाढली' हा शेरा ऐकून जड अंतःकरणाने पण हलक्या खिशाने पुनश्च घराची वाट धरतात! जितकीं कामे करणे शक्य आहे तितकींच कामें एका तारखेला लावणे या न्यायाधीशाना शक्य नाहीं असे नाहीं. काहीं दिवसांपूर्वी येथे आलेले एक न्यायाधीश तर फारच विलक्षण होते. उन्हाळ्यात सकाळच्या कचेऱ्या झाल्या म्हणजे कारकून, वकील, व पक्षकार सरकारी ठरलेल्या वेळानुसार सात वाजता कचेरींत यावयाचे. पण हे विद्वान न्यायाधीश नऊ दहा वाजेपावेतो 'देवपूजा' 'जपजाप्यादि' पुण्यकर्मे उरकून, थोडेसे खाऊन, कचेरींत यावयाचे, आणि मग दुपारीं चार वाजेपावेतो कचेरींत 'हाजिर है?' ची पुकार ऐकू यायची! हा काय धर्म? ही काय पूजा? हें काय पुण्यकर्म? अनेक लोकांच्या आत्म्याला विनाकारण तळतळत ठेवायचे, आणि आपण नाक दाबून जप करावयाचा! जप कोणाचा? देवाचा कीं रिकाम्या देव्हाऱ्याचा?

बरें, या गरीब निरक्षर अशिलाचे कष्ट इतक्यावरच कोठें संपले? कचेरींतल्या काहीं अधाशी कारकुनाचा भुंगा त्यांच्यामागें वेळोवेळीं असतोच. आणि हेच कारकून नंतर सायंकाळीं मंदिरात जाऊन मोठ-मोठ्यानें नामस्मरण करून आपल्या धर्माभिमानाचा डंका पिटत असतात! जणूं दुपारीं केलेल्या पापामुळें, आतून सतत ओरडणाऱ्या सदसद्विवेकबुद्धीची चिवचिव या नामस्मरणाच्या प्रचंड कोलाहलात ते बुडवूं इच्छितात! कित्येक वेळां अशिलांच्या तर्फे साक्षीदार येतात;

आणि मग तारीख वाढल्याने साक्षीदारांची जबानी न होऊन अशिलाच्या माथ्यावर या साक्षीदाराचा सारा खर्च विनाकारण पडतो. आणि इतकेही करून साक्षीदाराच्या पदरीं तरी पूर्ण भत्ता व प्रवास-भाडें नेहमीं पडतेंच का ? छे ! छे ! तसे झाले तर मग इकडे गावातल्या धर्मोत्सवाच्या वर्गण्या कशा भरतील ? अर्थात् उत्सवात भाग घेणारे सगळेच लोक अशा वृत्तीचे असतात असे मी मुळीच म्हणत नाहीं. पण कितितरी व्यक्ति याच वृत्तीच्या मला दिसतात. आणि हे असे लोक म्हणे हिंदुधर्माला व हिंदुदेवताना हरिजनाच्या विटाळापासून वाचविणार ! देव हसत असेल बसल्या ठिकाणीं, हे सारे पाहून ! किंवा, कोणी सागावे, रागावतही असेल ? देशाची हल्लीची विपत्तीची स्थिति याच्या अशा कृत्याचा अप्रत्यक्ष परिणाम तर नव्हे ?

कळावे, श्रुत होय हे विज्ञापना, आपले कुशल कळवावे.

आपला,

**माधव मुद्रे**. १४—१०—३७

---

## [६१] सामाजिक कार्याची वैयक्तिक परिणति.

पार्वतीपूर श्री. सोमवार ता. २५—१०—३७

रा. रा. मित्रवर्य माधव यास सप्रेम नमस्कार वि. वि.

‘ फूल नाहीं तरी फुलाची पाकळी ’ म्हणून साक्षरता प्रसाराच्या कार्यासाठीं तू पाठविलेली पाच रुपयाची देणगी पोचली तुझे त्याबद्दल मीं आभार ते काय मानावयाचे ?

आज मी तुला एक अत्यत आनदाची व तितकीच अनपेक्षित घटना लिहून कळविणार आहे. ‘ प्रभाकर ’ मध्यें तात्यासाहेबानीं आमच्या कार्यासंबंधीं लिहिलेल्या अग्रलेखाचे सुपरिणाम मी मागें एका पत्रांत तुला कळविले होते. पण ते तितक्यावरच संपले नाहींत. त्या

लेखाचा अलीकडील एक अतिशय महत्त्वाचा परिणाम म्हणजे, गेल्या दसऱ्याच्या दुसऱ्या दिवशीं तुझी मामेबहीण कु. मालती कोपरे बी. ए. यानींही यासबधात तात्यासाहेबाची गाठ घेऊन स्त्रीवर्गात या कार्याचा प्रसार करण्याची अतःकरणपूर्वक इच्छा प्रदर्शित केली ! तात्यासाहेबाना तर फार आनद झालाच, पण मला आश्चर्याचा धक्काच बसला हे प्रथम ऐकून ! ईश्वर कोणाला काय स्फूर्ति देतो हे सागवत नाहीं. आतापावेतो स्त्रीवर्गात साक्षरता प्रचार करण्याचा विचारच शिवला नव्हता आमच्या मनाला. पुरुषवर्गातलेच काम इतके विस्तृत आहे कीं जन्मच्या जन्म ते पुरू शकेल पण मालतीबाईसारख्या पदवीधर महिलाही जर ( या किंवा असाच इतर कोणत्याही ) समाजकार्यासाठीं अहमहिकेने पुढे सरसावू लागल्या तर, माधव, या अभागी देशाचे दुर्दैव सपुष्टात येऊ लागले आहे असे अत्यत आशेने का म्हणू नये ? निबिड अधःकाराचा समय आता भूतकाळाच्या उदरात अदृष्य झाला असून,भावी उज्वल भविष्यकालाला सूचित करणारा प्रभाकराचा उदय या वर्तमानकाळात आता दृष्टोत्पत्तीस येऊ लागला आहे. या बालप्रभाकराचा प्रकाश अद्याप सर्वच अतःकरणात प्रवेश करू शकला नसला, तरी हळूहळू त्याचे क्षेत्र वाढतच जाईल असा विश्वास वाटतो. मालतीबाईच्या प्रोत्साहनानें आणखीही काहीं स्त्रीकार्यकर्त्या या कार्यास येऊन मिळण्याचा आतां सभव दिसत आहे. त्यानीं स्वतः खटपट करून खालच्या वर्गातल्या चारपाच स्त्रियाना शिकण्यासाठीं तयार करून स्वतःकडे त्याच्या वर्गाचें काम घेतलें आहे. फार उत्साहानें काम चाललें आहे त्याचे. त्यांची शिकविण्याची पद्धतीही फार आकर्षक आहे. त्यांच्याबद्दल माझी पूर्वीची कल्पना त्याच्याशीं अलीकडे झालेल्या माझ्या सहवासामुळें मला पूर्ण बदलावी लागली आहे. या कार्याच्या निमित्तानें आमचें आतांपावेतों पुष्कळ सभाषण

झालें. शिक्षणाविषयी, देशसेवेविषयीं, राजकारणाविषयीं, कुटुंब-व्यवस्थेविषयीं, त्यांनीं आपल्या कल्पना मोकळ्या मनाने माझ्या-पुढे प्रसंगानुसार मांडल्या; फार चांगल्या वाटल्या मला त्या. एकाही संभाषणप्रसंगीं त्यांचेकडून योग्य मर्यादांचे अतिक्रमण झाले नाहीं. विश्वविद्यालयीन शिक्षणाच्या चांगल्या अंशाचा खरा परिपाक पहावयाचा असल्यास त्यांच्यात पहावा. आता, त्यांच्यात दोष नाहींत असें नाहीं, पण ते कोणात नसतात ? शिवाय त्यांच्या गुणसमुदायात ते दोष सहज लपून जातात. त्यांच्याशीं झालेला परिचय हा मी या सामाजिक कार्यातून प्राप्त झालेला मोठाच वैयक्तिक लाभ समजतो. कॉलेजातील शिक्षण पूर्ण झाल्यावर गेले दीड वर्षभर त्यांनीं जें उत्तमोत्तम ग्रंथांचे परिशीलन केलें, त्यायोगें त्यांच्या पूर्वीच्या मतात कांहीं अंशीं बदल झाल्याचे त्या म्हणत होत्या. पण त्या विश्वविद्यालयीन शिक्षणाच्या अभावीं मात्र आज झालेली आपली मानसिक व बौद्धिक प्रगति होऊं शकली नसती असे त्यांना वाटत असल्याने, त्या शिक्षणाबद्दल त्यांचे मनात आदरभाव आहे. तेंच शिक्षण; कांहीं व्यक्ती कष्ट सोसून तें संपादन करतात आणि शेवटीं दुःखसागरातच गटंगळ्या खातात; तर कांहीं व्यक्ती त्यापासून स्वतःचें हित करून घेतात ! मला इतकें मात्र वाटतें कीं, विद्यापीठातून बाहेर पडल्यावर जगाच्या रणांगणात जीवनकलहाच्या प्रत्यक्ष झुंजींत भाग घेण्याच्या उद्देशानें उतरल्यावर, असहायतेची व आत्मन्यूनतेची जी एक जाणीव आजकालच्या कित्येक पदवीधरात उत्पन्न होते, ती होऊं नये या दृष्टीनें प्रचलित शिक्षणक्रमात बदल घडून यावा; आणि शिवाय, या शिक्षणासाठीं उघडउघड अपात्र असतांही दुसरा योग्य मार्ग खुला नसल्यानें अगतिकपणें या शिक्षणाची कास पकडण्याचा कांहीं व्यक्तींवर प्रसंग येतो तो येऊं नये अशी कांहीं सोय व्हावी.

अशी सोय नसल्यानें त्या व्यक्तींचें तर नुकसान होतेच, पण एकाच क्षेत्रात फार भीड केल्यानें जे तेथें वास्तविक पात्र आहेत त्याचीही ते कुचबणा करतात. कळावे, लो. अ. हे विनंति. तुझा मित्र,

**केशव दाते.**

---

## [६२] अनिर्बंध जीवनांतील उद्यांचा संसार !

लखनौ. श्री. मंगळवार ता. ७–१२–३७

ती. रा. रा. नानास मनोहरचा शिरसाष्टांग नमस्कार वि. वि.

आपले ता. ३–१२चें पत्र मिळाले. मजकूर समजला. ती. सौ. वहिनींची प्रकृति आता सुधारत आहे हे वाचून आनंद झाला.

चि. सुशिलेला पाठविलेल्या पत्रात मालतीने साक्षरता प्रचाराच्या कार्याबद्दल कळविलेली माहिती वाचली. या कार्यामुळे तिच्या मध्यंतरीच्या मनःस्थितीवर व जीवनक्रमावर फार इष्ट परिणाम घडून येऊन, गेल्या एक दीड वर्षापासून तिच्या ठायीं उत्पन्न झालेली उद्विग्नता आता कमी होत असल्याचे आपणही आपल्या पत्रात लिहिले आहे. हे सर्व वाचल्यावर मला मागे एकदा येथे एका वक्त्याने ' मानवी जीवनात ध्येयाचे महत्व ' या विषयावर दिलेल्या सुंदर व्याख्यानाची आठवण झाली. मानवी जीवनात रस निर्माण करावयाचा असेल तर उत्तम ध्येयाच्या आकर्षणाखेरीज दुसरी गुरुकिल्ली नाही; ध्येयरहित जीवनात ऐंद्रियिक सुखाचा साठा ओतप्रोत भरला असला तरी मनुष्याच्या मनाला खरी शांति लाभणार नाही.

मालतीच्या विवाहाचें अद्याप कोठे जमले नाही याबद्दल खेद वाटतो. पण आतां या नवीन कामात चित्त रमल्यामुळे तिच्या मनावर पूर्वीसारखें दडपण राहणार नाहीं अशी खात्री वाटते. आजकालच्या काळात मुलाच्या शिक्षणानंतर त्याच्या चरितार्थाची सोय लागणें, आणि

मुलीच्या शिक्षणानंतर तिला योग्य वर मिळणे, सारखेच कठीण होऊन बसले आहे. तसें पाहिले तर यांतील दुसऱ्या गोष्टीचा उगम पुष्कळसा पहिलींतच आहे, कारण, मुलें शिक्षण झाल्यावरही लवकर स्वावलंबी होत नसल्यानें त्यांचे विवाहदेखील साहाजिकच लांबणीवर पडतात, आणि म्हणूनच उपवर मुलींना पति मिळणें कठीण जातें. वर्तमान-काळांतली ही स्थिति पाहतां कोणाही मुलीनें अगर तिच्या माता-पित्यांनीं, विवाहाची खटपट योग्य समयीं चालविल्यानंतर, नुसत्या विलंबासाठीं विषाद मानू नये. घिसाडघाईनें एखादे वेळेस जन्माचें नुकसान व्हावयाचें! उलट, याच अवस्थेतून जात असतां, जर एखाद्या सामाजिक कार्यांत अशा मुलींनीं आपलें लक्ष घातलें, तर समाजाचेंही हित होईल, आणि त्यांच्या स्वतःच्या मनावर येऱ्हवीं येणारें दडपणही कमी होईल असें मला वाटतें. या दृष्टीनें मला मालतीच्या या नवीन उपक्रमाबद्दल फार अभिमान व आनंद वाटतो.

येथील विशेष वृत्तांत लिहावयाचा म्हणजे श्री. दप्तरे यांची कन्या नंदिनी हिच्या मनःस्थितींत आतां पार स्थित्यंतर झालें आहे. गेल्या दोन महिन्यांत झालेल्या घडामोडींनीं आणि घटनांनीं तिच्या विचारसरणींत जमीनअस्मानाचें अंतर घडवून आणलें आहे. कांच आणि हिरा यांतला भेद आतां तिच्या दृष्टीला कळू लागला असून, समाजानें दीर्घ अनुभवानंतर ठरविलेल्या नियमांचा अर्थ आतां तिच्या ध्यानांत ठीक येऊ लागला आहे.

तरुण स्त्रीपुरुषांनीं परस्परांच्या सहवासासंबंधांत पाळण्याच्या आवश्यक निर्बंधांचा, नकळत नव्हे तर जाणुनबुजून, भंग केल्यानें तिच्यावर निसर्गनियमानुसार प्राप्त झालेल्या प्रसंगाची माहिती आपल्याला आहेच. स्वतंत्र नोकरी असल्यानें तिनें प्रथम कोणाच्या टीकेची पर्वा न करतां, उलट उठताबसतां 'निर्दय' समाजाला

शिव्या देण्यास व त्याच्या ' निरर्थक ' ' पाशवी ' नियमांवर आग पाखडण्यास प्रारंभ केला. शेपटी तुटलेल्या कोल्ह्याप्रमाणें इतर कुमारिकानाही ती स्वतःचें अनुकरण करण्यास उघडउघड सुचवू लागली. श्री. अत्रे यांच्या 'उद्याच्या संसारा'तलीं कांहीं कांहीं वाक्यें तर तिला वेदवाक्यवत् वाटू लागलीं !

असा हा क्रम चालू असता, तिला कांहीं महिने लोटल्यानंतर हळूहळू दररोज ज्वर येण्यास प्रारंभ झाला. सुरवातीस तिने दुर्लक्ष केले, पण लवकरच खोकला सुरु झाला व अन्न सुटत जाऊन अशक्तता आली. प्रथम कांहीं दिवस तिला शाळेतून किरकोळ रजा मिळाली. पण पुढें दुखणे जास्त लांबल्याने, आणि विशेष म्हणजे तिच्या कांहीं जाहीर उपदेशाचे वृत्तांत शाळेच्या जबाबदार अधिकाऱ्याच्या कानावर गेल्यानें, तिला तेथून अर्धचंद्र मिळाला आणि ती अधिकच अडचणींत सांपडली.

शेवटीं बिमारी जास्त वाढून येथील स्त्रियांच्या सरकारी दवाखान्यात तिला भरती व्हावें लागलें. येथपावेतो तिचा तो मित्र शरच्चंद्र भट्टाचार्य यानें मात्र तिची मनःपूर्वक सेवा चालविली होती हे कबूल केलें पाहिजे. दवाखान्यात डॉक्टरानीं चिकित्सा करून क्षयाचें निदान केलें. या भयंकर रोगाच्या उद्भवाचें कारण जरी डॉक्टरांनीं तिला स्पष्टपणें सांगितलें नाहीं, तरी एकदा दोन डॉक्टर तिला झोप लागल्याच्या समजुतीवर परस्पराशीं बोलत असता हिच्या कानावर तें पडलेंच ! तें कारण म्हणजे हिचा अनिर्बंध जीवनक्रम आणि ज्या व्यक्तीशीं हिचा शरीरसंबंध आला त्याच्या शरीरांतलें क्षयजंतूचें अस्तित्व !

आणि ज्या क्षणाला तिनें हे शब्द ऐकले त्या क्षणींच तिचे डोळे खरोखरच पूर्णपणें उघडले !

मातृत्व हें नेहमीच पवित्र असतें, आणि अनिर्बंध मातृत्वाला

हरकत घेणारा समाज अत्यंत मूर्ख व अन्यायी आहे, अशी हाकाटी प्रत्यही करणाऱ्या नंदिनीला आतां समाजाच्या म्हणण्यात काहींसें तरी तथ्य भासू लागलें. बेजबाबदार विधानांच्या नादीं लागून समाजातील सूज्ञ व्यक्तींच्या सूचनांकडे दुर्लक्ष केल्याबद्दल ती स्वत:स आता दोष देऊं लागली. समाजानें ठरविलेले ठोकळ नियम काही अगदींच निराधार नाहींत, याची स्पष्ट जाणीव तिला स्वत:च्या कटु अनुभवानीं होऊं लागली. जीव कीं प्राण वाटणारा शरच्चंद्र तिला आता दृष्टीसमोरही नकोसा झाला !

अशा मन:स्थितींत बिमारीचा दुस्तर जीवनक्रम कंठीत असता एक दिवस तिनें मला एक पत्र लिहिलें. पश्चात्तापाने पूर्ण भरलें होतें ते. मला फारच वाईट वाटले तें वाचून बापाचा आधार तुटलेला; मातेचें प्रेमळ सान्निध्य दुरावलेलें, लखनौसारख्या परक्या ठिकाणीं एकटी दवाखान्यात पडलेली, भयंकर रोगानें ग्रासलेले, आतून मन पूर्वकर्माबद्दल टोंचत असलेले, लोकांत तोंड काढण्याची सोय नुरलेली, उदरपोषणाचीही पंचाईत पडलेली ! अशा दीनवाण्या स्थितींत मागील सर्व विरोध विसरून तिला माझी आठवण झाली यात काहींच नवल नाहीं.

पत्र मिळतांच दुसरे दिवशीं मी तिला जाऊन भेटलो. तिच्या मनांत आणि शरीरात पार बदल झालेला आढळला मला. अश्रू रोकणें मला कठीण जाऊं लागलें. भलभलत्या पुस्तकाच्या नादीं लागून शरीराची आणि जीवनाची तिनें अगदीं नासाडी करून घेतली आहे. समाजाचे नियम आडवे येत होते तेव्हा समाजाला शिव्या दिल्या, आता निसर्गानें आपल्या नियमानुसार अस्त्र उचललें असतां कोणाला शिव्या देणार ? आणि दिल्या तरी काय होणार !

नंदिनीची सर्व हकीगत समजल्यावर मी शरच्चंद्राकडे गेलों.

त्यानें स्वतःविषयीं विशेष, कांहीं माहिती सांगितली नाहीं, तरी लख-नौस येण्याच्या कांहीं वर्षांपूर्वी आपण क्षयानें आजारी होतो पण त्यातून बरें वाटलें असें त्यानें कबूल केलें. नदिनीच्या स्थितीमुळें त्यालाही वाईट वाटलें. माझी कल्पना होती त्यापेक्षा तो मला पुष्कळ चागला मनुष्य वाटला. पण आता त्याच्या चांगलेवाईटपणाचा प्रश्नच काय ? त्याची स्वतःचीही प्रकृति अलीकडे पुनः बिघडल्याचीं चिन्हें दिसत आहेत.

मला अतःकरणपूर्वक वाटतें कीं, श्री. दप्तरे यांनीं नदिनीच्या वर्तमान परिस्थितीकडे पाहून तिला क्षमा करावी आणि घरीं काळजी-पूर्वक घेऊन जावें. त्याने तिच्या मनाची पुष्कळशी तळमळ नाहींशी होईल. किती झालें तरी नदिनीच्या हल्लीच्या परिस्थितीला त्यांचीं उथळ मतेही थोडीबहुत कारणीभूत आहेतच.

आपण या सबधांत श्री. दप्तरे यांचेकडे समक्ष जाऊन अवश्य गोष्ट काढावी अशी माझी आग्रहाची सूचना आहे. मीही येथें तिचें मन तयार करतों. कळावें, श्रुत होय हे विज्ञापना.

आपला बधू,

**मनोहर.**

---

[६३] **जीवन आणि मृत्यू.**

कांचनपूर श्री. बुधवार, मार्गशीर्ष शु.५ शके १८५९

श्री. कु. मालतीवन्संना सप्रेम नमस्कार,

तुमचें पत्र पोचलें. पण त्याच्या आधल्या दिवशींच बिचाऱ्या इदिराबाई स्वर्गवासी झाल्या होत्या ! त्यामुळें त्यांच्या नांवाचें तुम्हीं पाठविलेलें पत्र जसेंच्या तसेंच यासोबत परत पाठविण्याचें दुर्भाग्य मला लाभलें आहे. त्यांच्या घरच्या मंडळींच्या विचित्र कल्पनांमुळें तुम्ही

त्यांना आमच्या मार्फत पत्रें पाठवीत होता, आता कशाला येईल असा प्रसंग पुन्हा !

सुटला एकदाचा त्याचा आत्मा या ससाराच्या तुरुगांतून ! यापुढें त्याच्या येथील राखणदार पहारेकरी माणसाचा ताबा त्याच्यावर कितीसा चालेल ? साऱ्या जन्मभर त्याना खरा आत्मसतोष कधीं लाभला असेल किंवा नाहीं कोण जाणे !

गेल्या जन्मीं त्यानीं काय पापें केली होतीं तें चित्रगुप्तासच माहीत ! पण त्याचा अतही झाला विस्मयजनकच ! गेल्या दोन महिन्यांपासून त्याची प्रकृति पूर्वीइतकी चागली राहात नसे. मधून-मधून काहीं ना कांहीं दुखावयाचेंच, एखादे वेळेस तापही यावा. पण तसेंच गाडें धकत होतें. मी त्यांना वारवार म्हणावें कीं, कोणा चांगल्या वैद्याचे अगर डॉक्टराचें औषध घ्या. पण त्याच्या घरच्यांनीं कुठल्याशा बाईचें औषध त्याना सुरू केलें होतें. परवा त्या मागील परसांतल्या कुव्यावर पाणी काढण्यासाठीं गेल्या असता, एकाएकी त्याचा पाय घसरून त्या आंत पडल्या ! जिकडेतिकडे एकच हल्ला झाला. सगळीकडून लोक धावून आले. पण त्याना बाहेर काढेतों-पावेतों अदाजें अर्धा तास गेला. त्याच्या यजमानानीं दोन तीन डॉक्टरही ताबडतोब गोळा केले. पण एकदा कुडींतून प्राण गेल्यावर प्रत्यक्ष अश्विनीकुमार अवतरले तरी काय होणार ? मात्र तो सारा प्रकार पाहून मला तावे कवींच्या एका उत्कृष्ट काव्यपक्तीची वारवार आठवण होत होती—

'गेली ज्योति विझोनिया मग फुका फुका तयाला किती !'

तसें पाहिलें तर तो कुवा त्याच्या नेहमीच्या सरावातलाच होता. आज किततरी वर्षें इदिराबाई त्या कुव्यावर वापरत होत्या. मग काय खरोखरच अशक्ततेनें त्यांचा पाय घसरला, कीं त्यांनीं स्वतःच

मुद्दाम......कांहीं कल्पना चालत नाहीं बाई ! त्यांच्या त्याच जाणे काय खरें असेल तें.

किती हुशार होत्या त्या ! पुष्कळ नवीन गोष्टी शिकले मी त्यांच्याकडून. आमच्या येथें आल्या कीं कांहीं तरी वाचल्याशिवाय चैनच पडत नसे त्याना ! माझ्या सासूबाईंना सुद्धा कधींकधीं वाईट वाटत असे त्यांची एकदर स्थिति पाहून !

इंदिराबाई, तुमचा सहवास कसा विसरू? तुमच्यासारखी मैत्रीण मला आता कशी लाभेल ? कोठें हो असाल तुम्ही आता ? कुठेंही असला, तरी तुमचा आत्मा सुखातच असेल अशी माझी खात्री आहे. वन्स, मेल्यावर मनुष्याचे काय होतें हो ? तुम्ही इतक्या शिकलां आहा, पुष्कळ पुस्तकें वाचलीं, फिलॉसफीचा अभ्यास केला, तुम्हांला कळलें का हो मेल्यावर मनुष्य कोठें जातें तें ? तुम्हांला ठाऊक असेल तर मला जरूर कळवा ह. इंदिराबाई गेल्यापासून माझ्या मनाला फारच चुटपुट लागून राहिली आहे. आमच्या इकडे मीं विचारलें होतें, तर म्हणणें झालें कीं, ' मी कांहीं फिलॉसफी शिकलों नाहीं; मला काहीं तें ठाऊक नाहीं; आधीं जीवनाचें तर रहस्य कळू द्या, मग मृत्यूचें आपोआप समजेल ! '

आमच्या येथें आठ दिवसांपूर्वी एक जाहीर वादविवाद झाला. महात्मा गांधींचें तत्वज्ञान हा विषय होता. फार मौज आली मला त्या दिवशीं. बरेच जण चांगलें बोलले. कोणीं रशियातील कम्यूनिझमच्या दृष्टीनें महात्मा गांधींच्या विचारसरणीची छाननी केली; कोणीं उपयुक्ततावादाच्या (इंग्लिशमध्यें काय 'यूलिटिटेनिऑरिझम्' का काय असाच काहीं अगडबंब शद्ब आहे ना त्याला ? हसू नका हं ! मला अजून तो शद्ब बरोबर येत नाहीं ) दृष्टीनें चर्चा केली; तर कोणीं धार्मिक दृष्ट्या गांधींच्या विचारसरणीची प्रशंसा केली. एका

वक्त्यानें तर आपले म्हणणें फारच आवेशाने पुढें माडले, ते म्हणाले कीं, आज गाधी हिंदुस्थान देशांत इतके लोकप्रिय झाले आहेत याचे कारण त्याचा अहिंसामार्ग जनतेला खरोखर पटला आहे हें नसून, जनतेला याव्यतिरिक्त दुसरा मार्गच उपलब्ध नाहीं हें होय ! महान् व्यक्ति कांहीं अशाने कालाला कलाटणी देते हे खरे असले, तरी त्या व्यक्तीचे महत्वही कांहीं अंशानें कालावरच अवलबून असतें, असे त्यांनीं प्रतिपादन केलें. वन्स, तुम्हाला काय वाटतें याबद्दल ?

सवडीनें उत्तर पाठवावे. साक्षरता-प्रचाराच्या चळवळींत आमच्या केशवभाऊजी बरोबर तुम्हीही जो भाग घेत आहां त्याचा वृत्तात वाचून आम्हांला फार आनद होत असतो. वेळेचे सार्थक करीत आहां तुम्ही. तुमच्यासारख्या विद्वान स्त्रीला माझ्यासारखीने काय लिहावयाचें म्हणा ! पण अभिनदन केल्याशिवाय राहवत नाहीं.

कळावें. नात्याच्या मानाने मी मोठी असले तरी तुम्हाला ' आशीर्वाद ' असें मी लिहिणार नाहीं हें आपलें मागे ठरलेच होतें. सर्व वडील मंडळींस नमस्कार व लहानास आशीर्वाद.

तुमची,

**विमलावहिनी.** ८-१२-३७

---

## [६४] विवाहित्त आणि अविवाहित मातृत्व.

लखनौ श्री. मगळवार ता. १४-१२-३७.

ती. रा. रा. नानांस मनोहरचा साष्टांग नमस्कार वि. वि.

नंदिनीला मी कालच भेटलों होतों. आपण श्री. दसरे यांना भेटला असालच. नंदिनीची प्रकृति अद्याप ताळ्यावर आली नाहीं. अशक्तता फार आली आहे. ताप येतच असतो. खोकला कांहींसा कमी आहे. प्रसूतावस्था समीप आली आहे. तो प्रसग एकदा सुखरूप पार पडला

म्हणजे तिची प्रकृति सुधारणेच्या मार्गावर लागेल असें डॉक्टरांचें म्हणणें आहे.

आईची तिला फार आठवण येते. वडिलानीं तिला क्षमा करून परत घेऊन जावे अशी तिची फार इच्छा आहे.

बराच वेळ बसलो होतों मी तेथे काल. अनेक विषयावर तिनें माझ्याशीं चर्चा केली. माझीं विधानें पुष्कळ अशीं तिला पटत होतीं. बरीच चर्चा झाल्यावर मीं तिला म्हटले, " नदिनी, आता तरी पटले ना तुला, मातृत्व नेहमींच पवित्र नसतें म्हणून ? ज्या नेहमींच चागल्या असतात अशा गोष्टी मुळीं या जगात कितीशा आहेत ? मग मातृत्वच त्याला अपवाद कसे होईल ? योग्य निर्बंधपालनानतर प्राप्त होणारे मातृत्व जितकें पवित्र व आनददायक असते, तितकेंच अविचारानें प्राप्त होणारें मातृत्व अपवित्र व तापदायक असते. मातृत्व म्हणजे कांहीं खेळ का आहे ? इतर सर्व दृष्टी सोडून निवळ शारीरिक दृष्ट्या विचार केला, तरी ' मातृत्व हे नेहमींच पवित्र असतें, ' ' मातृत्व हें कधींच पापी नसतें ' असल्या विधानांतला घातकी उथळपणा स्पष्ट प्रतीत होईल. यांहून अधिक बेजबाबदार अनर्थकारी विधानें कधीं केलीं गेलीं असतील असें वाटत नाहीं. अग, मातृत्व जर नेहमींच पवित्र असतें तर वेश्यावृत्तीला नावें तरी कां ठेवावयाचीं ? मातृत्वाला एकदा चिरतन पवित्रत्वाचा पट्टा बहाल केला. म्हणजे ज्याचा परिणाम म्हणून ते प्राप्त होते तो स्त्रीपुरुषसबधही नेहमीं पवित्रच मानणें ओघानें येतेंच. पण वाटेल त्या स्त्रीचा वाटेल त्या पुरुषाशीं सबंध आला तरी तो पवित्रच मानला पाहिजे, हें विधान इतकें उघड-पणे मूर्खपणाचें आहे कीं, कोणीही समजस माणूस त्याला सम्मति देणार नाहीं. अनिर्बंध स्त्रीपुरुषसबंधानें जे शारीरिक, कौटुंबिक, सामाजिक अनर्थ ओढवतील त्याची कल्पना तुला देखील सहज करता येईल.

पण वर्तमानकाळीं महाराष्ट्रांत अशाही प्रमेयांचा कधींकधीं चाललेला पुरस्कार पाहिला म्हणजे हृदय उद्वेगानें भरून येतें. मी म्हणतो, नंदिनी, अशा लोकांशीं काहीं वादविवाद करणेंच एका दृष्टीनें व्यर्थ आहे. यांना एकच सांगावेसें वाटतें, आणि ते हें कीं, असल्या प्रमेयाचे प्रयोग प्रथम आपण आपल्या आप्तेष्टांच्या बाबतींत करून पहा आणि नतर तीं समाजापुढें मांडा ! असें केल्यानें तुमच्या मताची सत्यता हमखास सिद्ध न झाली, तरी तुमची सचोटी तरी जगाला दिसेल ! ”

“ भाऊसाहेब, खरें आहे तुमचें म्हणणें. पण तरीही मला वाटतें कीं, आपल्या देशांत एकदरींत पुरुषवर्गाकडून आम्हा स्त्रियावर फार अन्याय होत असतो. मातृत्व जर नेहमींच पवित्र नसतें तर पितृत्व तरी नेहमीं पवित्र थोडेंच असतें ? पण वाकडें पाऊल टाकणाऱ्या किती पुरुषांना समाज शिक्षा करतो ? स्त्रीच्या विरुद्ध मात्र त्याची हत्यारें नेहमींच उगारलेलीं असतात ! सारख्याच परिस्थितींत एकाला एक न्याय आणि दुसऱ्याला दुसरा न्याय हे तुम्हांला समर्थनीय वाटतें का ?” नंदिनीनें धीटपणें विचारलें.

“ अगदीं योग्य शंका विचारलीस तू !” मीं उत्तर दिलें, “ अशाच विधानांचा आधार घेऊन जनतेसमोर भलभलत्या विचारसरणी मांडण्यांत येतात. पण, नंदिनी, पहिली गोष्ट म्हणजे पुरुषांना आपला समाज सर्व अनाचार माफ करतो हें विधान दिसतें तितकें खरें नाहीं. कुमार्गी पुरुषाची समाज हेतुपुरःसर स्तुती करीत नाहीं. आतां इतकें खरें कीं, स्त्रीचा अनाचार लवकरच दिसून येतो तसा पुरुषाचा दिसून येत नाहीं; पण याची जबाबदारी समाजावर नसून निसर्गावर आहे. परंतु, नंदिनी, आपण हें सर्व बाजूस ठेऊन तुझा समाजावरील आरोप पूर्णांशानें मान्यही केला तरी त्यापासून निष्पन्न काय होतें ? अनाचाराचीं द्वारें स्त्रियांना बंद असून पुरुषानाच खुलीं असतील, तर यावर उपाय

तीं द्वारें स्त्रियांकरिताही उघडीं करणें हा नसून पुरुषांनाही तीं बद करणें हाच होय ! अनाचारी स्त्रीप्रमाणेच अनाचारी पुरुषही तिरस्कार्य मानला पाहिजे, अशासाठीं तू चळवळ सुरु केली तर मी पूर्ण पाठिंबा देईन. पण पुरुष अनाचार करतात म्हणून आम्हालाही तो करू द्या असा आग्रह धरणें, म्हणजे राष्ट्राचा एक भाग देशद्रोही झाला म्हणून दुसऱ्याही भागाने त्याचें अनुकरण करूं पाहण्याइतकेंच सूज्ञपणाचें होईल ! समता पाहिजे, पण ती पाप करण्यात नव्हे, पापाच्या बाबतींत विषमताच बरी ! पण इतका विचार करतो कोण ? समतेच्या नावाखाली उभयतानींही अनाचार आरभावयाचा, आणि समाजाचें तारू रसातळाला न्यावयाचें ! '

हें सर्व सभाषण आपल्यास सविस्तर लिहून कळविण्याचा उद्देश मालतीला हे उद्बोधक वाटेल हाच होय. ती येथें असताना नदिनीच्या खटपटीनें येथें झालेले ' उद्यांचा ससार ' हें नाटक तिनें पाहिलें होतें, व त्या अनुरोधानें मालती व सुशिला यानीं माझ्याशीं काहींशी चर्चाही केली होती. म्हणून त्या सबधांत या पत्रांतलीं हीं प्रश्नोत्तरे मालतीला उद्बोधक वाटतील असा मला विश्वास वाटतो.

शेवटीं नदिनीने एक महत्वाचा प्रश्न विचारला. ती म्हणाली, " अविवाहित अनिर्बंध मातृत्वाच्या कल्पनेनें समाजांत नाना प्रकारचे अनर्थ घडून येतील हें मला आता पटतें. पण विवाहित मातृत्व तरी नेहमींच चागलें असतें का ? विवाहित व अविवाहित हा भेद तरी मानवनिर्मित म्हणूनच अपूर्ण नाहीं का ? "

प्रश्न सूक्ष्म विचाराचा निदर्शक होता. तो उपस्थित केल्याबद्दल प्रथम नदिनीचें मनःपूर्वक अभिनदन करून मी तिला उत्तर दिलें, " नंदिनी, नीतिशास्त्राच्या कांटेतोल रीतीने बोलावयाचें झाल्यास, विवाहित मातृत्व नेहमींच पवित्र असते असें म्हणता येणार नाहीं.

अविचारानें प्राप्त झालेलें मातृत्व, मग तें विवाहित कायदेशीर परिस्थितींत उगम पावलें असले तरी, नीतिदृष्ट्या अपवित्रच ठरेल. कामांधतेनें पत्नीवर तिच्या इच्छेविरुद्ध मातृत्व लादणारा पति कायदेशीर रीत्या दोषी नसला, तरी नीतिशास्त्राच्या न्यायालयांत वैवाहिक बलात्काराच्या सदराखालीं गुन्हेगार ठरल्यावाचून राहणार नाहीं, आणि त्याबरोबरच स्वतःच्या शारीरिक व इतर परिस्थितीचा विचार न करता स्वेच्छेनें स्वतःवर पतीकडून मातृत्व लादून घेणारी पत्नीदेखील त्या न्यायालयांत दोषासच पात्र ठरेल. मातृत्व हे नेहमींच पवित्र असते या विधानाचा मी जितका अधिक विचार करतों, तितके तें मला उगाळलेल्या कोळशाप्रमाणें अधिकाधिक काळें भासू लागते ! '

' पण मग विवाहित मातृत्व सुद्धा जर नेहमींच पवित्र नसतें तर अविवाहित मातृत्वावरच समाजाचा इतका कटाक्ष का ? ' तिनें मध्येंच विचारिलें.

' होय, मी याच प्रश्नाकडे वळत होतो. ' मी म्हटलें ' याचें उत्तर असें आहे कीं, समाजानें व्यक्तीच्या जीवनांत हस्तक्षेप करण्याच्याही कांहीं मर्यादा आहेत. जेथें समाजाचा हात पोचत नाहीं तेथें निसर्गाचा हात आहेच. निसर्गाच्या काकदृष्टींतून व्यक्तीचे कोणतेही कृत्य—तें कितीही सूक्ष्म असो—सुटणें शक्य नाहीं. समाज फक्त ढोबळ घटनाकडेच पाहू शकतो; जेथें सामाजिक स्थैर्याला विशेष धक्का पोचण्याचा संभव असेल तेथेंच तो दखल देतो. इतर बाबतींत समाजाकडून व्यक्तीला मोकळीक असते. या स्वतंत्रतेचा दुरुपयोग केला तर व्यक्तीला निसर्गाकडून तडाखे बसतात, व सदुपयोग केला तर व्यक्तीची उन्नति होते. अविवाहित मातृत्वामुळें माजणाऱ्या घोटाळ्यांनीं समाजाची घडी अल्पावधींतच बिघडण्याचा फार संभव असल्यानें, समाज त्याला सर्वसाधारणपणे त्याज्य समजतो. आतां विशिष्ट

प्रसंगीं याला एखादा न्याय्य अपवाद असू शकेल, पण त्या अपवादानें नियमाला बाधा येत नाहीं. समाजाला—त्यांतील बहुसंख्याक व्यक्तींना—सुपरिणामी मातृत्व व दुष्परिणामी मातृत्व यातला भेद स्पष्ट करण्यासाठींच समाजानें विवाह ही एक सीमा आखून दिली आहे. विवाह ही बेडी किंवा शृंखला नसून समाजाला आणि व्यक्तीला अहितापासून वाचविणारा संरक्षक पट्टा आहे. आता काहीं जण या विवाहसंस्थेचा दुरुपयोग करून स्त्री-जातीवर अन्याय करतात हे खरें, तसेच विवाह जमविण्याच्या वर्तमान पद्धतींतील काहीं दोषामुळें विवाहाचा मूळ उद्देश काही प्रसंगी सफल होत नाहीं हेही खरे. पण यावर इलाज म्हणजे विवाहसंस्थेच्या इमारतींत इष्ट फेरबदल घडवून आणणे हा आहे, ती समूळ उध्वस्त करणे हा नव्हे !······ ”

मी आणखी किती वेळ बोलत राहिलो असतो कोणास माहीत ! पण तितक्यात नर्सने नंदिनीकडे पाहून मला सूचना केली. बराच वेळ बसल्याने तिला ग्लानि आली होती. थोड्याच वेळाने मी चालला आलों.

कळावे, श्रुत होय हे विज्ञापना. आपला बंधू,

मनोहर.

[६५] सत्याचा जय.

## प्रभाकर

( अग्रेसर मराठी साप्ताहिक ) : संपादक व प्रकाशक गो. म. डोळे.

पार्वतीपूर, गुरुवार, मार्ग. शु. १४ शके १८५९, ता. १६-१२-१९३७



**पत्रकर्त्यांच्या स्फुट सूचना.**

एका अनिष्ट प्रकरणाचा गोड शेवट !

कांचनपूरचे श्री. मुरलीधरपंत एकबोटे याचे विरुद्ध ‘ चंदी ’ नामक भगिणीनें तेथील फौजदारी कोर्टांत मारामारीबद्दल दाखल

केलेल्या फिर्यादीचा नुकताच गेल्या आठवड्यात जो अनपेक्षित शेवट झाला, त्याचा वृत्तात या अंकांत इतरत्र प्रसिद्ध झालाच आहे. तो वाचून आमच्याप्रमाणेंच आमच्या वाचकानाही एका अनिष्ट घटनेवर इष्ट प्रकारें पडदा पडल्याबद्दल आनद होईल, असा आम्हाला विश्वास वाटतो. गतवर्षी कार्तिकी एकादशीचे उत्सवप्रसगीं, क्षुल्लक कारणावरून राग येऊन, श्री. एकबोटे यांनीं सदरहू हरिजन स्त्रीस मारहाण केल्याने या भानगडीस प्रारंभ झाला हें वाचकास स्मरतच असेल. नामस्मरणासारख्या पवित्र उत्सवसमारभातून असलीं कुलगडीं बाहेर पडावीं हें सर्वतोपरी खेदकारकच म्हणावयाचें ! पुढें श्री. एकबोटे यांना त्या स्त्रीस शिवीगाळ करून जखमेवर मीठ चोळण्याची बुद्धि दुर्दैवेंकरून झाल्याचें कोर्टासमोर आलेल्या पुराव्यावरून दिसून येतें. यामुळें हें प्रकरण चिडीस जाऊन कोर्टाची पायरी चढण्यापावेतों मजल गेली ! या गरीब स्त्रीतर्फे श्री. माधवराव मुद्रे हे तरुण वकील स्वार्थत्यागपूर्वक काम चालवीत होते. तक्रारीची रीतसर चौकशी चालू असतां, मध्यतरीं या दलितसेवेबद्दल बक्षीस म्हणून कीं काय श्री. मुद्रे याचेवर एके दिवशीं सायकाळीं चोरून हल्लाही करण्यात आला, पण ईश्वरकृपेने विशेष दुखापत न होतां ते त्यातून बचावले. या भ्याडपणाच्या हल्ल्याच्या मुळाशीं कोणाचा हात होता हें आम्हाला विश्वसनीय व साधार रीत्या माहीत असलें, तरी श्री. मुद्रे यांनींच त्या आगतुक भानगडीस महत्त्व न देण्याचें ठरविल्यानें आम्हीही त्यासंबधांत कांहीं लिहूं इच्छीत नाहीं.

* * * *

बरेच दिवस फिर्याद रेंगाळून अलीकडे नुकताच उभय पक्षांचा पुरावा संपला होता. या प्रकरणानें इतकी मजल गांठल्यानंतर, गेल्या आठवड्यांत एकाएकीं श्री. मुरलीधरपंत एकबोटे यांनीं फिर्यादी स्त्रीला

उद्देशून सपशेल दिलगिरी व्यक्त केल्याने तिनें फिर्याद काढून घेतली, आणि कांचनपुरात व इतरत्रही बऱ्याच गाजलेल्या या प्रकरणाचा एकदाचा समाधानकारक निकाल लागला ! उशिरा का होईना, पण श्री. एकबोटे याना शेवटीं आपली चूक कळून आली व ती त्यानीं उघडपणें मान्य केली याबद्दल आम्ही त्याचे अभिनंदन करतो. जुन्या परपरेच्या कर्मठ व्यक्तींतही खात्रीनें अनेक समाजोपयोगी गुण आहेत. दुर्दैवाने आतापावेतो या गुणाचा उपयोग बहुधा दुराग्रहाकडेच जास्त झाला आहे. आता यापुढे तरी अशा व्यक्तींनीं कालमान व परिस्थिति ओळखून, आपल्या अगच्या सद्‌गुणाचा खऱ्या देशकार्याकडे व्यय करण्याचा निश्चय केला, तर इतराच्याप्रमाणे याच्याही हातून देश-सेवेचीं मोठमोठी कार्यें पार पडतील यात तिळमात्र सशय नाहीं. मात्र, याप्रसगीं श्री. एकबोटे याचे अभिनदन करताना, त्याबरोबरच त्यानीं दिलगिरी व्यक्त करताच, अधिक ताणून न धरता फिर्याद काढून घेण्यात, या निरक्षर हरिजन स्त्रीने मोठमोठ्या शिक्षित व्यक्तींनाही धडा घेण्यासारखें जें उदाहरण घालून दिले आहे, त्याबद्दल तिचेंही मनःपूर्वक अभिनदन केल्यावाचून आमच्याने राहवत नाहीं. श्री. मुद्रे याचेबद्दल काय लिहावयाचे ? दलित वर्गाची निरपेक्ष सेवा करण्याचें त्यानीं हातीं ककण बाधले आहे, आणि या प्रकरणांत तर आत्म-क्लेशापावेतो पाळी येऊन त्याची खरी सेवावृत्ति चागलीच कसोटीस लागली ! पण त्यात ते किती पूर्णतेने उतरले हें आता सर्वास माहीतच आहे. जनता या एकदर प्रकरणापासून योग्य तो बोध घेईलच. इतर वर्णीयाप्रमाणें हरिजनांनाही स्वाभिमान व अब्रूची चाड आहे, इतकी जरी जाणीव सर्वांना झाली तरी वाइटातूनही चागलें निपजल्याचें एक उत्तम उदाहरण जगासमोर राहील !

## [६६] कायदा आणि माणूस.

लखनौ, सोमवार ता. २०–१२–३७

प्रिय मैत्रीण मालतीस—

मागे मीं तुला सप्टेंबर महिन्यात पत्र पाठविले होते, तेव्हांपासून कितितरी पाणी गंगेवरच्या पुलाखालून वाहून गेले आहे ! त्यावेळेस मीं तुला कोणत्या मनस्थितींत पत्र लिहिले याचा विचार मनात आला म्हणजे किती शरम वाटते म्हणून सांगू ?

आज मी तुला हे पत्र लिहिण्यास उद्युक्त झाले, याचें एकमेव कारण म्हणजे तुझ्या प्रेमळ काकांनीं मला दिलेले उत्तेजन व आश्वासन ! मालू, तुम्ही सगळे मला क्षमा करून तुमच्यामध्यें परत नाहीं का ग घेणार ?

तुझ्या काकाबद्दल तरी मी मागे किती वाईट बोलत आणि लिहीत होतें ! आणि आज—आज त्याच्या सहानुभूतीशिवाय माझी येथें काय दशा झाली असती याची कल्पनासुद्धा करवत नाहीं. खरा मित्र कोण आणि खरा शत्रू कोण हें मला आता अनुभवाने चांगलें कळून आले आहे. पण व्हायचें तें तर होऊन गेलें, आता या पश्चात्बुद्धीचा काय उपयोग ?

आणि मीं निराशेनें असे उद्गार काढले कीं तुझे काका म्हणतात, ' नंदिनी, असें कोणतें पाप आहे कीं, जे शुद्ध पश्चात्तापाच्या पवित्र अश्रूंनीं धुवून निघणार नाहीं ? प्रत्येक साधुपुरुषाच्या मागे विपरीत भूतकाळ सांपडेल; आणि प्रत्येक पाप्याच्या पुढे उज्वल भविष्यकाल सापडेल. मनाचा निश्चय मात्र पाहिजे. '

किती आशादायक आहेत हे शब्द ! मालती, आजपावेतों स्त्रियांवर होणाऱ्या अन्यायाच्या एकांगी चित्राच्या उन्मादक भडकतेनें माझें मन भारलें गेलें होतें. आता मला समजले आहे कीं, पतिताला

सहानुभूतीनें वागविणें हें जसें समाजाचें कर्तव्य आहे, तसेंच स्वतःचें पातितत्व कबूल करणे हें त्या पतिताचेही कर्तव्य आहे.

असेंच बोलतां बोलता एकदा मीं तुझ्या काकांना म्हटलें, ‘भाऊसाहेब, कायदे माणसांसाठीं आहेत, माणसें कायद्यासाठीं नाहींत, हें तर तुम्हांला पटतें ना? पूर्वी मी यावरच जोर देऊन माझें समर्थन करीत असे. आतां मला माझें पूर्वीचें कृत्य जरी चूक दिसत असलें, तरी या विधानाचें स्मरण झाले म्हणजे अजूनही मनाचा घोंटाळा होतो.’

आणि याला त्यानीं जें सुदर उत्तर दिलें तें मी कधींही विसरणार नाहीं. ते म्हणाले, ‘माणसे कायद्यासाठीं नसून कायदे माणसासाठीं आहेत हें अगदीं खरें. पण त्याबरोबरच हें देखील ध्यानांत असू दे कीं, कायदे मनुष्याच्या समाजासाठीं आहेत, वैयक्तिक मनुष्यासाठीं नव्हे! कितितरी लोक हे विसरतात. एखादा कायदा बहुजनसमाजालाच बाधक होऊ लागला, किंवा बहुजनसमाजाचें कोणतेही खरें हित न साधतां, विनाकारण काहीं व्यक्तींना बाधक होऊ लागला तर कायदे मनुष्यासाठीं आहेत असें म्हणून तो कायदा झुगारून देणें रास्त ठरू शकेल. विधवाविवाहप्रतिबधक नियमाला किंवा अस्पृश्यतापालनाच्या नियमाला याच कारणासाठीं विरोध करणे सयुक्तिक म्हणता येईल. पण म्हणून, जो कायदा अगर नियम समाजांतील बहुसख्याकाच्या दृष्टीने हितकारक आहे, तो केवळ काहीं व्यक्तींच्या स्वार्थाला आडवा येतो म्हणून बदलूं पाहणें शहाणपणाचें होणार नाहीं. कोणताही कायदा अगर नियम घेतला तरी त्याच्यामुळे ज्यांची कुचंबणा होते अशा कांहीं थोड्यातरी व्यक्ती आढळतीलच. आज प्रचलित असलेल्या नियमांच्या विरुद्ध कंठशोष करणाऱ्या टीकाकाराना दुसरे नवीम नियम सुचविण्यास सांगा; म्हणजे त्या नवीन नियमाच्या विरुद्ध देखील तितकाच कठशोष करणारीं दुसरीं माणसें दृष्टोत्पत्तीस येतील! म्हणून,

कायद्याची इष्टता ठरविताना बहुजनसमाजाचें हित हीच खरी कसोटी मानली पाहिजे, कांहीं व्यक्तींचे सुखदुःख ही त्याची कसोटी नव्हे.'

"पण मग बहुजनसमाजाच्या दृष्टीने एखादा नियम प्रस्थापित झाल्यावर त्याला अपवाद पाडण्याचा कोणाही व्यक्तीला कोणत्याच परिस्थितींत हक्क नाहीं काय? व्यक्तीला आपल्या कायद्याच्या लोखंडी टाचेखालीं भरडून काढण्याचा समाजाला कितपत् अधिकार पोचतो?" मीं विचारलें.

"अपवादाचा एकदर प्रश्न बराच कठीण आहे. पण अपवादात्मक परिस्थितीचा बागुलबोवा पुढें करून, सामाजिक नियमावर हल्ला चढविणारे उथळ टीकाकार या प्रश्नाकडे पुरेसें लक्ष देत नाहीं, आणि मग कांहीं तरी नवीन मताचा प्रसार केल्याचा आव आणू पाहतात. बहुजनसमाजाच्या हिताच्या दृष्टीनें एखादा नियम मान्य झाल्यावर त्याला अपवाद मुळींच होऊ शकणार नाहींत असे नाहीं. पण पहिली गोष्ट म्हणजे, या अपवादाचा उगम व्यक्तीच्या हीन स्वार्थबुद्धींत नसला पाहिजे; अशा उगमाच्या अपवादाना नियमाच्या विरुद्ध कांहीं महत्व नाहीं. सामाजिक नियमाच्या विरुद्ध ओरड करणाऱ्या कित्येकांचीं विधानें याच सदरांत पडतील. स्वतःच्या वैयक्तिक स्वार्थासाठीं सॉक्रेटीसने कायदे मोडणें नाकारल्याचे सुप्रसिद्धच आहे. पण कांहीं विशिष्ट प्रसगीं उच्च निस्वार्थी दृष्टीनें विचार करतां, नेहमींच्या नियमाला अपवाद मानावा लागतो यांत शंका नाहीं. स्वतःच्या हीन स्वार्थासाठीं सत्यवचनाचा नियम मोडणें निराळें; आणि स्वतःचा यत्किंचितही स्वार्थ नसतांना इतरांचा प्राण वाचविण्यासाठीं खोटें बोलणें निराळें. या दुसऱ्या प्रसगीं सर्वसाधारण नियमाला अपवाद मानणें योग्य ठरलें, तरी हें केव्हांही लक्षात ठेवलें पाहिजे कीं, अशा न्याय्य अपवादामुळें देखील मूळ नियमाच्या पवित्रतेला

मुळींच बाधा येऊ शकत नाहीं. शहाणा मनुष्य अशा अपवादात्मक प्रसगीं नियम मोडूनही हेंच म्हणेल कीं, सर्वसाधारणपणें नियम, पाळलाच पाहिजे. इब्सेनच्या ' ए डोलूम् हाउस् ' मधील 'नोरा'नें पतीचा केलेला त्याग समर्थनीय वाटला, तरी सूज्ञ टीकाकार पत्नीनें पतीचा केलेला त्याग केव्हाही चागला होय असें म्हणणार नाहींत; उलट, ते हेंच म्हणतील कीं, या विशिष्ट परिस्थितींत ' नोरा'चें कृत्य योग्य असलें तरी सर्वसाधारणपणें समाजात पत्नीनें पतीजवळ राहणेंच हिताचें आहे. आपल्या महाराष्ट्रांत मात्र अपवादावरून सरसकट नियमच उध्वस्त करूं पाहण्याची आणि नवीन नियम घालू पाहण्याची अविचारी प्रवृत्ति, वर्तमानकाळीं लोकप्रियतेच्या मागे हात धुऊन लागलेल्या कित्येक साहित्यिकांचे ठायीं दिसत आहे, ही खरोखर फार उद्वेगाची गोष्ट आहे ! '

मालती, तुझ्या काकांचे हे शेवटचे अतःकरणापासून निघालेले उद्गार मला आता फारच यथार्थ वाटतात. एकदर सभाषणापासून मला इतका आनंद झाला कीं, तुला तें लिहून पाठविल्याखेरीज माझ्याच्यानें राहवेना ! म्हणून डॉक्टराना नकळत मी आज तीन दिवसापासून थोडेथोडें लिहून आज हें सपूर्ण पत्र तुजकडे पाठवीत आहे. याच उद्गारांकडे योग्यसमयीं मीं लक्ष पुरवून भलभलत्या मतांच्या आकर्षकतेला बळीं पडले नसतें तर !

आतां जास्त लिहवत नाहीं मालू, पत्राचे उत्तर लवकर पाठव, म्हणजे या परिस्थितींतही मला बरें वाटेल. आणखी, आईला साग कीं, तुझी पूर्वीची—कीं मध्यतरीची ?—नदिनी मेली, आता दुसरी नंदिनी तिच्या ठिकाणीं आली आहे, ही तुला खात्रीने सुख देईल.

तुझी मैत्रीण,

नंदिनी दसरे.

## [६७] मैत्रिणीस उपदेश.

पार्वतीपूर श्री. शुक्रवार ता. २४-१२-१९३७

प्रिय मैत्रीण नंदिनीस सप्रेम नमस्कार वि. वि.

फार दिवसांनीं आलेलें तुझें तारीख वीसचें पत्र मिळालें. मजकूर वाचून फार दुःख झालें; आणि त्याबरोबरच फार आनदही झाला! दुःख तुझ्या हल्लीच्या प्रकृतीबद्दल आणि आनंद तुझ्या हल्लीच्या विचारांबद्दल! तुझ्याविषयीं कांहीं कांहीं माहिती अलीकडे माझ्या काकाच्या पत्रांतून कळत होती. पण तुझ्या पर्वाच्या पत्रामुळे तुझ्या हल्लीच्या विचारसरणीचें तुझ्याच शद्बात ज्ञान झाले.

नंदिनी, आतां तू लवकर बरी हो म्हणजे झाले. आम्ही सर्वजण तुझी येथें वाट पहात आहों. याबद्दल तू काळजी करू नकोस. अग, चुका कोणाच्या हातून होत नाहींत? अंतःकरणपूर्वक पश्चात्ताप होऊन आपली चूक कबूल करणें, आणि ती पुन्हा न होऊ देण्याचा प्रयत्न करणें हाच स्वतःच्या चुकीनें प्राप्त झालेल्या अनिष्ट परिस्थितींतून बाहेर पडण्याचा राजमार्ग होय. नुकतीच मी समग्र गीता वाचली. (फिलॉसफी विषय घेऊन बी. ए. पास झालें, पण गीतेचें एक अक्षरही माहीत नव्हतें! किती लज्जास्पद ही स्थिति!) फार आनद आला ती वाचण्यात. तुझें पत्र वाचल्यावर गीतेच्या नवव्या अध्यायांतल्या पुढील श्लोकाचे स्मरण झालें मला एकदमः

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्।
साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥

नंदिनी, हा श्लोक तू लक्षांत ठेवशील तर तुझे दुःख पुष्कळ हलकें होईल.

मागे मी तेथें आलें असतांना तुझ्याशीं पूर्वींप्रमाणें मोकळ्या मनानें बोललें नाहीं याची क्षमा कर. त्यावेळची तुझी रहाणी आणि

विचारसरणी मला मुळींच आवडत नसे आणि तुझ्याशीं वादविवाद करून त्यात बदल घडवून आणण्यास मी समर्थ आहे असे मला वाटत नसे. कित्येकाच्या आयुष्यात अशी एक वेळ येते कीं, इतरांनीं कितीही नको नको म्हटले तरी, आत दगड भरलेलें पोतें वेगानें समुद्रतळाशीं जावें त्याप्रमाणें, ते एकसारखे स्वतःच्या अधःपाताकडेच जाऊ लागतात. आणि याचें फळ भोगण्याची पाळी आली म्हणजे मात्र भलभलतीं समर्थनें पुढें करतात. अशा लोकाशीं वादविवाद करणेंही व्यर्थ होऊन बसतें. ' उद्याच्या ससारा'तील 'शैले'च्या स्वखुशीच्या कौमार्यभगाचें जेव्हा ' प्रवृत्तीच्या मोहाच्या ' नांवाखालीं तूं समर्थन करू लागलीस, तेव्हा यासाठींच मीं तुझ्याशीं वादविवाद केला नाहीं. जाणुनबुजून, उघड्या डोळयानीं, सूज्ञ लोक दुसरा इष्ट मार्ग सुचवीत असता, मूर्खपणाचे वर्तन करावयाचे, आणि 'प्रवृत्तीच्या मोहा' आड लपावयाचें ! आणि मग जे त्या चुकीच्या कृत्याला चूक असे स्पष्ट म्हणतात, त्याच्यावर लाथा झाडायच्या ! अग, अशा प्रवृत्तीच्या मोहानें तर सारेच गुन्हे होतात. चोर चोरी करतो ती तरी कशाकरितां ? खुनी मनुष्याला कोण खून करायला लावतें ? धाडेती धाडा पाडतो तो कशामुळें ? आणि एखादा नरपशू बलात्कार करतो, तो काय 'प्रवृत्तीच्या मोहामुळें' नव्हे ? कोणाकोणाचे गुन्हे माफ करणार तुम्ही ?

समाज म्हणजे तरी काय ? आपल्यासारख्या व्यक्तींचाच समाज होतो. हा समाज कधींकधीं चुका करतो यात शका नाहीं. पण स्वतःच्या कृतीची निर्विकारबुद्धीनें छाननी करून तिच्यांतले गुणदोष ठरविण्याऐवजी, उठताबसता सामाजिक निर्बंधांवर सारा दोष लादण्याची ही पद्धति सोडून, भगवतांच्या पुढील अमूल्य उक्तीकडे जर योग्य लक्ष देण्यांत येईल, तर पुष्कळशा वर्तमान सामाजिक 'उद्धारका'चें व त्याच्या भक्ताचें भलें होईल ! गीतेच्या सहाव्या

अध्यायात श्रीकृष्ण म्हणतात—

उद्धरेदात्मनात्मान नात्मानमवसादयेत् ।
आत्मैवह्यात्मनो बधुः आत्मैव रिपुरात्मनः ॥

नदिनी, मानवी जीवनातले प्रश्न वरवर पाहता कित्येकाना जितके सोपे भासतात, तितके ते खरोखर सोपे नसतात असें मला आता आढळून आलें आहे. आणि म्हणूनच एखाद्या आकर्षक परतु उथळ विचारसरणीचा अवलब केल्यास त्याचे विपरीत परिणाम भोगावे लागतात. खरा वैरी आणि खरा कैवारी यात आपण पुष्कळ वेळा घोटाळा करतो ग, वैरी कैवारी भासतो आणि कैवारी वैऱ्या-प्रमाणें वाटतो ! स्वतःच्या अनिर्बंध चैनीसाठीं आम्हा स्त्रियांवर फाजील निर्बंध घालणारे जसे आमचे वैरी, तसेच आम्हाला पूर्ण अनिर्बंधावस्थेचा आकर्षक मार्ग दाखविणारेही आमचे कट्टे वैरी होत हें तू पक्के समज. मग यापैकीं कोणी वैऱ्याच्याच उग्रड रूपात येवो, किंवा कैवाऱ्याचे सोग घेऊन येवो.

तू येथे सत्वर बरी होऊन येशील असा मला पूर्ण विश्वास वाटतो. तुझ्या बुद्धीची, तडफदारपणाची, कलात्मकतेची, स्वतत्रबाण्याच्या वृत्तीची आज आमच्या समाजाला फार आवश्यकता आहे. तू तुझे हे गुण समाजकारणीं लाव अशी मी तुला आग्रहाची विनति करते, आणि मग जो ईश्वर आज तुजवर कोपलेला दिसत आहे तोच तुझ्यावर प्रसन्न झालेला दिसून येईल ! मला खात्री वाटते कीं, तुझ्या अगच्या गुणांमुळे इतर किती तरी समाजसेविकांपेक्षा तू श्रेष्ठ कार्य करू शकशील. इतरांच्या कल्याणासाठीं तू एकदा कष्ट सोसूं लागलीस म्हणजे खऱ्या सात्विक आनदाचीही तुला ओळख पटेल. सुखाच्या मार्गे लागलें कीं तें लांब लाब पळते, सेवा हे ध्येय ठेवले कीं खरें सुख आपोआप प्राप्त होतें. अर्थात् सुखाची आवड आणि स्वार्थपरायणता

हीं सामान्य व्यक्तीच्या जीवनातून पूर्णपणे नाहींशीं होणें हें सोपें नाहीं, पण काहीं वेळ जरी इतराच्या सेवेत गेला तरी पुष्कळ कार्यभाग होईल.

मी हल्ली येथें साक्षरता प्रचाराच्या कार्यांत भाग घेत असते. तितका वेळ फार चागला जातो. श्री. केशवराव दाते हे येथील एक विद्वान, उत्साही, सुस्वभावी, तरुण गृहस्थ यात फार मेहनत घेत असतात. त्यासबधात त्याच्या कार्यपद्धतीकडे पाहिलें म्हणजे मनाला सेवा करायला अधिक उत्साह प्राप्त होतो !

येथें आल्यावर तुझी इच्छा झाली तर तूही आम्हाला यात मदत कर. मात्र समाजसेवेच्या याच मार्गाबद्दल आमचा दुराग्रह नाहीं. समाजाचे खरे हित साधण्याचा आणखी एखादा मार्ग तुला पसत असेल तर तू त्याचा अवलब कर. माझे म्हणणे इतकेच कीं, श्रीभगवतानीं सागितलेलें पुढील वचन नेहमीं लक्षात असू द्यावे,

सहयज्ञाः प्रजा सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।
अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥

मात्र इतराची स्वार्थनिरपेक्ष सेवा हाच श्री. केशवराव दाते याचेप्रमाणें मी देखील वर्तमानकाळांतला यज्ञाचा खरा अर्थ होय असें समजते.

कळावें, लोभ असू दे ही विनति. तू लवकर निघून ये. तुझी अलीकडील हकीकत वाचून तुला केव्हा एकदा भेटेन आणि मोकळया मनानें बोलेन असें मला झाले आहे. मध्यतरीच्या त्या अप्रिय घटना विसरून मी तुझी—माझ्या पूर्वीच्या प्रिय बालमैत्रिणीची—आतुरतेनें वाट पहात आहे, ही तूं खात्री बाळग प्रकृतीची फार काळजी घे आणि मलाही कुशल कळवीत जा.

तुझी प्रिय मैत्रीण,

**मालती कोपरे.**

## [६८] आईची आठवण.

तार ( मराठी भाषांतर )

लखनौ ता. २६-१२-३७

व्ही. एस. दप्तरे, पार्वतीपूर, यांस

नंदिनी काल प्रसूत होऊन मुलगा झाला, तिची प्रकृति अत्यवस्थ आहे, आईला आठवते, ताबडतोब पाठवावें. —सुरेश.

---

## [६९] अर्भकाचे शाप !

लखनौ ता. १०-१-३८

( नंदिनीच्या सांगण्याप्रमाणें मीं हें पत्र लिहून काढलें आहे.
—सुरेश दप्तरे )

प्रिय मालतीस—

तुझें पत्र कांहीं दिवसांपूर्वी आलें तें पोंचलें. मध्यंतरीं मी इतक्या प्राणसंकटांतून गेले कीं, माझा मानसिकच नव्हे तर शारीरिकही पुनर्जन्म झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणून तुला उत्तर लिहून पाठविण्यास उशीर होत आहे. आता देखील फार अशक्तता असल्यानें मी हें पत्र दादाकडून लिहवीत आहे.

प्रथम दादा व नंतर आई येथें आल्यानें मला आतां या दुःखांतही फार बरें वाटतें. किती प्रेमानें धांवत आली आई माझ्या-जवळ ! माझी प्रकृति बरी झाली कीं, तेथेंच घेऊन येण्याबद्दल आईनें बाबांची परवानगी घेऊन ठेवली आहे. मालू, आता होईन का ग मी बरी यातून ?

तुझें पत्र वाचून फार आनंद झाला. मी तेथें आले म्हणजे तुझ्या त्या साक्षरता चळवळींत अवश्य भाग घेईन. दुःखावर सेवा हाच खरा उतारा आहे हें मलाही आतां मनापासून पटतें. प्रेमभंगाचें दुःख

दारूच्या प्याल्यांत बुडवून आयुष्याचा अंत पाहण्याच्या बाष्कळ बडबडीचें घाणेरडें चित्र मला आता अत्यंत तिरस्कार्य वाटूं लागलें आहे ! त्यांत ना आदर्श ना वास्तवता !

तुम्हीं सर्वांनीं माझे पूर्वीचे अपराध विसरून सहानुभूतीचें व प्रेमाचें जें सिंचन चालविलें आहे त्यानेंच, मला वाटतें, मी जगत आहे. येऱ्हवीं या दारुण परिस्थितींत माझा कितपत टिकाव लागला असता याची वानवाच वाटते.

माल्, गेल्या दोन अडीच महिन्यापासून माझ्या मनावर जे प्रचंड धक्के बसत आहेत त्या सर्वांवर नुकताच कळस चढवला गेला ! अविचारी मातृत्वाची अनिष्टता आतापावेतों मला पटलीच होती, पण त्यासंबधांत उरलीसुरली एखादी शंकाही नाहींशी करणारा एक ढळढळीत प्रसंग नुकताच घडून आला.

पंधरा दिवसापूर्वी मी प्रसूत होऊन मुलगा झाल्याचें तुला कळलेंच आहे. चार दिवस मला स्वतःला कशाचीच शुद्ध नव्हती ! पांचव्या दिवशीं मीं पुत्राचें नीट दर्शन घेतलें; आणि काल सायंकाळीं त्याचें शेवटचें दर्शन घेतलें ! मध्यंतरीच्या त्याच्या अवस्थेचें वर्णन करतां येत नाहीं !

मातृत्वाचा विचार आतापावेतों मीं जनक, जननी व समाज यांच्या दृष्टीनेंच केला होता. आता मला कळलें कीं, मातृत्वाची पवित्रता अपवित्रता ठरवितांना, विश्वाच्या रंगभूमीवर संसाराच्या नाटकांत भाग घेण्यासाठीं नवीनच पदार्पण करणाऱ्या एका चिमुकल्या प्राण्यालाही त्यासंबधांत आपली कैफियत पुढे मांडण्याचा पूर्ण हक्क आहे ! ज्या अविचारी मातृत्वानें निरपराध बालकाच्या शरीरांत जन्मतःच नाना-प्रकारच्या भीषण रोगजंतूंचा प्रवेश होऊन आयुष्यभर त्याला क्लेश होतात—तें मातृत्व पवित्र ! किती विषारी वाटतात हे शब्द आता !

पण पूर्वी मी याच शब्दांना कवटाळीत नव्हते का ? आपल्या अविचारानें दुसऱ्या एका जीवाला जन्मभर सरोग शरीरात जखडणारी स्त्री, माता या पवित्रतम संज्ञेला पात्र तरी होईल का ? आणि तरी म्हणे मातृत्व हें नेहमीं पवित्रच, असतें ! आता या दृष्टीनें पाहतां विवाहित मातृत्वातही कांहीं प्रसंगीं दोष आढळतीलच. पण स्त्रीपुरुष-संबंधावरील विवाहरूपी संयमाचें बंधन समूळ नाहींसें केल्यानें समाजावर, भावी पिढीवर, जे अनर्थ कोसळण्याचा स्पष्ट संभव आहे, त्यांचा निर्विकार दृष्टीनें विचार केला असता, अगदी आदर्श नसली तरी शक्य तितकी पूर्ण अशी विवाहसंस्था असावी व तिला अधिकाधिक पूर्ण करण्याचा प्रयत्न करीत रहावा, हे मत कोणाही समंजस माणसाला पटेल असे वाटतें. पण वर्तमान विवाहपद्धतींतले दोष सुधारा हें सांगणे निराळें, आणि तिच्या मुळावरच घाव घालण्याचा आग्रह धरणे निराळें.

मालती, गेल्या पंधरा दिवसात ज्या ज्या वेळेस माझ्या पुत्राकडे मी पाही किंवा त्याचें किंचाळणें माझ्या कानावर येई, त्या त्या वेळेस एक विलक्षण भास मला होत असे. मला वाटे कीं, अत्यंत कठोर शब्दांत त्या लहानशा देहात कष्ट भोगणारा तो जीव मला म्हणत आहे; ' तू—तूच माझ्या या कष्टाबद्दल जबाबदार आहेस ! तुझ्या अविचारानेंच मजवर हे रोगी शरीर लादलें ! तुझा खेळ झाला पण माझा प्राण चालला आहे ! स्वतःच्या वैषयिक सुखाच्या उन्मादांत मला त्याचे विपरीत परिणाम भोगावे लागतील ही कल्पनाही तुझ्या मनाला शिवली नाहीं ! ऐक, डॉक्टर माझ्या रोगाचें काय निदान व कारण सांगतात तें कान उघडे ठेऊन ऐक ! समाजाकडून होणाऱ्या खऱ्याखोट्या अन्यायाविरुद्ध ओरड करतां करतां मजवर केवढा अन्याय केलास तू हा ! '

कधीं कधीं हा भास इतक्या स्पष्टपणें व्हावा कीं, मीं माझे कान घट्ट दाबून धरावे. आईने विचारावें, तुला काय होते ? पण मी तिला काय उत्तर देऊ शकणार होतें ? अनिर्बंध जीवनांतला उद्याचा ससार असाच व्हावयाचा ! पण कान दाबल्यानें बाहेरचा आवाज बद होऊ शकेल, हृदयातून निघणारा आवाज त्यानें कसा बद होईल ? शेवटीं रडकुडीला येऊन, मीं त्या चिमुकल्या जीवाला उद्देशून म्हणावें, " बाळा, क्षमा कर रे ! तुझे कष्ट आधींच मला पाहवत नाहीं. पण त्यात तुझे हे शाप माझ्या हृदयाचे लचकेच तोडतात ! मी इतकी पापी नाहीं रे ! मला काय माहीत याचा परिणाम असा होईल म्हणून ? पण माझी इतकी चूक खरी कीं, मीं मातृत्वाचे गाभीर्य ओळखले नाही, ती एक स्वतःची वैयक्तिक बाब समजलें. प्रेमळ मातापित्यांच्या सल्यानें आयुष्यातला जोडीदार ठरविला जाण्यांत, त्याच्या निर्विकार दृष्टीने त्याना योग्य चौकशीनतर जी आवश्यक माहिती मिळेल, तशी तारुण्यसुलभ परस्पराकर्षणाच्या उन्मादावस्थेतून जाणाऱ्या व्यक्तींच्या ध्यानात येणार नाही, हें मी माझ्या स्वैर स्वातत्र्याच्या कल्पनेच्या भराऱ्यात विसरले ! पण त्याबद्दल दारुण मनस्तापाची आणि भीषण शारीरिक व्याधींची किती तरी शिक्षा मी भोगून राहिले आहे. तू त्या दुःखावर आणखी डागण्या देऊ नको रे ! बाळा, मी तुझी आणि ईश्वराची वारवार क्षमा मागते ! तुझे सारें दुःख माझ्याकडे येऊन तुला आराम होवो. ईश्वर दीनाचा, पश्चात्तापाने शुद्ध झालेल्यांचा, कैवारी आहे म्हणतात. मग माझ्या बाळाला त्यानें... .. "

( पुढे कांहींही मजकूर सागणें नदिनीला अशक्य झाल्याने हें पत्र येथेंच पूर्ण केलें आहे—सुरेश दप्तरे. )



## [७०] मदन आणि पोलिस.

पार्वतीपूर श्री. गुरुवार ता. ३-३-१८

रा. रा. मित्रवर्य माधव यास सप्रेम नमस्कार वि. वि.

तू येथून काल सकाळीं गेल्यानंतर वामन मांडे मला येऊन भेटून गेला. या भेटीच्या प्रसगीं तूं हजर असतास तर उत्तम झालें असतें. कारण त्यानें त्या वेळेस फार महत्वाची बातमी सांगितली.

त्याच्या एकदर सांगण्यावरून तात्यासाहेबांचा हरवलेला मुलगा प्रभाकर म्हणजे वामन स्वतःच होय असें दिसतें. तात्यासाहेबांच्या हांतून प्रभाकर पडल्यानंतर, अण्णासाहेब मांडे व माझे वडील हे त्याच यात्रेंत असल्यानें यांच्या हातीं तो लागला. केवळ दयाबुद्धीनें अण्णासाहेबानीं त्याला उचललें आणि चेंगरण्यापासून वाचविलें. सर्व स्थिरस्थावर झाल्यावर त्यानीं या मुलाला बरेच प्रश्न विचारले, पण त्याच्या तोंडून बरोबर माहिती मिळेना. इकडे मांडे व माझे वडील याना परत येण्याची फार घाई होती, त्यामुळे मुलासह ते परत चालले आले. नंतरही तपास केला पण मुलाच्या आईबापाचा पत्ता लागेना. शेवटीं रा. मांडे यांनीं प्रभाकरला आपल्या पुत्राप्रमाणेंच वागविण्याचें ठरवून त्याला वामन म्हणून हाक मारण्यास सुरवात केली. काहीं वर्षांनतर माझ्या वडिलाना त्या मुलाच्या खऱ्या पित्याची—तात्यासाहेबाची—माहिती झाली; व त्यानीं अण्णासाहेबाना सर्व परिस्थिति कळविली. पण तोंपावेतों अण्णासाहेबाना व त्याच्या पत्नीला प्रभाकर ऊर्फ वामन याचा फार लळा लागल्यानें, त्याच्या वियोगाची कल्पना त्याना सहन होईना. वामनला सत्य परिस्थिति सांगण्याचें ते नेहमीं ठरवीत, पण प्रत्येकवेळीं त्यांना वाटे कीं, पितापुत्रांची ताटातूट केल्याबद्दल वामन व तात्यासाहेब काय म्हणतील ? जसजसे दिवस अधिक लोटू लागले तसतसें त्याचें मनही त्याना अधिकाधिक खाऊ लागलें व

लोकनिंदेची धास्तीही वाटू लागली. मध्यतरीं त्याची पत्नीही वारली. पण तात्यासाहेबाना विनाकारण अधारात ठेवणें माझ्या वडिलांना पसत पडेना व अण्णासाहेब माडे याच्या इच्छेविरुद्धही त्यांना जाववेना. शेवटीं माझ्या वडिलानीं प्रथम तात्यासाहेबांना सन १९३१ मध्यें ते पहिलें निनावी पत्र पाठाविलें, व पुढे दरवर्षी तीं पत्रें सुरूं राहिलीं. असा क्रम चालू असतां कांहीं वर्षांपूर्वी अण्णासाहेब वारले; पण त्यावेळेस वामन त्याचेजवळ असूनही त्याचे तोंडून शेवटपावेतों सत्य बाहेर पडलें नाहीं तें नाहींच.

सदरहू माहितीच्या पुष्ट्यर्थ वामननें अण्णासाहेब माडे यानीं एका कागदावर थोडक्यांत लिहून ठेवलेला मजकूरही दाखवला. तो कागद मी यासोबत तुझ्याकडे पाठवीत आहे तात्यासाहेबासारख्या व्यक्तीशीं इतका निकट सबध सिद्ध झाल्याबद्दल मीं वामनचें अभिनदन केलें, बिचाऱ्याचीं दुःखें आतां तरी संपतील !

तो आतांच तात्यासाहेबाकडे जाऊन त्याना हें कळविणार होता. पण या वार्तेचें महत्त्व पाहता तात्यासाहेबाना ती युक्तीनेंच कळणे मला इष्ट वाटलें. म्हणून मी वामनला—कीं प्रभाकरला ?—तात्यासाहेबाकडे जाण्यापासून मोठ्या आग्रहाने परावृत्त करून तुला हे सारें तावडतोब कळविलें आहे. माधवकडून कळल्याशिवाय तात्यासाहेब कोणाचेंही ऐकणार नाहींत हें मीं वामनला खात्रीपूर्वक सागितल्यानें वामनचा नाइलाजच झाला. आता तू म्हणशील तसे करू. तू स्वतःच येथें येणें उत्तम होईल.

हा खुलासा करण्यास इतका उशीर लागण्याचें कारण त्यानें असें सांगितलें कीं, बऱ्याच तपासानंतर त्याला त्याच्या वडिलाच्या हातचा हा कागद सांपडला. तो सापडल्यानंतर तो त्याच्या वडील बहिणीस जाऊन भेटला, तेव्हा तिलाही कांहीं काहीं गोष्टी आठवल्या,

आणि एकदर माहिती गोळा करून वरीलप्रमाणें त्यानें आपल्या-समोर ठेवली आहे.

असो. जी माहिती मिळाली ती कळवली आहे. मला स्वतःला इतकेंच वाटते कीं, हेंच जर सत्य होते तर माझ्या वडिलाच्या मनावर या गोष्टीचे इतके दडपण काय म्हणून पडलें होतें?

मी आता दुसऱ्या विषयाकडे वळतो.

माझ्या साक्षरता प्रचाराच्या कार्यांत परवा एक नवीनच अनुभव आला. मी माझ्या तुकडींतल्या विद्यार्थ्यांना हिंदुस्थानचा इतिहास व जगाचा प्राथमिक भूगोल आजकाल शिकवीत असतो ही माहिती येथें पोलिसाच्या कानावर जाऊन पोचली. झाले. माझ्या साक्षरता-प्रचाराच्या कार्यांत त्याना राजद्रोहाच्या शिकवणीचा वास येऊ लागला! आजपावेतों ज्याचे जीवन फक्त हमालींतच गेलें, त्याच्या तोंडीं आतां जगातल्या निरनिराळ्या देशाचीं व राज्यपद्धतींचीं नावें येऊ लागलीं म्हणजे काय? येथील पोलिस अधिकाऱ्याची कर्तव्यनिष्ठा लागलीच खडबडून जागृत झाली!

शेवटीं काल सायकाळीं मला पोलिसठाण्यावरून बोलावणें आलें. यापूर्वी चारपांच वेळां सी. आय. डी. चीं एक दोन माणसें आमच्या वर्गाच्या आसपास गुपचाप फिरून गेल्याचे आमच्या कानीं आलेंच होतें. पण आमचा साक्षरता प्रचाराचा हेतु अगदीं उघड व शुद्ध असल्यानें, आम्हीं त्या गोष्टीची पर्वा केली नाहीं. पोलिसठाण्यावर प्रथम मला बराच वेळ बसवून ठेवण्यांत आले; नंतर माझ्याकडून आमच्या कार्याबद्दल बारिकसारिक माहिती विचारण्यांत आली. तरीही अधिकाऱ्याचें समाधान न होतां तो मला उलटसुलट प्रश्न विचारतच होता. इतक्यांत तुझे मामा म्हणजेच मालतीबाईचे वडील श्री. कोपरे वकील हे देखील तेथें येऊन पोचले. त्यानीं जेव्हां त्या पोलिस

अधिकाऱ्याची सर्व प्रकारें खात्री करून दिली तेव्हां एकदाची माझी तेथून सुटका झाली ! आतां त्या पोलिस अधिकाऱ्याच्या घरीं झाडलोट करणारा एक नोकरच आमच्या वर्गात साक्षर होण्यासाठीं येणार आहे ! कां, आहे कीं नाहीं मौज ? ( बाकी, तो नोकर पाठविण्यात त्या अधिकाऱ्याचा खरोखर काय हेतू असावा हें सांगणें कठीण आहे. )

पण आणखी एक गमत लिहायची राहिलीच मला पोलिस ठाण्यावर बोलावून नेल्यानंतर कर्मधर्मसयोगानें ती वार्ता थोड्याच वेळात मालतीबाईंना समजली लागलीच त्यांनीं स्वतः आग्रह धरून त्यांच्या वडिलाना माझ्या साह्यार्थ पाठविले. पण तरीही त्याचे वडील आणि मी त्याच्या घरीं परत पोहोचेपावेतों मालतीबाईंचें मन इतके घाबरून गेले होते कीं, मला सुखरूप परत आलेलें पाहताच त्याच्या डोळयात खरोखरच आनदाश्रू आले ! वास्तविक पाहिलें तर मला पोलिसठाण्यावर केले तरी काय असेंत ? माझ्यावर कांहीं गुन्हा केल्याचा आरोप तर नव्हताच. पण, माधव, स्त्रिया शिकलेल्या असल्या तरी शेवटी स्त्रियाच ! मनाला धीर कसा तो नाहींच !

कळावे, लोभ असावा हे विनति. तुझा मित्र,

**केशव दाते.**

---

## [७१] हा खरा खुलासा नव्हे.

काचनपूर श्री. शनिवार, फाल्गुन शु. ३ शके १८५९

प्रिय मित्र केशव यास सप्रेम नमस्कार वि. वि.

तुझें तारीख वीसचें पत्र मिळाले. वामन माडेनें दिलेली माहिती वाचली. पण त्या माहितीनें पूर्ण समाधान होत नाहीं, मनात पुढील-प्रमाणें अनेक शका उद्भवतात.

अण्णासाहेब माडे यांनीं प्रभाकरचें नाव विनाकारण का बदललें ?

तात्यासाहेबांच्या सांगण्याप्रमाणें, त्याचा मुलगा हरवला त्यावेळेस तो आपलें प्रभाकर हें नांव स्पष्ट उच्चारीत असे. शिवाय, अण्णासाहेब मांडे यांच्या मनाला ती गोष्ट इतकी खात होती तर त्यानीं वामनला अस्पष्ट कां होईना पण कांहींच सूचना कशी केली नाहीं ? वामनला तर आपल्याकडून कळण्यापूर्वी कांहींच माहीत नव्हतें. निदान अंतकाळीं वामन जवळ असताना तरी त्यानीं कांहीं खुलासा करावयास हवा होता. बरें, वामनच्या वडील बहिणीला तरी यातल्या कांहीं गोष्टी तो कागद सापडल्यानतर आठवल्या याचा अर्थ काय ?

पण सर्वांत महत्वाची शंका अशी की, वामनने सांगितलेली माहिती जर खरी असेल, तर अण्णासाहेब निवर्तल्यानतर तुझ्या वडिलांनीं तीं निनावीं पत्रे पाठविण्याचें चालू ठेवणें फारच विचित्र वाटतें. त्याची संगति कशी लावायची ? तू स्वतः तुझ्या पत्रांत म्हटल्याप्रमाणें तुझ्या वडिलांच्या हृदयावर जें दडपण होतें त्याचा उलगडा वामनच्या माहितीने कांहींच होत नाहीं.

प्रस्तुत प्रकरणाचें महत्त्व तुला मीं सांगावें असें नाहीं. आपण योग्य विचार न करतां घाईनें भलत्याच गोष्टीला सत्य मानून चाललों तर त्याचे परिणाम भयंकर होतील. म्हणून वरील प्रश्नांच्या अनुरोधानें तू वामन मांडेकडून अधिक खुलासा काढून मला कळव. त्याला तात्यासाहेबांकडे जाण्यापासून तूं परावृत्त केलेंस हें फार चांगलें झालें. असेच त्याला आणखी परावृत्त कर. इकडे मीही तात्यासाहेबांना या संबधीं योग्य शब्दांत सूचना देऊन ठेवतों; म्हणजे आपलें न ऐकतां वामन त्यांना भेटला तरी फारसें नुकसान होणार नाहीं. मात्र आपल्याला त्याचा वृत्तांत अविश्वसनीय वाटतो असें त्याला भासवू नको. त्यानें तुला दिलेला कागद मीं पाहिला; पण वरिल प्रश्नांचीं समाधानकारक उत्तरें मिळाल्याशिवाय त्या कागदांतील मजकुराला—तो

अण्णासाहेब मांडे यांच्याच हातचा लिहिलेला आहे असें मानलें तरी–मी तूर्त फारसें महत्त्व देऊ शकत नाहीं. शेवटीं सत्य काय बाहेर पडतें कोण जाणे ! मी समक्षच तेथें येईन म्हणतो, पण हल्ली काहीं दिवस तरी येथून निघूं शकत नाहीं.

तुझा पोलिसठाण्यावरचा अनुभव वाचला. एकदरींत तो आनंदपर्यवसायी झाल्याबद्दल मी तुझे अभिनदन करतो. परवाच मालतीचेंही येथें एक पत्र आलें असून तिनें देखील त्याबद्दल लिहिलें आहे. तू तिच्या घाबरटपणाबद्दल लिहिलेंस, तर तिनें तुझ्या धैर्याची स्तुति केली आहे ! शेवटीं तुझ्यापेक्षा तीच खरी गुणग्राहक ठरली म्हणावयाची ! कळावें, तुझा मित्र,

**माधव मुद्रे** ५-३-३८

---

[७२] **एक मासलेवाईक पत्र.** (नदिनीच्या वडिलाचें केशव दातेस पत्र)

पार्वतीपूर श्री. ता. २५–३–३८

रा. रा. केशवराव दाते, एम्. ए. यांस, स. न. वि. वि.

दोन तीन वर्षांपूर्वी तुमची व माझी कामानिमित्त अनेक प्रसगीं भेट होत असे तेव्हापासून आपला परस्पर परिचय झाला आहेच. अलीकडे बरेच दिवसात जरी तुमची भेट झाली नाहीं, तरी तुमच्याविषयींचा लोभ माझ्या मनात पूर्वीप्रमाणेंच कायम आहे. तुमची हुशारी, तुमचा सुस्वभाव, तुमची नम्रवृत्ति यांच्याविषयीं माझी स्मृति आजही ताजी असून या तुमच्या गुणांविषयीं मला साभिमान आदर वाटतो. मी विद्यार्थ्यांना शीलसवर्धनाविषयीं वारवार करीत असलेला उपदेश इतरांच्या बाबतींत जरी खडकावर पडणाऱ्या पावसाइतकाच परिणामकारक ठरत असला, तरी तुमच्या ठायीं मात्र तो उत्तम प्रकारें रुजला आहे याबद्दल मला फार आनद वाटतो.

आतां ही चिठ्ठी आज लिहिण्याच्या विशेष कारणाकडे वळतों. माझी मुलगी नंदिनी ही तुम्हांस माहीतच आहे. ती लखनौस बी. ए. मध्यें शिकत असते—किंवा शिकत असे म्हणा हवें तर, कारण अलीकडे या शिक्षणाचा तिला कंटाळा आल्यानें तिनें कॉलेज-मध्यें जाणें बंद केलें आहे. चित्रकलेंत तर तिची निपुणता प्रसिद्धच असून तुमच्याही कानांपावेतों ती आली असेलच. अनेक प्रदर्शनांत तिच्या कृतींचा गौरव झाला आहे.

नंदिनी नुकतीच लखनौहून येथें आली आहे. तिची इच्छा आता संसारात प्रवेश करण्याची असून आमचीही या गोष्टीला अनुमति आहे. यासंबंधात विचार करता, तुमचें नाव तुमच्या अंगच्या अनेक गुणांमुळें सहजच प्रथम आठवलें. तिच्यासारखी सुविद्य, सालस व सच्छील सहकारिणी लाभल्यास तुमचेंही भावी जीवन सुखात जाईल, आणि तुमच्यासारखा उत्तम जोडीदार मिळाल्यास तिचेंही जीवन योग्य प्रकारें व्यतीत होऊं शकेल असा मला विश्वास वाटतो.

तरी यासंबंधात तुम्ही मला येऊन भेटल्यास मला फार आनंद होईल. किंवा, तुमची तशी इच्छा असेल तर तुम्ही कळवाल त्या वेळेस मी येईन अगर माझे हेडक्लार्क येतील. तुमचे वडील हयात नसल्यानें तुम्हासच लिहिलें आहे; शिवाय तुम्ही स्वतः सुविद्य आहाच.

नंदिनी नुकतीच विषमज्वरांतून उठली असल्यानें फार अशक्त झाली असून विशेष कोठें बाहेर जात नाहीं. बहुधा ती घरींच असते.

जातांजातां एक गोष्ट लिहिणें अप्रासंगिक होणार नाहीं. अद्याप तुम्हांला कोठें तुमच्या योग्य नोकरी लागली नाहीं असें कळतें. पण भारतविद्यालयांत एका इंग्लिश-टीचरची जागा व्हेकंट झाली आहे. जर आपला व नंदिनीचा विवाहसंबंध जुळून आला तर ही जागा आपल्यास मिळण्याची सर्व खटपट मी करीन हें सांगणें नकोच.

कळावें, लोभ असावा हे विनंति.

खुलासा लवकर करण्याची कृपा करावी म्हणजे मला कांहीं उमज पडेल.

तुमचा कृपाभिलाषी,

व्ही. एस्. दप्तरे.



## [७३] शुभमंगल सावधान.

पार्वतीपूर श्री. गुरुवार ता. ३०-३-१९३८

चि. रा. मनोहरपंत यास अनेक आशीर्वाद.

तुमचें पत्र अलीकडे बरेच दिवसात आलें नाहीं, तरी कुशल कळवून काळजी दूर करावी. येथें सर्व क्षेम आहे. नंदिनीची प्रकृति आता बरीच सुधरली आहे. एका अत्यंत कठीण प्रसंगीं तिला साह्य करून तिचा जीवनरथ योग्य मार्गावर लावल्याबद्दल ती तुमचे मुक्त-कंठानें गुणानुवाद गात असते.

चि. मालतीचा विवाह श्री. केशवराव दाते या नांवाच्या येथील उत्साही व होतकरू तरुण गृहस्थाबरोबर आता निश्चित ठरला आहे, हें कळविण्यास मला फार आनंद वाटतो. श्री. केशवरावाचें वय चोवीस पंचवीस असून त्यांचें शिक्षण एम्. ए. पावेतों झालें आहे. त्याचे वडील दोन वर्षांपूर्वी निवर्तले, ते मानपूर येथें प्रथम सरकारी व नंतर खासगी डॉक्टर होते. घरात सावत्र आई व तिची एक मुलगी आहे; पण त्यांचें केशवरावावर चांगलें प्रेम आहे. मान-पूरला त्याच्या मालकीचीं दोन घरे व एक बगीचा आहे. केशवरावाचें कुलशील उत्तम, गोत्र जुळतें, आचार शुद्ध व विचार उच्च आहेत. अद्याप त्यांना नोकरी लागली नसली तरी त्यांच्यासारख्या होतकरू तरुणाच्या भवितव्याबद्दल मला विश्वास वाटतो. शिवाय येथील सुप्रसिद्ध ‘ प्रभाकर ’ साप्ताहिकाचे संपादक श्री. तात्यासाहेब डोळे

यांचा केशवरावांवर फार लोभ असून, ' प्रभाकर-कार्यालयात ' केशवरावांना लवकरच सहभागी करून घेण्याचा आपला अंतस्थ विचार तात्यासाहेबानीं मजजवळ खासगी रीत्या व्यक्त केला आहे.

विशेष म्हणजे या बाबतींत मुख्य सूचना चि. मालतीकडूनच आली. गेल्या कांहीं महिन्यांपासून साक्षरता चळवळीच्या कारणानें तिचा आणि केशवरावाचा बराच परिचय झाला असून, परस्परांच्या गुणदोषाची आणि स्वभावविशेषांची त्याना उत्तम माहिती झाली आहे. केशवरावाच्या प्रचलित आर्थिक स्थितीची मालतीलाही चांगली जाणीव असूनच तिनें ही सूचना केली. एकदर विचार केल्यावर आणि केशवरावाची अधिक माहिती काढल्यावर मला देखील हा योग फार उत्तम वाटला, व मीं आनदानें समति दिली.

आपल्या यमूताईचा मुलगा माधव मुद्रे हा केशवरावाचा फार निकट स्नेही आहे. त्याचेकडून देखील माहिती काढली तेव्हा त्यानेंही अंतःकरणपूर्वक या विवाहाबद्दल आनद प्रदर्शित केला.

सौ. यमूताईचा उल्लेख आला म्हणून लिहितों. तिला अलीकडे घरात बराच त्रास होत असतो असें ती मध्यतरीं येथें आली असतांना कळले. फार आश्चर्य वाटलें मला हें ऐकून ! लोकांत किती कीर्ति मिळविली आहे माधवनें ! घराबाहेर सर्व त्याच्या निःस्वार्थी समाजसेवेची, विद्वत्तेची, सुस्वभावी मनमिळाऊपणाची स्तुति करतात. पण विवाह झाल्यापासून तो आईला मात्र सुखी ठेवीत नाहीं, याला काय म्हणावें ? सगळें जग राजी पण घरांत मातेची नाराजी ! आपण या घरगुती भाडणांत काय पडणार ? मागें मात्र मीं एकदा माधवला यासबंधांत लिहिलें होतें; पण त्यानें त्याचें उत्तरच दिलें नाहीं. तसें पाहिलें तर यमूताईचा स्वभावही चांगला आहे हें तुम्हास ठाऊकच आहे. मग अलीकडे तिचें घरात कां पटत नाहीं कोण जाणे ? सुने-

बद्दल आणि मुलाबद्दल ती पुष्कळच तक्रारी करत होती आमच्या येथें! मालतीच्या विवाहात आपण सर्व एकत्र होऊं त्यावेळेस तुम्ही वाटल्यास माधवला यासबंधांत काहीं सांगून पहा.

मालतीचा विवाह आता विलंब न लावता उरकावयाचा आहे. एकदा हे निपटलें म्हणजे कुसुमसाठीं स्थळ शोधण्याच्या उद्योगांत लागतो. लवकरच मुहूर्त ठरवून कळवितों. सुशिला, बाबू व त्यांची आई यांना लवकर पाठवून द्यावें.

कळावें, हे आशीर्वाद. तुमचा बंधू,

**नाना कोपरे.**

---

**[७४] माता विरुद्ध पत्नी.**

माधव मुद्रे याच्या खासगी वहींतला उतारा.

गुरुवार, फाल्गुन कृ. ३० शके १८५९

माता विरुद्ध पत्नी! या चमत्कारिक द्वंद्वातून बाहेर पडण्यासाठीं कधीं तरी सुखासमाधानाचा मार्ग सापडेल का? किती ताप होतो मनाला या कौटुंबिक क्षेत्रातील विरोधामुळें! या प्रश्नापुढे माझी बुद्धि कामच करेनाशी होते! येऱ्हवीं कितीही मोठे प्रश्न आले तरी मला सहसा विशेष कांहीं वाटत नाहीं.

लहानपणापासून मजसाठीं अपरिमित कष्ट सोसणारी माता, आणि तरुणपणापासून मजसाठीं आनंदानें कष्ट भोगणारी पत्नी—याचा समन्वय कसा घडवून आणावयाचा? मला वाटतें, स्त्रीजातीशीं दोन भिन्न प्रकारें येणाऱ्या या निकट संबंधामुळें सामान्य पुरुषाच्या मनाचा होणारा घोटाळा कांहीं आजचा, वर्तमानकाळांतलाच, नव्हे; हा जसा आज, तसाच पूर्वी, आणि तसाच पुढेंही असेल. बरें, हा प्रश्न आपल्याच समाजांत आहे असेंही नाहीं; पाश्चात्यांत देखील तो आहेच!

'व्हॉट् इझ् रॉग् वुइथ् मॅरेज्?' या ग्रंथाच्या त्या अमेरिकन लेखकांनीं (जी. व्ही. हॅमिल्टन् आणि के. मॅक्गोवन्) तरी त्यांच्या देशांत संशोधन करून हेंच प्रतिपादन केलें कीं, मातेच्या ठायीं अतिशय निष्ठा असणारे (याना ते लेखक 'मदर्स् बॉइज्' म्हणतात), आणि मातेविषयीं मुळीच ममता नसणारे (याना ते 'मदर् हेटर्स्' म्हणतात), हे दोघेही यशस्वी पती (हॅपी हस्बण्डस् ऑर गुड् हस्बण्डस्) होत नाहींत, अर्थात अशा लोकांच्या पत्न्या सुखी नसतात. पण मी म्हणतो कीं, जे या दोन्ही कोटींतले नाहींत ते बहुधा स्वतःच सुखी नसतात ! प्रत्येक क्षणीं पत्नी आणि माता या दोहोंच्या ओढीमध्ये त्यांच्या जीवनांतला समाधानाचा झरा आटू लागतो ! एवंच काय कीं, माता, पत्नी आणि स्वतः पुरुष हे तिघेही समजूतदार असल्याशिवाय कुटुंबांत खरा आनंद लाभणें शक्य नाहीं.

या कौटुंबिक विरोधाचा उगम तरी किती विलक्षण प्रकारें होतो ! प्रथम, माताच मोठ्या खटपटीने व आग्रहानें मुलाचा विवाह घडवून आणते; सुरवातीस कांहीं दिवस सुनेला घेऊन ती मोठ्या अभिमानानें समाजांत मिरवते. आणि नंतर आणखी कांहीं काल जातांच तिला त्याच सुनेचें वैषम्य वाटू लागतें !

मानसशास्त्रदृष्ट्या याचा कांहींसा उलगडा होऊं शकतो खरा ! जोंपावेतों सून घरांत नवीन असल्यानें सर्वस्वी सासूवरच अवलंबून असते आणि सासूच्या व्यक्तिमत्वाला सुनेमुळें कांहीं मर्यादा प्राप्त होत नाहीं, उलट सुनेमुळें सासूची अभिमानवृत्ति संतुष्ट होत असते, तोंपावेतों तिला सुनेच्या उपस्थितीमुळें आनंद होत असतो. पण कालमानानुसार सुनेला गृहव्यवस्थेंत आणि तिच्या पतीच्या अंतःकरणांत योग्य स्थान प्राप्त होऊं लागलें, म्हणजे पूर्वीच्या अनिर्बंध सार्वभौमत्वाच्या पदापासून आपण हळूहळू स्थानभ्रष्ट होत असल्याचा

भाव सासूला होऊं लागतो, आणि मग सुनेबद्दल तिला वैषम्य वाटू लागतें ! जो सत्तेचा अभिलाष राष्ट्राराष्ट्रात युद्धें निर्माण करतो, तोच कुटुंबांत मनोमालिन्य उत्पन्न करतो !

मात्र अशा प्रकरणात नेहमीं सासूच दोषी आणि सून निर्दोषी असे म्हणता येणार नाहीं. कित्येक प्रसगीं एखादी अविचारी सून घरातल्या आपल्या वाढत्या अधिकाराचें प्रदर्शन विनाकारण कठोरपणें करते आणि घरातलें सारें वातावरण नासून टाकते. उलट, कित्येक प्रसगीं सासू सर्वांचेसमोर विनाकारण सुनेचा पाणउतारा करून आपल्या सत्तेचा ढासळणारा मनोरा थोपविण्याचा प्रयत्न करते, आणि मग तो मनोरा अधिकच कलता होतो !

आई, गेला महिनाभर सौ. माहेरी गेली असता किती प्रेमळ-पणानें खटपट केलीस तू माझी! मध्यतरीं मला दोन दिवस ताप आला होता, त्यावेळेस तू अन्नपाण्याचीही पर्वा न करता माझी शुश्रुषा केलीस ! नको नको म्हणता रात्रीच्या रात्री माझ्या बिछान्याजवळ बसून तू एकटीनें जागून काढल्यास ! स्वतःच्या खाण्यापिण्याची, प्रकृतीची, कशाचीच काळजी तू केली नाहींस ! काय हें प्रेम ? पण तेच, काल सौ. परत आल्यावर तू का बरे आमच्यावर रुष्ट झालीस ? आपण लिहिलें होतें त्याच दिवशीं न येता ती दुसऱ्या दिवशीं येथें आली, हेच ना तुझ्या नाराजीचें कारण ? पण आई, तिच्या माहेरच्यांनीं काहीं जरू-रीच्या कारणासाठीं तिला एक दिवस जास्त ठेवून घेतलें यांत इतके गैर तें काय झालें ? योग्य कारणांसाठीं स्वतःच्या आईजवळ एक दिवस जास्त राहण्याइतकेही का स्वातंत्र्य तिला नसावें ? तुझ्या तरुण-पणची आठवण तुला यासंबधात मीं करून देणें जरी उद्धटपणाचें होईल तरी, आई, आपण आपल्या गगूताईला मागें दोन दिवस जास्त नव्हतें का ठेवून घेतले ? पण काय चमत्कार आहे मनुष्य

स्वभावाचा ! तीच गोष्ट मुलीच्या बाबतींत आवडते आणि सुनेच्या बाबतींत नावडते ! मुलीवर जावयानें केलेलें प्रेम पाहून मन संतुष्ट होतें, पण तसेंच प्रेम मुलानें सुनेवर केलें म्हणजे मनाला वैषम्य वाटते !

आई, तुला असतुष्ट पाहिलें म्हणजे माझ्या मनाला किती वाईट वाटतें म्हणून सांगू ? तुला वाटतें कीं, तूं माझ्याकरिता इतका जीव तोडतेस आणि मी मात्र पत्नीच्या प्रेमामुळें तुजवर पूर्वीप्रमाणें प्रेम करीत नाहीं. चूक आहे तुझी ही समजूत. पण तुला कसें पटवून देऊं हें ? तूं काल स्पष्ट बोलली नाहींस, पण मी समजलों कीं, सौ. माहेरून परत आल्यावर एक दिवस उशीर केल्याबद्दल जशी तू रागावलीस, तसें मीं देखील तिच्यावर रागवावें अशी तुझी इच्छा होती. आणि मीं तसें न केल्यानें तुला अधिकच राग आला. तिच्या माहेरच्यानीं तुझ्याकरितां मुद्दाम करून पाठविलेल्या चिवड्याला तूं रागामुळें हात देखील लावला नाहींस. किती वाईट वाटलें आम्हाला त्यामुळें ! पण, आई, तू रागावलीस हेच जिथें मला योग्य वाटलें नाहीं, तिथें मी आणखी कसा रागावूं ? तिच्या हातून खरोखरच चूक होते तेव्हां तिला दोष देण्यास मी मुळींच कमी करीत नाहीं आणि करणार नाहीं. पण जेव्हां तिचा दोष नसेल तेव्हा मी तिच्यावर अन्याय कसा करूं ? आई, तू एक गोष्ट नेहमीं विसरतेस—जसा पुरुष मातेचा हक्काचा पुत्र असतो तसाच तो पत्नीचा हक्काचा पतीही असतो !


ता. ३१–३–३८.

## [७५] आनंदी आनंद : नवीन जीवनाचा प्रारंभ.

मानपूर श्री. शुक्रवार, ता. १–४–१९३८
गुडीपाडवा, शके १८६०.

प्रिय मित्र माधव,

आज मला इतक्या गोष्टी लिहावयाच्या आहेत कीं, त्या कशा

लिहाव्या हेंच मला कळेनासें झालें आहे !

भावनातिरेकानें हृदय तुडुंब भरून गेलें आहे; आनदानें भान हरपलें आहे; बुद्धि बेहोष झाली आहे !

पत्र नीट कसें लिहावें हे देखील मी आज विसरून गेलों आहे. मनांतल्या भावना आणि विचार व्यक्त करून दाखविण्यास भाषा भिकारडी वाटत आहे !

मुख्य मजकुरास सुरवात कोठून व कशी करू याचाच मनाला घोटाळा पडत आहे. आजचे माझें पत्र सुसबद्ध नसले तर तू क्षमा कर.

तुझी मामेबहीण मालती हिचें माझ्याशीं लग्न ठरले असून लवकरच तो समारभ साजरा होणार आहे ! विवाहाचे निश्चित ठरतांच मी तातडीनें येथें निघून आल्यानें तुला यापूर्वी लिहू शकलो नाहीं. पण, मला वाटते, तुला त्याचे घरून हें कळलेंच असावें. मालतीसारखी सुविद्य सहचारिणी लाभल्याबद्दल मी स्वतःला भाग्यवान समजतों.

माधव, तू या लग्नाला आले पाहिजे हे लिहावयास नकोच. पण तूं कोणत्या नात्यानें येशील ? मालतीचा आतेभाऊ म्हणून ? की माझ्या चुलतबहिणीचा पति म्हणून ? थाब, हें नवें नातें वाचून चमकू नको ! समग्र पत्र वाच म्हणजे तुला या नवीन नात्याचा उलगडा होईल.

विवाहासाठीं 'आई'ला आणि माझी 'बहीण' सरला हिला घेऊन जाण्याच्या हेतूने मी कालच येथें आलों. आता आम्ही—मीं आणि मालतीने—पार्वतीपूरलाच कायमचें वास्तव्य करण्याचें ठरविल्यानें मला येथील सामानाची आवरासावरही करावयाची होती. शिवाय, साक्षरता प्रचाराच्या दृष्टीनें उपयुक्त अशीं घरातलीं जुनीपुराणीं पुस्तकेंही धुडावयाचीं होतीं.

अप्पा निवर्तल्यानतर मीं त्यांच्या खोलींतील सामान मागें एकदां

आवरलें होतें; पण आज सकाळीं त्यांची पुस्तकाची एक पेटी नीट उघडून पहात असतां, खालीं तळाशीं एक जाड लिफापा दिसला, त्यावर "प्रभाकर गोविंद डोळे ऊर्फ केशव दाते यास क्षमापूर्वक" असें लिहिलें होतें !

हीं अक्षरें वाचताच माझ्या अगांतून विद्युत्शक्तीचा एक प्रवाह वाहून गेल्याचा मला क्षणैक भास झाला ! थरथरत्या हातानीं आणि धडधडत्या हृदयानें मीं तो लिफापा उघडला. आत अनेक कागदपत्रें व्यवस्थित रीत्या जमवून ठेवलीं होतीं. त्यात अप्पांच्या हातचे काहीं कागद होते; आणि अण्णासाहेब माडे यांचींही अप्पाना आलेलीं कित्येक पत्रें होतीं.

आणि तीं सर्व वाचल्यानतर निष्कर्ष निघाला तो हाच कीं, तात्यासाहेबाचा फार दिवसापासून हरवलेला लाडका प्रभाकर म्हणजेच हा अभागी ( कीं भाग्यशाली ? ) केशव ! किती विलक्षण योगायोग ! तात्यासाहेबाना काय वाटेल हे ऐकून ? आवडेल का त्याना त्याचा हा प्रभाकर पूर्वीप्रमाणेंच ? त्यांना आनद होईल ना ? माधव, कसे कळवायचें त्यांना हें वृत्त ? तू तावडतोब कसेही करून निघून ये. मी हा विद्यमान असताना आणि सत्य परिस्थिति मला माहीत झाली असतांना, माझ्या जन्मदात्या पित्याचा मनस्ताप आता विनाकारण एक क्षण देखील चालू ठेवणे मला सहन होत नाही रे !

मला सापडलेले ते सर्व कागद जसेच्या तसेच मीं आवरून ठेवले असून तू येताच तुला दाखवितों. त्यावरून खरा काय प्रकार आहे त्याचा सविस्तर उलगडा तुला होईलच. थोडक्यात, सारा प्रकार पुढीलप्रमाणें आहे. तात्याच्या हातून त्या मेळयात मी पडल्यावर एका बैराग्याने मला उचलले. अप्पा आणि माडे मुळीं त्या यात्रेला गेलेच नव्हते; वामननें ती निवळ कथा रचली होती. बैराग्यानें सुरवातीला माझ्या आईबापाचा तपास

करून पाहिला, पण त्या धादलींत काहीं पत्ता लागेना. माझ्या उद्गारा-वरून मी महाराष्ट्रीय आहे इतके मात्र त्याला कळलें. पुढें त्यानें एखाद्या महाराष्ट्रीय कुटुबाने माझा प्रतिपाळ करावा यासाठींही खटपट करून पाहिली, पण त्याला यश आले नाहीं. शेवटीं मला बरोबर घेऊन त्याने आपल्या पर्यटणास प्रारभ केला. ठिकठिकाणीं मला योग्य पालक धुडण्याची त्याची खटपट चालूच होती. कालातरानें तो उबरगावास आला. तेथे त्यावेळेस अप्पा डॉक्टर होते. त्यांची प्रथमपासून भजनपूजनाकडे प्रवृत्ति असून साधुबैराग्याविषयीं त्याना आदर वाटे. त्याचा या बैराग्यावर विशेषच विश्वास बसला. त्याचीं तीन मुले यापूर्वी वारलीं असल्याने ते दुःखीच होते. बैराग्यालाही हे स्थळ माझ्यासाठीं फार योग्य वाटलें, आणि एक दिवस त्याने अप्पांना माझे पालन करण्यासाठीं सुचविले. त्यानींही तें मोठ्या आनदाने मान्य केले, व अशा रीतीने मी पुन्हा महाराष्ट्रीय वातावरणात येऊन पडलो ! यासमयीं त्या बैराग्यानें माझ्याविषयीं त्याला होती तितकी माहिती अप्पाना सागितली, व त्याबरोबरच माझ्या हातातली यात्रेतली ती मोटरही दिली. अप्पानीं ती हकीगत लागलीच कागदावर लिहून काढून दोन सभ्य गृहस्थासमोर बैराग्याची त्याला मान्यता घेतली. तो कागद अप्पाच्या त्या लिफाप्यात आजही जसाचा तसाच असून, त्यावरूनच मला ही हकीगत समजली. याच्यावर सह्या करणाऱ्या दोन सद्गृहस्थापैकी एक अण्णासाहेब मांडे हेच होते, इतके ध्यानात घेतलें म्हणजे त्याचा संबध या घटनेशी कसा आला हे सहज समजेल.

अप्पाचा केशव नावाचा एक मुलगा नुकताच वारला असल्याने त्यानीं त्याच नावानें मला हाक मारण्यास प्रारभ केला. त्यांची लवकरच तेथून बदली झाली. काहीं कालानंतर ते मानपूरास आले. व अखेरीस येथेंच सेवानिवृत्त होऊन त्यांनीं खासगी दवाखाना उघ-

डला. पण येथे येण्यापूर्वी त्यांची पहिली पत्नी निवर्तून दुसरी आली होती. हिला माझ्याविषयीं अप्पानीं खरी माहिती दिलीच नाहीं. लोकातही साहजिकच मी अप्पाचा मुलगा म्हणूनच समजला जाऊ लागलों !

यानंतर काय घडलें तें अप्पानीं स्वहस्ते लिहून ठेवलेल्या मजकुरावरून व अण्णासाहेब माडे याची त्याना जीं पत्रें आलीं त्यावरून उघड होतें. जरी येथील लोकाना खरी हकीकत माहीत नव्हती आणि उबरगाव येथून फार दूर होते, तरी एखादे प्रसगी सत्य प्रकार उघडकीस येऊन जनांत आपली अपकीर्ति होईल अशी अप्पाना वारवार भीति वाटत असे. दुसऱ्या पत्नीपासून स्वतःला पुत्र झाला म्हणजे हें गौप्य उघड करावें अशी त्याची इच्छा होती, पण हें शेवटपावेतो झालेच नाहीं ! पुढें काहीं वर्षांनीं अप्पा आणि माडे रेलवेतून कोठे प्रवास करीत असता योगायोगाने तात्यासाहेबही त्याच्याच डब्यात येऊन बसले; आणि सभाषणाच्या ओघात तात्याची हकीकत अप्पा व माडे याना समजून मी कोणाचा पुत्र आहे हेही त्याच्या ध्यानीं आले ! आता मात्र अप्पाचे मन त्याना फार खाऊ लागले व इकडे अण्णासाहेबाचेंही मत सत्य लवकर उघड करावें असें पडले पण माझ्यावर त्याचें जें निःसीम प्रेम बसले होतें तें आडवे येत होते. शेवटीं अण्णासाहेबाच्या अत्यत आग्रहावरून त्यानीं सन १९३१ सालीं ते पहिलें निनावी पत्र तात्यासाहेबाना पाठविलें. पण आपण पार्वतीपूरच्या जवळच रहात असून आपले हस्ताक्षर ओळखलें जाण्याचा सभव आहे व तसें झाल्यास भयकर अपकीर्ति होईल अशी आतां त्यांना जास्तच भीति वाटू लागली. यामुळे त्यांनीं स्वतः तीं पत्रें लिहिणें बंद केलें; आणि अण्णासाहेब मांडे याचे कडून तीं चालू ठेवलीं. अण्णासाहेब निवर्तल्यानतर त्याचा अप्पाशी

होणारा पत्रव्यवहार बंद पडला व म्हणून या पुढील घटनाची माहिती नीटशी लागत नाहीं. पण पुढें फारसे असे काहीं घडलेंच नसावें. यानतर अप्पानीं स्वतःच तीं पत्रें पुनः सुरू केलीं. मात्र या पत्रात ‘ मी हे पत्र मित्राच्या सागण्यावरून लिहीत आहे ’ अशी जी टीप जोडली आहे, ती केवळ त्याना वाटणाऱ्या भीतीमुळेंच जोडली असावी. बाकी, एकदा त्याचे हस्ताक्षर ओळखले गेलें असतें, तर या टीपेनें त्याचा कितीसा बचाव झाला असता याची वानवाच आहे ! पण एक सत्याचा त्याग केला कीं, माणसाला नाना तऱ्हेच्या युक्त्या प्रयुक्त्याचा आश्रय घ्यावासा वाटतो. दोन वर्षांपूर्वी अप्पा एकाएकी वारले आणि तीं पत्रे मग पूर्णपणेच बद झालीं.

असा हा सारा प्रकार आहे ! माझ्या हातातली यात्रेतली ती मोटर आज अप्पाच्या पेटीत त्या कागदाच्या पुडक्याशेजारींच मला आढळून आली. माधव, आज त्या मोटारीकडे पाहून मला किती विलक्षण वाटतें ! हिनेच नाहीं का मला हा इतका सारा प्रवास करायला लावला ? खरीखुरी मोटर तर कोणालाही प्रवास करायला लावील, खेळातल्या नकली मोटरने अशा प्रकारे प्रवास करायला लावल्याचें हे माझे उदाहरण विलक्षणच नाहीं का ?

पण शेवटीं हा प्रवास सुखातच अत पावला ही ईश्वराची कृपा होय ! तात्याच्या हयातींतच हा खरा उलगडा झाला या गोष्टीचाच मला अत्यानद होत आहे ! कितीकाच्या भाग्यात असा पिता लिहिला आहे ?

या आनदाच्या प्रसगीं मी अप्पावर रागवत नाहीं, साधारण मनुष्याप्रमाणे ते वागले. पण निदान त्यानीं सर्व कागदपत्रें नीट जमवून आवरून ठेवलीं हें तरी काय थोडे झाले ? त्यामुळेंच आज हा वृत्तांत कळला तरी. याबद्दल त्याचे आभारच मानले पाहिजेत

आणि त्याचप्रमाणें वामनचाही मला राग येत नाहीं. अप्पांनीं अण्णासाहेबांना लिहिलेलीं पत्रें त्याला त्याच्या येथें सापडून त्यांच्या आधारानें त्यानें ती काल्पनिक कथा रचली असावी ! आणि म्हणूनच त्या कथेवर तूं मागें उपस्थित केलेल्या शंकांचें त्याला नीट समाधान करतां आलें नाहीं. असत्याचा पाठपुरावा तरी तो कोठपावेतों करणार ? बिचारा वामन ! मला त्याची दया येते, वर्तमानकाळातील साऱ्या सुशिक्षित बेकार तरुणाची मला दया येते ! ही बेकारी, ही केविलवाणी स्थिति, स्वतःच्या पत्नीची आणि पुत्राची भूक, सामान्य मनुष्यास काय नाहीं करायला लावणार ? अशा प्रसगीं नुसती शिक्षा काय कामाची ? त्याबरोबरच समाजानें अशा व्यक्तींची परिस्थिति सुधारण्याचाही विचार नको का करायला ? आज मला वामनसारख्या सर्वच भारतीय तरुणाचें हित करणे शक्य नसलें, तरी वामनकरिता मात्र काहीं तरी करणे मी माझें कर्तव्यच समजतो. तात्यांना सागून आमच्या ( माधव, आता वापरू ना हा शब्द मी ? ) 'प्रभाकर' कचेरींत एखादी योग्य जागा लवकरच त्याला देण्याची खटपट मी करीन.

माझ्या मालतीलाही ही वार्ता मी आजच कळवीत आहे. ( तुला हें पत्र लिहिण्याच्या पूर्वीच मीं तिला एक लहानसें पत्र लिहून ठेवल्याबद्दल क्षमा कर ! ) जिनें माझी विपन्नावस्था पाहूनही उघड्या डोळयांनीं माझी सहचारिणी होण्याचें पतकरलें, तिला आज माझ्या स्थितींत झालेला हा अनपेक्षित बदल पाहून किती हर्ष होईल ! तात्यासाहेबाबद्दल तरी तिला किती आदर वाटतो ! त्यांच्याशीं जुळून येणाऱ्या नवीन नात्याबद्दल तिला किती अभिमान व आनंद वाटेल !

हो. आणखी एक गोष्ट तुला लिहून कळवावयाची राहिलीच !

श्री. दप्तरे यांचे एक पत्र कांहीं दिवसापूर्वी मजकडे आलें असून त्यात नदिनींशीं विवाह करण्याबद्दल मला सूचना केली आहे. मालतीकडून नंदिनीबद्दल वेळोवेळीं मला सर्व हकीकत कळत असे हें श्री. दप्तरे याना माहीत नसावें ! त्याचें तें पत्रच मी यासोबत पाठवितों; मासले-वाईक आहे ते. मीं त्याना अद्याप काहीं कळविलें नाहीं; एक दोन दिवसात उत्तर पाठविणारच होतों. उगीच त्याना तरी घोटाळ्यांत कशाला ठेवावे ? ( माधव, परिस्थितीत कालातरानें किती बदल होतो नाहीं ? ) पण आता वाटतें कीं, आमच्या विवाहाची एक कुंकुम-पत्रिकाच त्याचेकडे पाठवू, म्हणजे अधिक काहीं न लिहिता सर्व खुलासा होईल.

झालें. माधव, आता माझें हें रामायण फार लाबवत नाहीं. आज माझा अज्ञातवास सपला ! अज्ञातवासानतरही माझे प्रिय पिता मला परत लाभले हा माझ्या रामायणातला विशेष होय ! उदर-पोषणाची चिंता निवारण झाली. कर्तृत्वाला उत्तम क्षेत्र मिळालें. योग्य व गुणी पत्नी लाभली. तुझ्यासारख्या अद्वितीय मित्राशीं निकट सबध प्रस्थापित झाला. ईश्वराच्या घरीं माझी सेवा रुजू झाली. मालतीचें पूर्वपुण्य सफल झालें.

जीवनाच्या एका प्रदेशातून दुसऱ्या निराळ्या प्रदेशात आतां मी पाऊल टाकणार ! यापुढें नवीन परिचय होणार, नवीन अनुभव येणार, नवीन प्रश्न उद्भवणार, नवीन जबाबदाऱ्या आणि कर्तव्ये शिरावर पडणार, नवीन सुखदुःखें भोगावीं लागणार.

पण, माधव, अशा या नवीन परिस्थितींतही मला माझ्या पूर्वीच्या जीवनक्रमाचा, सुखदुःखाचा, अडीअडचणींचा, मित्रांचा, आप्तेष्टाचा आणि बऱ्यावाइट अनुभवाचा विसर पडणार नाहीं, असें मी ईश्वराला स्मरून तुला आश्वासन देतो. आज केवळ माझा अगर

मालतीचा प्रश्न अशा प्रकारें सुटल्याने आपल्या समाजांतल्या सर्व शिक्षित तरुणतरुणींचा प्रश्न सुटला असें होत नाहीं, याची मला पूर्ण जाणीव आहे. या अभागी देशांतले ते अगणित निरक्षर दुःखी लोक; ते शिकलेले पण उदरनिर्वाह चालविण्यास असमर्थ असलेले कष्टी तरुण, शिक्षणानंतर अगदीं साहाजिकपणें विवाहाची वाट पहात बसणाऱ्या त्या अगतिक तरुणी, भलभलत्या वाङ्मयाच्या नादीं लागणाऱ्या त्या मूर्ख युवकयुवती, धर्मरक्षणाच्या नावाखालीं सत्य-धर्माचा खून पाडणारीं तीं अज्ञानी माणसें,—या सर्वांचीं वर्तमान-काळांतलीं दृश्ये माझ्या अतःकरणपटलावरून कधीं तरी नाहींशीं होतील का ?

माधव, हें पत्र तुला इतक्या विस्तारानें लिहून मन बरेंच मोकळे केल्यानें, माझी बावरलेली स्थिति आतां कांहीं अशीं कमी होऊन चित्ताला स्थिरता प्राप्त झाली आहे. स्थिरचित्ताच्या या प्रशांत वातावरणामध्यें माझ्या वैयक्तिक आनदाच्या पार्श्वभूमींत एक भलेंमोठें प्रश्नचिन्ह माझ्या अतःचक्षूस दिसत असून, त्यायोगें माझ्या अंतःकरणाला सुखदुःखमिश्रित गाभीर्याची चमत्कारिक प्रतीति होत आहे ! आज माझा स्वतःचा अज्ञातवास पूर्णपणें नाहींसा होऊन मला माझी पूर्वीची हक्काची स्थिति प्राप्त झाली, तसें आपल्या प्रिय मातृभूमीच्या बाबतींत केव्हां होणार ? तात्यासाहेबांच्या, आणि माझ्या व मालतीच्याही, जीवनातला अधःकार नाहींसा होऊन प्रभाकराचा उदय झाला, तसा आपल्या मायभूमींतल्या या अफाट दुःखी कष्टी जनसमुदायाच्या जीवनात कधीं होणार ? या उदयाचीं कांहीं कांहीं चिन्हें मला वर्तमान परिस्थितींत दिसत आहेत खरीं, पण पुनः भीति वाटते कीं, हा सारा केवळ आभासच तर नाहीं ? आणि हें दृष्य सत्य असलें, तरी प्रभाकराचा हा उदय दिवसेंदिवस असाच वृद्धिंगत

होत जाईल ना ? त्याच्या प्रगतींत कांहीं विघ्न तर नाहीं येणार ?

आणि या विराट प्रश्नाचा विचार मनात आला कीं, एका पवित्र वाक्यसमूहाची स्मृति होऊन अतःकरणाला धीर वाटतो. आपल्या प्राचीन पूर्वजांनीं पुढील प्रासादिक वाणींत दाखविलेला मार्ग वर्तमानकाळीं, किंबहुना कोणत्याही काळीं, उपयुक्त ठरेल यात शंका नाहीं.

ॐ सहनाववतु । सहनौ भुनक्तु । सहवीर्यंकरवावहै ।
तेजस्विनावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥

कळावें, लोभ असावा हे विनति.

तुझा मित्र, पत्नीचा बंधु,
आणि बहिणीचा ( भावी ) पति,
**प्रभाकर डोळे.**



**ॐ शांतिः शांतिः शांतिः**

# सूची



## या कादंबरींतील पत्रांचे लेखक.



## उतारे.

१४ ‘ प्रभाकर ’ साप्ताहिकांतले उतारे ५, २६, ६५.

१५ ‘ धर्मपत्रिका ’ पाक्षिकांतले उतारे १७, २८, ५२.

## या शिवाय ज्या पात्रांचा विशेष उल्लेख आला आहे त्यांचीं नांवें.

१६ शरच्चंद्र भट्टाचार्य.

१७ मु. के. एकबोटे.

१८ बा. ना. काणे.

१९ वामन मांडे.

२० रावबहादुर माने.

२१ अप्पासाहेब दाते.

२२ अण्णासाहेब मांडे.

२३ माधव मुद्रेची आई.

२४ इंदिराबाई.

२५ चंदी भंगीण.

२६ सुशिला कोपरे.

